


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
   वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








२९४७

अं. १२९ . १३० . १३१ . १३२

संपादक - वा. रा. ढवळे

वर्ष ३३ अंक १२९ एप्रिल - मे - जून १९५९
वर्ष ३३ अंक १३० जुलै - ऑगस्ट - सप्टेंबर १९५९
वर्ष ३३ अंक १३१ ऑक्टोबर - नोव्हेंबर - डिसेंबर १९५९
वर्ष ३३ अंक १३२ जानेवारी - फेब्रुवारी - मार्च १९६०

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

संपादक

या. रा. ढवळे

वर्ष ३३ : अंक १३२ जानेवारी-फेब्रुवारी-मार्च १९

या अंकांत

श्री. श्री. शं. नवरे, प्रा. श्री. मा. कुलकर्णी, प्रा. गो. म. कुलकर्णी, डॉ. प्रा. ना. ग. जोशी, प्रा. भवानीशंकर श्री. पंडित, प्रा. भगवंत देशमुख, श्री. तु. शं. कुलकर्णी, प्रा. सुरेश म. डोळके, प्रा. व. दि. कुलकर्णी, शिवाय ग्रंथसूचि १९५२ (म. श्री. दीक्षित), संपादकीय, इतिवृत्त, जमाखर्च पत्रकें इत्यादि.

अनुक्रमणिका

# नव्या युगाच्या
# नव्या वाटा




महाराष्ट्र राज्याची निर्मिति हें इतिहासानें दिलेलें आव्हान आहे. हें आव्हान मराठी जनता कशा प्रकारें स्वीकारणार यावर या राज्याचा भविष्यकाळ अवलंबून आहे. आज आपली नवी यात्रा सुरू झाली आहे. नव्या युगांतील ही नवी तीर्थयात्रा आहे. जनतेचें अंतिम कल्याण साधणें हेंच या यात्रेचें उद्दिष्ट होय.

* जें तत्त्व गांधीजींनीं आपल्या जीवनांत आम्हांला शिकविलें त्या आदर्श ध्येयांची पूर्तता करण्यासाठीं आपण महाराष्ट्रीय सर्व लोक कटिबद्ध झालों आहोंत.

* राज्याच्या कारभारांत सर्वसाधारण जनतेला भाग घेणें शक्य व्हावें हा भाषिक राज्याच्या मागणीमागील विचार आहे.

  संयुक्त महाराष्ट्र हें केवळ साध्य नाहीं तर सामाजिक ऐक्य व समानता गांठण्याचें तें साधन आहे.

* महाराष्ट्राच्या सर्व समस्या भारताच्या राष्ट्रीय भूमिकेवरूनच सोडविण्यांत येतील.

* महाराष्ट्र राज्याचा राज्यकारभार जात, धर्म, भाषा अथवा प्रदेश या बाबतींत कोणत्याही प्रकारचा भेदभाव न करतां चालविण्यांत येईल.

* महाराष्ट्राचें सामाजिक मन एकजिनसी झालें पाहिजे.

प्रकाशन संचालक, महाराष्ट्र सरकार, मुंबई

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका



संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३२ जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९६०

## या अंकांत



संपादकीय
पत्रव्यवहाराचा पत्ता :
१२६ डी. फणसवाडी, मुंबई २.

महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, सदाशिव पेठ, पुणें २.

# बालगोपालांसाठीं नवीं प्रकाशनें

विज्ञान किंवा शास्त्र म्हटलें कीं, मुलांच्या कपाळावर नाराजीच्या आठ्या उमटूं लागतात. वास्तविक विज्ञानासारखा मनोरंजक विषय दुसरा नाहीं.

**पण हें मुलांना पटावें कसें ?**

यासाठीं सोप्या भाषेंत लिहिलेलीं, आकर्षक चित्रांनीं सजविलेलीं पुस्तकें हवींत.

आनंदकार्यालयाच्या परंपरेस साजेशी

## विज्ञान रंजन माला

या अभिनव मालेंतील पहिलीं चार प्रकाशनें प्रसिद्ध झालीं.

मूल्य प्रत्येकीं रु. २-५० : तीन रंगी मुखपृष्ठ : पृष्ठें १२८ : ४० आकृत्या

१. जीवनाधार पाणी : लेखक : डॉ. मल्हार विनायक आपटे
२. मानवमित्र अग्निदेव : लेखक : डॉ. मल्हार विनायक आपटे
३. चाक व वाहनें : लेखक : प्रा. नारायण वासुदेव कोगेकर
४. सूर्यकुलाच्या परिसरांत : लेखक : श्री. त्र्यंबक गोविंद ढवळे
५. सृष्टीचीं लाडकीं लेंकरें : लेखक : प्रा. यशवंत बालकृष्ण राजे

—प्रकाशनाच्या वाटेवर—




६. आपले मानवेतर मित्र : ले. प्रा. ज. नी. कर्वे
७. आपली भूमाता : ले. प्रा. क. वा. केळकर
८. संदेशवाहन : ले. डॉ. प्र. न. जोशी

याशिवाय बालवाङ्मयांतील अनेक सुंदर प्रकाशनें.

**प्रौढांसाठीं उपयुक्त संदर्भ ग्रंथ**

मराठी शब्दरत्नाकर : रु. १२=००
संस्कृत मराठी लघुकोश : रु. ६=००
मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी रु. ३=००
चंगाली मराठी कोश : रु. ४=००
बंगाली मराठी कोश : रु. २=००

---

**आनंद कार्यालय : १०१५ सदाशिव पेठ : पुणें २**

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

संपादक : वा. रा. ढवळे

वर्ष ३३, अंक १३२ जानेवारी–फेब्रुवारी–मार्च १९६०

## संपादकीय

### महाराष्ट्र राज्याचें स्वागत

सलग मराठी प्रदेशाचें एक स्वतंत्र राज्य बनविण्याचें मराठी साहित्यिकांचें गेल्या कित्येक वर्षांचें स्वप्न ता. १ मे १९६० रोजीं साकार झालेलें पाहण्याचें भाग्य ज्या साहित्यिकांना लाभलें ते खरोखरच धन्य समजले पाहिजेत. हें स्वप्न साकार करण्याच्या प्रयत्नांत महाराष्ट्र साहित्य परिषद् व मराठी साहित्य संमेलनें यांनी कोणता भाग घेतला त्याचा साद्यन्त इतिहास याच अंकांत इतरत्र छापलेल्या श्री. श्री. शं. नवरे यांच्या लेखांत वाचावयास मिळणार असल्यामुळे, मी त्या इतिहासाची पुनरुक्ति येथे करीत न बसतां नव्या महाराष्ट्र राज्याचें मनःपूर्वक स्वागत करतों. त्याचप्रमाणे ज्या मराठी जनतेने प्रचंड आंदोलन करून मराठी राज्य संपादन केलें त्या मराठी भाषिकांचेंहि अभिनन्दन करणें इष्ट आहे. इतकेंच नव्हे तर जे मराठी वीर हें राज्य संपादन करण्याच्या प्रयत्नांत कामीं आले त्यांच्या स्मृतीस आदराञ्जली अर्पण करणें हेंहि एक कर्तव्यच होय.

आज निर्माण झालेलें हें एकभाषिक राज्य अपूर्ण असून त्याच्या सीमेवरील बराच मोठा मराठी प्रदेश या मराठी राज्यांत सामील झालेला नाहीं, ही खंत मराठी मनाला लागून राहिली आहे हें येथे स्पष्ट केलेंच पाहिजे. म्हणूनच नव्या महाराष्ट्र राज्याचें स्वागत करताना जें संपूर्ण समाधान मिळायला हवें होतें, तें मिळालेलें नाहीं. हें संपूर्ण समाधान मिळण्याचा दिवस लौकर उगवावा हें आता मराठी भाषिकांचें नवीन स्वप्न आहे. तेंहि लौकरच साकार होईल अशी आशा आहे.

### वाङ्मय–समालोचन अंक

'पत्रिके'चा प्रस्तुतचा अंक हा गेल्या वर्षाप्रमाणेच वाङ्मय–समालोचन अंक आहे. या अंकांत इ. स. १९५९ सालांतील वाङ्मयाचें समालोचन करण्यांत आलें असून अंकाच्या

शेवटीं ग्रंथांची विषयवार सूचिहि छापण्यांत आली आहे. गतवर्षींच्या समालोचनाच्या खर्चा· साठी दिल्ली येथील ' बृहन्महाराष्ट्र समाज बिल्डिंग ट्रस्ट ' कडून व श्री. काकासाहेब गाडगीळ यांच्या प्रयत्नाने अनुदान मिळालें होतें. या वर्षीहि श्री. गाडगीळ यांच्याच प्रयत्नांनी हें अनुदान थोडें वाढवून मिळालेलें आहे, हें येथे आभारपूर्वक प्रकट करण्यास आनंद वाटतो. त्याचप्रमाणे हिंदी व गुजराती वाङ्मयाच्या समालोचनासाठीहि श्री. गाडगीळ यांच्या मार्फत अशाच देणग्या मिळाल्यामुळे, इ. स. १९५८ सालांतील त्या त्या वाङ्मयाचें समालोचन मराठींत स्वतंत्र पुस्तिकांच्या रूपाने प्रसिद्ध करण्यांत येत आहे. या सर्वच समालोचनांसाठी पुढील वर्षी महाराष्ट्र राज्य शासनाने भरीव असें आर्थिक साहाय्य द्यावें अशी खटपट खुद्द श्री. काकासाहेब गाडगीळ यांनीच योग्य त्या दिशेने चालविली आहे. त्यांच्या प्रयत्नांना यश येईल अशी आशा आहे. साहित्य परिषदेबद्दल वाटत असलेल्या आपुलकीमुळे व मराठी वाङ्मयावरील निष्ठेमुळे श्री. काकासाहेब या बाबतींत जातीने लक्ष घालीत आहेत हें येथे नमूद केलेंच पाहिजे.

या अंकांत कथा, काव्य, नाटक, कादंबरी, संकीर्ण ललित गद्य, संशोधन, टीका, बालवाङ्मय इत्यादि वाङ्मय प्रकारांचें समालोचन करण्यांत आलें आहे. ज्या लेखकांनी या बाबतींत परिषदेशी व ' पत्रिके ' शी सहकार्य केलें त्या सर्व लेखकांचें ऋण मान्यच करायला हवें. या सर्व लेखकांचा ' पत्रिके ' वर व पर्यायाने परिषदेवर असाच लोभ राहावा अशी इच्छा आहे.

### संमेलनाध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग

ठाणें येथे ता. ७, ८, ९ व १० मे रोजीं भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनाच्या ४२ व्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून मराठींतील एक साक्षेपी व सहृदय टीकाकार प्रा. रा. श्री. जोग यांची निवड झालेली आहे. या निवडीबद्दल मी प्रा. जोग यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. अध्यापन व लेखन यांत सदैव मग्न राहून गेल्या तीस वर्षांत त्यांनी मराठी समीक्षण-वाङ्मयांत अत्यंत मोलाची भर घातलेली आहे. आपल्या वाङ्मयसेवेला सुरवात त्यांनी ' निशिगन्ध ' या टोपण नांवाने कविता लिहून केली. त्यांचा ' ज्योत्स्नागीत ' हा छोटा काव्यसंग्रह इ. स. १९२६ सालीं प्रसिद्ध झाला, त्या वेळीं नाशिकच्या हंसराज प्रागजी ठाकरसी कॉलेजमध्ये ते संस्कृतचे प्राध्यापक होते. इ. स. १९२८ सालापासून मुख्यत: गद्यलेखनास त्यांनी सुरवात केली. त्या वेळेपासून आतापर्यंत त्यांनी ' अभिनव काव्यप्रकाश ' ( १९३० ) ' सौन्दर्य-शोध आणि आनन्दबोध ' ( १९४३ ), ' अर्वाचीन मराठी काव्य ' ( १९४६ ), 'संस्कृत काव्यवाङ्मय ' ( १९४६ ) केशवसुत : 'काव्यदर्शन' ( १९४७ ), 'काव्यविभ्रम' (१९५१) व 'मराठी वाङ्मयाभिरुचीचें विहंगमावलोकन ' ( १९५९ ) हे ग्रंथ लिहिले आहेत. या ग्रंथांच्या नुसत्या नांवांवरून ओझरती नजर टाकल्यास एक गोष्ट वाचकांच्या झटकन् लक्षांत येते ती ही की, प्रा. जोगांच्या अभ्यासाचा अगर परिशीलनाचा खास विषय मराठी व संस्कृत काव्य हाच आहे. वृत्तें, अलंकार, रस इत्यादि काव्यशास्त्राचा त्यांचा सूक्ष्म अभ्यास व त्या विषयासंबंधीचें त्यांचें चिन्तन वरील ग्रंथांत समाविष्ट झालेलें आहे. ' अभिनव काव्यप्रकाश ' या ग्रंथांत काव्यनिर्मिति व विविध काव्यप्रकार यांसंबंधी प्रा. जोग यांनी तपशीलवार केलेलें विवेचन मराठी व संस्कृत काव्याचा अभ्यास करणाऱ्या केवळ विद्यार्थ्यांनाच नव्हे तर त्या वाङ्मयाचें वाचन करणाऱ्या सर्वसाधारण वाचकांनाहि मार्गदर्शक झालेलें आहे. तसेंच मुंबई मराठी साहित्य संघाच्या विद्यमाने वामन मल्हार स्मारक व्याख्यानमालेंतन अर्वाचीन मराठी कवितेच

वर त्यांनी जीं व्याख्यानें दिलीं त्यांतूनच त्यांचा 'अर्वाचीन मराठी काव्य' हा ग्रंथ निर्माण झाला. केशवसुतपूर्वकालापासून तों आतापर्यंत अर्वाचीन मराठी कवींनी जी काव्य-रचना केली तिची जोगांनी साक्षेपाने या ग्रंथांत चर्चा केली आहे; अर्वाचीन मराठी कवितेचा अभ्यास करणारांना हा ग्रंथ उपयुक्त ठरला आहे.

प्रा. जोग यांनी केवळ काव्यवाङ्मयाचाच अभ्यास केला आहे असें नसून इतरहि वाङ्मय-प्रकारांचें व प्रश्नांचें मनन करून त्यासंबंधी त्यांनी आपले विचार वेळोवेळीं प्रकट केले आहेत. मुंबई व उपनगर साहित्य संमेलन (१९४३), सोलापूर जिल्हा साहित्य संमेलन ( १९४९ ) व मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचा वार्षिकोत्सव ( १९६० ) यांचे अध्यक्ष या नात्याने त्यांनी लिहिलेलीं भाषणें व विविध ग्रंथांना त्यांनी लिहिलेल्या प्रस्तावना त्या दृष्टीने लक्षांत घ्यायला हव्यात. जोगांनी गेल्या २५-३० वर्षांत वेळोवेळीं लिहिलेले स्फुट लेखहि पुस्तकरूपाने संग्रहीत झाल्यास त्यांच्या चिन्तन-विषयांची कल्पना येऊं शकेल.

साहित्यविषयक प्रश्नांच्या तात्त्विक चर्चेप्रमाणेच प्रा. जोग यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यात व चळवळींत आस्थापूर्वक भाग घेतलेला आहे ही गोष्टहि त्यांच्या साहित्य-सेवेचा विचार करतांना नजरेआड करून चालणार नाही. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्य-कारिणीवर इ. स. १९३९ सालापासून आजतागायत, मधलीं तीन वर्षे सोडल्यास, सतत १८ वर्षे ते काम करीत आहेत. त्याचप्रमाणे इ. स. १९४२ ते १९४५ या मुदतींत ते साहित्य-पत्रिकेचे संपादक होते. 'पत्रिके'चा १०० वा वैशिष्ट्यपूर्ण अंक याच मुदतींत त्यांच्या संपादकत्वाने निघाला होता. इ. स. १९४९ ते १९५२ या मुदतींत ते कार्याध्यक्ष होते. परिषदेचे कार्याध्यक्ष असतांनाच डांगच्या भाषेचा भाषाशास्त्राच्या दृष्टीने विचार करून ती मराठीच आहे हें आपलें निर्णायक मत त्यांनी प्रबन्धाच्या रूपाने प्रसिद्ध केलें होतें. तसेंच बहुधा याच वेळीं त्यांनी वाङ्मयाच्या इतिहासाची एक सुटसुटीत योजना तयार केली ती परिषदेने प्रसिद्ध केली होती.

वाङ्मयीन चर्चा व वाङ्मय-विषयक कार्य या दोन्हींबद्दल सारखीच आस्था व उत्साह बाळगणारा प्रा. जोगांसारखा अध्यक्ष ठाणें येथे भरणाऱ्या साहित्य संमेलनाला लाभला असल्या-मुळे त्यांच्या नेतृत्वाने संमेलन यशस्वी होईल यांत शंका नाही. महाराष्ट्र राज्य स्थापन झाल्यानंतर प्रथमच भरणाऱ्या या मराठी साहित्य संमेलनाला मी सुयश चिंतितों.

## दिवंगतांना श्रद्धाञ्जली

गेल्या जानेवारी महिन्यापासून आजपर्यंत महाराष्ट्रांतील कांही नामवंत वाङ्मयसेवक दिवंगत झाले याबद्दल दुःख वाटल्याशिवाय राहत नाही. परिषदेच्या परिभाषा मंडळाचे एक निरलस कार्यकर्ते व खगोलशास्त्रासंबंधी लिहिणारे अधिकारी लेखक श्री. त्र्यं. गो. ढवळे हे १० जानेवारीला अक-स्मात् कालवश झाले. त्याचप्रमाणे याच दिवशीं 'मोत्यांची कुडीं' या गाजलेल्या लघुकथासंग्रहाचे लेखक, मुंबई मराठी साहित्यसंघाचे एक उपाध्यक्ष; प्रतिभा, ज्योत्स्ना, सारथी या नियतकालि-कांचे भूतपूर्व संपादक, सुप्रसिद्ध कायदेपंडित व बहुजनसमाजाचे कळकळीचे पुढारी श्री. खं. सा. ऊर्फ अण्णासाहेब दौंडकर हेहि अगदी अनपेक्षितपणें व अकालीं कालवश झाले! दिल्ली साहित्य संमेलनाचे एक कार्यवाह, तेथील मराठी साहित्यमंडळाचे एक कार्यकर्ते, नभोवाणीचे वार्ताहर

व लेखक श्री. अ. ह. जोशी हेहि ता. २ मार्च १९६० रोजीं अगदी अकालीं मरण पावले. कादंबरीकार श्री. वि. वा. हडप यांचें निधन तर अत्यंत शोचनीय रीतीने झालें. बेशुद्धावस्थेंतच त्यांना हॉस्पिटलमध्यें नेण्यांत आलें. त्यांतून ते वर उठलेच नाहीत. १२ मार्च १९६० रोजीं ते काळाच्या भक्ष्यस्थानीं पडले ! खळबळ उडवून देणाऱ्या अनेक सामाजिक व ऐतिहासिक कादंबऱ्यांचे लेखक म्हणून कै. हडपांची लोकप्रियता मोठीच होती. केवळ लेखनावर उपजीविका करणाऱ्या लेखकांत त्यांना मानाचें स्थान द्यावें लागेल. त्यांच्याइतका विपुल व लोकप्रिय लेखन करणारा कादंबरीकार विरळाच.

कै. दौंडकर व हडप हे दोघेहि लेखक संयुक्त महाराष्ट्राचे पुरस्कर्ते होते व आपापल्या पद्धतीप्रमाणे दोघांनीहि महाराष्ट्र राज्य स्थापन करण्याच्या प्रयत्नांत भाग घेतलेला होता. महाराष्ट्र राज्य स्थापन झालेलें पाहण्यास ते आमच्यांत राहिले नाहीत हें विशेष दुर्दैव म्हटलें पाहिजे.

यांच्या मागोमाग कै. प्रा. द. रा. घारपुरे हे ता. १८ एप्रिलला व कै. लक्ष्मण बलवन्त ऊर्फ अण्णासाहेब भोपटकर हे ता. २४ एप्रिलला दिवंगत व्हावे हें दैवदुर्विलसितच म्हटलें पाहिजे ! हे दोघेहि लेखक, वक्ते व नेते म्हणून महाराष्ट्रांतील बहुजन समाजाला चांगलेच परिचित होते व या दोघांहि पुढाऱ्यांनी मराठी राज्य निर्माण करण्याच्या चळवळींत आपापल्या पद्धतीने समरसून भाग घेतला होता. त्यांच्या कानावर मराठी राज्य निर्माण होणार हा निर्णय जरी सुदैवाने पडूं शकला तरी मराठी राज्य स्थापन झाल्याचें पहाण्यास ते जगूं शकले नाहीत याचें दुःख होतें.

या सर्व लेखकांच्या निधनाबद्दल हळहळ वाटते व मन विषण्ण होतें. या सर्वांच्या स्मृतीला मी श्रद्धाञ्जली अर्पण करतों. ● ● ●

वा. रा. ढवळे

---

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्-प्रकाशनें

◆

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
   ले. कै. बा. अ. भिडे ( प्रती शिल्लक नाहीत. )

| | रु.न.पै. |
|---|---|
| २ म. सा. परिषद्-इतिहास<br>ले. म. म. प्रा. द. वा. पोतदार | ३=०० |
| ३ संत-वाङ्मयाची सामाजिक फलश्रुति<br>ले. प्रा. गं. बा. सरदार | २=०० |
| ४ वाङ्मय समालोचन ( १९४७ ) | २=०० |
| ५ वाङ्मयीन वाद ( परिषद्-पुरस्कृत ) | ३=०० |
| ६ निबंध-विकास ( प्राज्ञ परीक्षेस लावलेलें ) | २=५० |
| ७ साहित्य सुगंध ( प्रवेश ,, ,, ) | २=५० |
| ८ सारस्वत प्रवेश ( प्रथमा ,, ,, ) | २=०० |
| ९ शुद्धलेखन नियम ( १९५९-नवी आवृत्ति ) | ०=१५ |

( क्र. ३ व ५ या पुस्तकांची मागणी अनुक्रमें व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; व प्रसाद प्रकाशन, सदाशिव, पुणें २ यांचेकडे करावी. )

इतर चौकशीः-चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणें २.

**कार्यालयाच्या वेळा**

सकाळी ....... ८॥ ते १०॥
दुपारी ....... ४ ते ८

दर मंगळवारी सुट्टी

श्री. श्रीपाद शंकर नवरे

# महाराष्ट्र राज्य स्थापना आणि साहित्य परिषद्

ता. १ मे १९६० रोजीं सर्व मराठी प्रदेशाचें एक स्वतंत्र राज्य स्थापन झाल्याचें स्वप्न साकार होत आहे आणि त्यानंतर लागलीच एका आठवड्याने ठाणें येथे मराठी साहित्य संमेलनाचें ४२ वें अधिवेशन भरावयाचें आहे.

अशा प्रसंगीं एकभाषिक मराठी राज्य स्थापन करण्यांत महाराष्ट्र साहित्य परिषदेने आणि मराठी साहित्य संमेलनांनी केवढा भाग उचललेला आहे त्याचा आढावा घेणें बरेंच उपयुक्त होईल. केवळ एकट्या साहित्यिकांच्या प्रयत्नांनी महाराष्ट्र राज्याची निर्मिति होत आहे असें कोणीच म्हणूं शकणार नाही. शेवटीं हा प्रश्न राजकीय पातळीवरूनच सोडवावा लागला आणि राजकीय चळवळींत जीं जीं साधनें वापरावीं लागतात तीं तीं वापरावीं लागली, ही गोष्ट खरी असली तरी साहित्याच्या भूमिकेवरून या प्रश्नाला वेळोवेळीं चालना मिळत राहिली याचा राजकीय आंदोलन प्रभावी होण्याला फार उपयोग झाला ही गोष्ट नाकारतां येणार नाही. राजकारण हें साहित्यिक संस्थांच्या कक्षेमध्ये येऊं शकत नाही म्हणून ठराव आणि प्रचार यापलीकडे अशा संस्थांना पाऊल टाकतां येत नाही. ही मर्यादा महाराष्ट्रांतील साहित्य-संस्थांनी कसोशीने पाळलेली आहे. भाषा आणि साहित्य यांच्या अभेद्य संबंधामुळे भाषावार विद्यापीठें, शिक्षणाचें माध्यम आणि स्वभाषेंतून राज्यकारभार, या प्रश्नांची दखल साहित्यिकांना घेणें अपरिहार्य होतें. पण विशिष्ट परिस्थितीमुळे याच प्रश्नांना पुढं राजकीय स्वरूप प्राप्त झालें आणि साहित्य-संमेलनांतून निर्भेळ साहित्यापेक्षा 'राजकारणा'ची चर्चा अधिक होऊं लागली असा बोभाटा सुरू झाला. तथापि एकभाषिक राज्याच्या मागणीपलीकडे साहित्यिकांनी कांहीहि केलेलें नाही. या प्रश्नाला पुढे राजकीय स्वरूप आलें असेल तर तो कांही साहित्यिकांचा दोष नव्हे.

मराठी साहित्य संमेलनें आणि महाराष्ट्र साहित्य परिषद् यांचा अर्ध-पाऊण शतकाचा इतिहास पाहिला तर देशी भाषांचा शिक्षणांत प्रवेश व्हावा, शिक्षणाचें माध्यम मातृभाषा असणें हेंच अधिक स्वाभाविक होय, आणि माध्यमिक शिक्षणांतच नव्हे तर विद्यापीठांतील उच्च शिक्षणांतहि मातृभाषांचाच मान राखला जावा, अशा आशयाच्या ठरावावर या संस्थांकडून वारंवार भर देण्यांत आलेला आहे. महाराष्ट्र विद्यापीठाचा ठराव प्रथम एकोणीसशे एकवीस सालीं बडोदें येथील संमेलनांत संमत झाला. मागणीचा ठराव आणि त्याची पूर्ति यांमध्ये नेहमीच मोठा कालावधि लोटत असतो. मग तें परराज्य असो किंवा स्वराज्य असो. महाराष्ट्र विद्यापीठ 'पुणें विद्यापीठ' या नांवाने प्रत्यक्ष अस्तित्वांत येण्याला १९४८ हें साल



अनुक्रमणिका

उजाडावें लागलें. त्यापूर्वी परराज्यांत मातृभाषांचा दर्जा शिक्षणक्षेत्रांत हळूहळू वाढत गेला; तथापि स्वराज्यांत आणि प्रादेशिक विद्यापीठांत सर्व शिक्षणाचें माध्यम मातृभाषा अद्यापि व्हावयाचें आहे.

भाषावार प्रांतरचनेचा उल्लेख मुंबई येथे १९३८ सालीं भरलेल्या मराठी साहित्य संमेलनांतील एका ठरावांत स्पष्टपणें झालेला आढळतो. प्रांतिक स्वायत्ततेचा फायदा घेऊन या अधिवेशनांत प्रथम महाराष्ट्र विद्यापीठाची मागणी करणारा ठराव संमत करण्यांत आला. त्यांतील पहिलें वाक्य असें — " भाषावार प्रांतरचना असणें व देशी भाषांतून शिक्षण देणें हें तत्त्व आता सर्वमान्य झाल्यानें महाराष्ट्र, गुजराथ व इतर प्रांत यांच्याकडून आपापल्या विद्यापीठांची मागणी होत आहे. " ठरावाचा शेवट असा करण्यांत आलेला आहे की, " म्हणून या संमेलनाची मंत्रिमंडळाला अशी आग्रहाची विनंती आहे की, महाराष्ट्र विद्यापीठ स्थापन करण्याची योजना मंत्रिमंडळाने ताबडतोब अमलांत आणावी. तसेंच सर्व शिक्षणप्रेमी जनतेने या कामाला उदार हाताने द्रव्यसाहाय्य करावें. " भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व सर्वमान्य झाल्याचा उल्लेख ठरावाच्या प्रारंभींच केलेला आहे, तथापि या 'सर्वमान्यते' चा प्रत्यय येऊन भाषिक प्रांत प्रत्यक्ष पदरांत पडण्याला पुढे बावीस वर्षें लागलीं !

भाषिक विद्यापीठें आणि राज्यकारभाराचा भाषिक प्रांत यांचा संबंध इतका निकटचा आहे की, तीं दोन्ही एकदम अस्तित्वांत येणें अवश्य आहे असा दंडक स्वतः महात्मा गांधींनी घालून दिलेला असला तरी तिकडे कोणी फारसें लक्ष दिलेलें नाही. मराठी साहित्य संमेलनांनी मात्र हा संबंध आपल्या नजरेआड होऊं दिला नाही. वर सांगितलेल्या मुंबईच्या अधिवेशनांतच १९३८ सालीं भाषावार प्रांतरचनेची भूमिका स्पष्ट करणारा पुढील ठराव संमत झालेला आहे—

" कर्नाटक प्रांत स्वतंत्र व्हावा म्हणून आजपर्यंत केलेल्या प्रयत्नांमुळे मुंबई व मद्रास प्रांतांच्या असेंब्लींत अनुकूल निर्णय घेण्यांत आला याबद्दल हें संमेलन सर्व कर्नाटकाचें अभिनंदन करीत आहे. या तत्त्वावरच वऱ्हाड, नागपूर व जेथे जेथे महाराष्ट्रीय बहुसंख्य आहेत ते प्रांत एकत्र जोडून मराठी बोलणारांचाहि तसाच निराळा विभाग करावा अशी या संमेलनाची महाराष्ट्रास आग्रहाची सूचना आहे. बेळगाव, कारवार वगैरे जिल्ह्यांत मराठी भाषा बोलणारे बरेच तालुके व गावें असल्याने कोणत्या भाषेच्या प्रांतांत आपल्या तालुक्यांचा व गावांचा समावेश व्हावा याचा निकाल स्वयंनिर्णयाच्या तत्त्वावर, गाव हें परिमाण धरून, वयांत आलेल्या सर्व स्त्री-पुरुषांचीं मतें घेऊन plebiscite ने लावण्यांत यावा अशी विनंती हें संमेलन सरकारास करीत आहे. नवीन होणाऱ्या कर्नाटक प्रांतांत अल्पसंख्य असलेल्या महाराष्ट्रियांच्या मुलांना मराठी भाषेतून प्राथमिक शिक्षण मिळेल अशी जबाबदारी त्या प्रांताच्या सरकारवर लादण्यांत यावी अशी या संमेलनाची मागणी आहे. "

या विस्तृत ठरावाचें महत्त्व अनेक दृष्टींनी सांगतां येईल. साहित्य संमेलनाच्या व्यासपीठावरून भाषावार प्रांतरचनेची मागणी निःसंदिग्ध शब्दांत येथे प्रथमच करण्यांत आली, इतकेंच नव्हे तर प्रांतांची भाषावार विभागणी करतांना लोकशाहीच्या प्रथेप्रमाणे कोणतें तत्त्व अनुसरण्यांत यावें तेंहि स्पष्ट शब्दांत सांगण्यांत आलेलें आहे. आंध्र आणि मद्रास यां दोन प्रांतांतील सीमावाद मिटवितांना लवाद श्री. हरिभाऊ पाटसकर यांनी ज्या तत्त्वांचा अवलंब केला आणि ज्या तत्त्वांचा अलीकडे पुनःपुन्हा उच्चार करण्यांत येतो तें तत्त्व वरील ठरावांत ग्रथित झालेलें आहे, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. पुढे बेळगाव येथील साहित्य संमेलनानंतर संयुक्त महाराष्ट्र परिषदेची स्थापना होऊन १९४७ सालीं एप्रिल महिन्यांत

जळगाव येथे भरलेल्या परिषदेच्या पहिल्या अधिवेशनांत सीमावादावर नेमका हाच तोडगा ठरावरूपाने सुचविण्यांत आला. या अधिवेशनाचे अध्यक्ष श्री. शंकरराव देव व स्वागताध्यक्ष श्री. हरिभाऊ पाटसकर हेच होते.

साहित्य संमेलनाच्या मुंबईच्या अधिवेशनानंतर अनुक्रमें अहमदनगर, रत्नागिरी आणि सोलापूर येथे संमेलनाचीं जीं अधिवेशनें झालीं त्यांत भाषावार प्रांतरचनेच्या मागणीवर पुन्हा जोर देण्यांत आला. ही मागणी मान्य करतांना ज्या ज्या अडचणी येण्याची शक्यता आहे त्यांचा परिहार या ठरावामध्ये करण्यांत आलेला असल्यामुळे त्यांतील महत्त्वाचा भाग उद्धृत करणें इष्ट होईल.

"भाषावार प्रांतरचनेचा व तसेंच विशिष्ट भाषेची व लोकसंख्येची अभिवृद्धि होत आहे की अवनति होत आहे या गोष्टींचा विचार करतांना पुढील माहिती उपयुक्त किंबहुना आवश्यक आहे. म्हणून १९४१ सालीं होणाऱ्या लोकगणतीमध्ये प्रत्येक जिल्ह्यांत, तालुक्यांत व गावांत ती ती भाषा बोलणाऱ्या लोकांच्या संख्येची नोंद करण्यांत यावी व ही माहिती सरकारी दफ्तरखान्यांतच न ठेवतां प्रसिद्ध करण्यांत यावी अशी या साहित्य संमेलनाची हिंदुस्थान सरकारास आग्रहाची विनंती आहे."

नगरच्याच अधिवेशनांत दुसरी अशी मागणी करण्यांत आली की, "हें संमेलन १९४१ च्या शिरगणतिखात्याच्या प्रमुखाला अशी शिफारस करतें की, त्यांनी १९४१ च्या शिरगणतीमध्ये कोकणी आणि खानदेशी ऊर्फ अहिराणी या दोन्ही मराठी भाषेच्या प्रादेशिक बोली मराठी भाषेंत दाखल करून घ्याव्यात व त्या बोली बोलणारे मराठी भाषकांत सामील करावेत." बेळगाव-कारवारसंबंधी याच अधिवेशनांतील आणखी एक ठराव असा की, "या दोन्ही जिल्ह्यांतील जीं खेडीं व शहरें मराठी बोलणाऱ्या बहुसंख्य लोकांचीं असतील तीं सर्व एकत्रित करून त्यांचा एक नवीन मराठी जिल्हा सिद्ध करावा आणि तो महाराष्ट्रांत समाविष्ट करण्यांत यावा. तसेंच विजापूर जिल्ह्यांतील अशीं मराठी खेडीं शेजारच्या मराठी जिल्ह्यास जोडण्यांत यावींत." मुंबई व नगर येथे झालेल्या ठरावांचा उच्चार पुन्हा १९४० सालीं रत्नागिरीच्या संमेलनांत करण्यांत आला. त्याच्या पुढील वर्षी सोलापुरास अशाच प्रकारची मागणी करतांना त्याला "नवीन संयुक्त राज्यघटनेचा विचार होण्यापूर्वी मराठी प्रदेशाचा निराळा प्रांत अस्तित्वांत आणिला जावा" अशी महत्त्वाची पुस्ती जोडण्यांत आलेली आहे.

देशांतील राजकीय परिस्थितीचे पडसाद साहित्यिकांच्या व्यासपीठावर मधून मधून उमटणें अपरिहार्य होतें. १९३७ सालीं ब्रिटिश अमदानींतच पण प्रांतिक स्वायत्ततेचा मर्यादित कारभार सुरू होतांच भाषावार विद्यापीठें आणि भाषावार प्रांतरचना यांच्या मागणीला एकदम कशी चालना मिळाली तें वर दिलेल्या सालांवरून ध्यानांत येईल. प्रांतिक स्वायत्ततेची पुढची पायरी म्हणून संयुक्त किंवा 'फेडरल' राज्यव्यवस्थेची भाषा देशांत जरा जोराने सुरू होतांच सोलापूरच्या ठरावांत वर सांगितल्याप्रमाणे तिचा उल्लेख करण्यांत आला. यानंतर ४२ चें प्रचंड राजकीय आंदोलन सुरू होऊन इतर सर्व प्रश्न मागे पडले. पण दुसऱ्या महायुद्धाची समाप्ति होऊन स्वयंनिर्णयाच्या तत्त्वानुसार ब्रिटिश सरकारने स्वराज्याची आखणी करण्यासाठी हिंदी लोकांची घटना-समिति नेमली तेव्हा ती पर्वणी साधून साहित्यिकांनी आपल्या मागणीचा जास्तींत जास्त जोराने पुनरुच्चार केला तर त्यांत आश्चर्य नाही.

त्या दृष्टीने १९४६ सालीं मे महिन्यांत बेळगाव येथे भरलेलें मराठी साहित्यसंमेलनाचें ३० वें अधिवेशन अत्यंत संस्मरणीय ठरलें. संमेलनाचें अध्यक्षपद महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या अध्यक्षांनीच भूषवावें आणि निरनिराळ्या शाखासंमेलनांसाठी स्वतंत्र अध्यक्ष निवडावे

या त्या वेळच्या घटनेप्रमाणे ललित साहित्य विभागाच्या अध्यक्षपदावर नागपूरचे श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांची निवड झालेली होती; पण त्यांनी कालाचें औचित्य लक्षांत घेऊन आपल्या भाषणांत ललित साहित्याचा परामर्श घेण्याऐवजी अथपासून इतिपर्यंत महाराष्ट्राच्या एकीकरणावर भर दिला. श्री. भाऊसाहेब म्हणाले, " माझ्या मतें महाराष्ट्रापुढे आज जो मुख्य प्रश्न आहे, तो मराठी भाषेच्या लालनाचा आणि मंडनाचा नव्हे, तर रक्षणाचा आणि भवितव्याचा आहे; आणि म्हणूनच औचित्यभंगाचा दोष पत्करून मी या अग्रासनाचा प्रभाव लक्षांत घेऊन मराठी लेखक आणि पत्रकार यांच्या वतीने महाराष्ट्र-एकीकरणासाठी झटण्याची हांक महाराष्ट्रांतील सर्व पक्षांच्या, जातींच्या आणि धर्मांच्या, कार्यकर्त्यांना देत आहें. त्या हांकेनुसार महाराष्ट्रांतील कार्यकर्ते एकीकरणासाठी झटावयास तयार झाले तर मला दिलेल्या या सन्मानाचें सार्थक झालें असें मी समजेन. " आपल्या भाषणांत माडखोलकरांनी महाराष्ट्राच्या एकीकरणासाठी त्या वेळेपर्यंत झालेल्या प्रयत्नांचा सर्व इतिहास सांगितला आणि भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व स्वतः महात्मा गांधींना मान्य असल्यामुळे देशाची नवीन घटना तयार करतांना राष्ट्रसभेने इतर प्रांतांबरोबर मराठी भाषकांचें विभक्त मराठी राज्य निर्माण करून घेण्याची सर्वांना विनंती केली.

श्री. माडखोलकरांनी दिलेल्या चालनेप्रमाणे बेळगावच्या संमेलनांत सर्वानुमतें संमत झालेल्या पुढील ठरावांमध्ये संयुक्त महाराष्ट्राची संपूर्ण कल्पना दिग्दर्शित झाल्याचें आढळून येईल—

" हिंदुस्थानांत स्वतंत्र राष्ट्रीय सरकार लवकरच स्थापन होण्याचा संभव दिसत आहे, आणि तसें व्हावें अशी या सभेची तीव्र इच्छा आहे. तसें होण्याचे वेळीं हिंदी प्रांतांची भाषा आणि संस्कृति यांच्या दृष्टीने पुनर्घटना करण्यांत आली पाहिजे. अशी पुनर्घटना करतांना मुंबई आणि मध्यप्रांत-वऱ्हाड या दोन प्रांतांतील, तसेंच सध्याच्या मुंबई आणि मध्यप्रांत-वऱ्हाड या दोनहि प्रांतांच्या स्थळसीमेंत मोडणाऱ्या देशी संस्थानांतील सर्व सलग मराठी प्रदेश, हैद्राबाद संस्थानांतील सर्व मराठवाडा आणि पोर्तुगीज सत्तेखालील गोमंतक, यांचा संयुक्त महाराष्ट्रप्रांत निर्माण करण्यांत यावा. हा संयुक्त महाराष्ट्रप्रांत निर्माण करतांना मुंबई, मध्यप्रांत—वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमंतक यांच्या सरहद्दीवरले जे मराठीभाषी भाग आज अन्यभाषी प्रांतांत सामील केले गेलेले आहेत ते भागहि संयुक्त महाराष्ट्रांत समाविष्ट करण्यांत यावेत असा या सभेचा आग्रह आहे. "

याच ठरावाचे आणखी दोन भाग पुढीलप्रमाणे होते—

( १ ) वरील ठरावाप्रमाणे संयुक्त महाराष्ट्रप्रांत स्थापण्यांत यावा म्हणून आवश्यक ती खटपट करण्यासाठी आणि सरकार व जनता यांच्यापुढे वेळोवेळीं निवेदनें तयार करून दाखल करण्यासाठी वरील संयुक्त महाराष्ट्रविषयक ठराव, आणि तसेंच आजवर म. सा. संमेलनांतून या विषयावर झालेले सर्व ठराव यांस अनुसरून काम करण्यासाठी, ही सभा संयुक्त महाराष्ट्र समिति या नांवाची समिति स्थापन करीत आहे. या समितींत पुढील गृहस्थ सभासद असावेत — ( १ ) प्रा. द. वा. पोतदार ( अध्यक्ष ), ( २ ) श्री. शं. द. देव, ( ३ ) श्री. केशवराव जेधे, ( ४ ) श्री. श्री. शं. नवरे, ( ५ ) श्री. ग. त्र्यं. माडखोलकर ( आमंत्रक ).

( २ ) या समितीला पांच सभासद स्वीकृत करण्याचा अधिकार असावा. या समितीनें आवश्यकतेनुसार संयुक्त महाराष्ट्रामधील प्रमुख कार्यकर्त्यांचें साहाय्य घेऊन संयुक्त महाराष्ट्राची तपशीलवार कैफियत चार महिन्यांच्या आंत तयार करावी व ती म. सा. परिषदेला सादर करावी. या समितीच्या खर्चासाठी एक हजार रुपयांचा प्राथमिक निधि या समितीने जमवावा.

याच विषयाच्या अनुषंगाने हैद्राबाद संस्थानांतील आणि गोमंतकांतील मराठी जनतेची दुर्भर स्थिति लक्षांत घेऊन संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण होईपर्यंत मराठवाड्याची आणि गोमंतकाची भाषिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक उन्नति होण्यासाठीं त्या प्रदेशांना संपूर्ण प्रादेशिक स्वायत्तता तावडतोब प्राप्त होण्याची आवश्यकता दोन स्वतंत्र ठरावांनी प्रतिपादन केलेली होती. आणखी एक ठराव सीमाप्रश्नासंबंधी होता—" संयुक्त महाराष्ट्राच्या संयोजनाचा व स्वतंत्र प्रांतघटनेचा विचार करतांना त्याच्या चतुःसीमेवरील बेळगाव, कारवार, गुलबुर्गा, आदिलाबाद, बिदर, छिंदवाडा, बालाघाट, बैतुल, निमाड वगैरे ज्या जिल्ह्यांत आज मराठीभाषी व अन्यभाषी प्रदेशांची सरमिसळ झालेली आहे, त्या जिल्ह्यांतील कायम रहिवाशी असलेल्या जनतेच्या मताचा कौल खेडेवार प्रौढ व गुप्त मतदान-पद्धतीने घेऊन ठरविण्यांत यावा."

" संयुक्त महाराष्ट्राची स्थापना या सभेने केलेली आहे. सबब त्या कल्पनेला पुष्टि मिळेल अशा रीतीने काँग्रेस, हिंदुमहासभा वगैरे संस्थांनी आपल्या कार्यक्षेत्राचे भाग ठरवावेत अशी या सभेची विनंती आहे."

बेळगावच्या अधिवेशनानंतर गेल्या पंधरा वर्षांत भाषिक पुनर्घटनेविषयी जे कित्येक प्रश्न वेळोवेळीं उपस्थित झाले त्या सर्वांचा परामर्श वरील ठरावांत अगाऊच घेण्यांत आलेला होता हें ध्यानांत येण्यास वेळ लागत नाही. संयुक्त महाराष्ट्र समितींतील पांच सदस्यांची निवड करतांना अनुक्रमें महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष ( पोतदार ), काँग्रेसचे कार्यवाह ( देव ), महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमिटीचे अध्यक्ष ( जेधे ), मराठी पत्रकार परिषदेचे अध्यक्ष ( नवरे ) आणि या प्रश्नाला आपल्या बेळगावच्या भाषणांत चालना देणारे श्री. गजाननराव माडखोलकर यांचा त्यांचे त्यांचे त्या वेळचे अधिकार लक्षांत घेऊन अंतर्भाव करण्यांत आलेला होता.

या समितीची पहिली सभा पुणें येथे भारत इतिहास संशोधक मंडळाच्या जागेंत ता. १६ मे १९४६ रोजीं होऊन त्यामध्यें संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नासंबंधींचें लोकमत प्रकट व संघटित करण्यासाठीं मुंबईस शक्य तितक्या लवकर ' महाराष्ट्र एकीकरण परिषद् ' बोलाविण्याचें ठरलें. त्याप्रमाणें ता. २८ जुलै १९४६ रोजीं मुंबई येथे महाराष्ट्र एकीकरण परिषदेचें अधिवेशन श्री. शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखाली झालें व त्यांत भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वांनुसार हिंदुस्थानांतील सलग मराठीभाषी प्रदेशाचा एक प्रांत शक्य तितक्या लवकर निर्माण करण्यांत यावा, अशा आशयाचा पहिला ठराव मंजूर करण्यांत आला. दुसऱ्या ठरावाने पहिल्या ठरावासंबंधी जरूर ती सर्व खटपट करण्यासाठी ' संयुक्त महाराष्ट्र परिषद् ' या नांवाची स्वतंत्र संस्था स्थापन करण्यांत यावी असें ठरलें व त्यासाठी एक तात्पुरती समिति नेमण्यांत आली. या समितीची सभा ता. २९ जुलै १९४६ रोजीं श्री. शंकरराव देव यांच्याच अध्यक्षतेखाली मुंबईच्या काँग्रेस हाऊसमध्ये भरून एक तात्पुरतें कार्यकारी मंडळ निवडण्यांत आलें. परिषदेची घटना तयार करण्यासाठीं प्रा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखाली एक पोटसमिति नेमण्यांत आली. ता. २८ सप्टेंबर १९४६ रोजीं पुणें येथे या समितीने केलेल्या घटनेचा मसुदा मंजूर करण्यांत आला आणि या घटनेप्रमाणे ता. ३१ ऑक्टोबर १९४६ पर्यंत जे सभासद नोंदण्यांत येतील त्यांच्यामधून अखिल महाराष्ट्रांतून परिषदेच्या प्रतिनिधींची निवडणूक करण्याचें ठरलें. त्याप्रमाणे निवडणूक झाल्यावर संयुक्त महाराष्ट्रासंबंधी सर्व प्रकारची चळवळ करण्याचें काम या परिषदेच्या अंगावर पडलें, आणि साहित्य परिषद् आपल्या जबाबदारींतून मुक्त झाली.

साहित्य संमेलनाने उपस्थित केलेल्या प्रश्नांमधून अवघ्या ६ महिन्यांत 'संयुक्त महाराष्ट्र परिषद्' कशी जन्माला आली त्याचा तारीखवार इतिहास असा आहे. पद्धतशीर आंदोलन केल्यावाचून आणि

त्या आंदोलनासाठी सर्व राजकीय पक्षांचें सहकार्य घेतल्यावाचून हा प्रश्न सुटणें शक्य नाही असें भोवतालच्या वातावरणावरून दिसून येतांच साहित्य परिषदेने हा विषय 'संयुक्त महाराष्ट्र परिषद्'या केवळ त्याच हेतूसाठी जन्माला घातलेल्या स्वतंत्र संस्थेवर टाकला. साहित्यिकांनी आपली जबाबदारी टाळली असा याचा अर्थ नव्हे. प्रत्यक्ष आंदोलनाचा विषय साहित्य परिषदेच्या किंवा संमेलनाच्या कक्षेत येऊं शकत नसल्यामुळे, स्वतंत्र संघटना उभारावी व तिला वेळोवेळीं साहित्यिकांनी आपला नैतिक पाठिंबा देत राहावें यासाठी कार्याची अशी विभागणी करणें जरूर होतें, असा यासंबंधी खुलासा बेळगावनंतरच्या हैद्राबाद येथील साहित्य संमेलनांत करण्यांत आला. साहित्य परिषदेचे पुष्कळ कार्यकर्ते संयुक्त महाराष्ट्र परिषदेमध्येहि पदाधिकारी या नात्याने सामील झाले आणि त्यामुळे दोन्ही संघटनांमधील दुवा कायम राखण्यांत आला.

यापुढील सर्व इतिहास म्हणजे संयुक्त महाराष्ट्र परिषदेचा, किंवा द्विभाषिकाच्या स्थापनेनंतर तिने आपलें काम स्थगित केल्यावर, संयुक्त महाराष्ट्र समितीचा इतिहास होय. त्या इतिहासांत शिरण्याचें हें स्थळ नव्हे. इतकें सांगितलें म्हणजे पुरे की, बेळगावला प्रारंभींच घेतलेली ठाम भूमिका मराठी साहित्य संमेलनाने किंवा महाराष्ट्र साहित्य परिषदेने केव्हाहि तिळमात्र सोडली नाही. संधि मिळेल तेव्हा तेव्हा त्या भूमिकेचा अत्यंत जोराचा पुरस्कार परस्परावलंबी या दोन्ही साहित्यसंस्थांनी केलेला आहे, आणि बिनराजकीय अशा निर्लेप व्यासपीठावरून साहित्यिकांनी एकमुखाने केलेल्या ठरावांनी या पुरस्काराचा नैतिक लाभ राजकीय चळवळीला मिळत गेलेला आहे. बेळगावपासून आतापर्यंत साहित्य संमेलनाचें असें एकहि अधिवेशन दाखवितां येणार नाही की, ज्यामध्ये अध्यक्षांनी आपल्या भाषणांत किंवा प्रतिनिधींनी केलेल्या एकमुखी ठरावांत मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा पुरस्कार करण्यांत आलेला नाही. हा पुरस्कार इतक्या धडाडीने आणि एकमुखाने प्रत्येक वेळीं करण्यांत आला की हें साहित्य संमेलन नसून, संयुक्त महाराष्ट्र परिषदेचें किंवा समितीचें हें अधिवेशन आहे की काय असा लोकांना भास व्हावा ! तशा आशयाची संमेलनावर आणि परिषदेवर उघडपणें पुष्कळ टीका झालेलीहि आहे. पण शिक्षण आणि राज्यकारभार यांचें माध्यम मातृभाषा असणें लोकशाही जमान्यांत विशेषच सोयीचें आणि स्वाभाविक असल्यामुळे साहित्यिकांना या प्रश्नांत इतकें लक्ष घालावें लागलें की, साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांची निवडणूक करतांना अमुक उमेदवार मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीला अनुकूल आहे की प्रतिकूल आहे हें काळजीपूर्वक पाहण्यांत येऊं लागलें ! दिल्ली येथे १९५४ सालीं भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी एकभाषिक राज्यस्थापनेविषयी केव्हाहि उत्साह दाखविलेला नव्हता किंवा त्यानंतरहि त्यांनी तो कधी दाखविलेला दिसला नाही. तरीहि एकंदर साहित्यिकांमधील आणि जनतेमधील एतद्विषयक मताची तीव्रता लक्षांत घेऊन " प्रादेशिक राज्यांची भाषावार रचना प्रादेशिक भाषा बोलणाऱ्या लोकांचें पूर्ण समाधान होईल अशा रीतीने करणें हेंच एकमेव कृत्य राष्ट्रीय ऐक्याचा पाया दृढ व खोल करण्याचा नजीकचा उपाय आहे " अशी स्पष्ट कबुली त्यांना आपल्या अध्यक्षीय भाषणाच्या शेवटीं द्यावी लागली आणि दिल्ली येथे संयुक्त महाराष्ट्रासंबंधी ठराव त्यांनी स्वतः अध्यक्षीय आसनावरून मांडला !

गेल्या पंधरा वर्षांत मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांनी या विषयावर निःसंदिग्ध आणि विस्तृत केलेल्या प्रवचनांतील लांबलचक उतारे देऊन 'पत्रिके'ची मर्यादित जागा अडविणें इष्ट होणार नाही. तसेंच प्रत्येक वर्षी न चुकतां संमेलनाने संयुक्त महाराष्ट्राविषयी केलेले ठराव येथे उद्धृत केल्यानेंहि बरीच जागा अडणार आहे. साहित्य संमेलनांच्या आणि साहित्य परिषदेच्या इतिहासांत त्या ठरावांची नोंद झालेली आहे इतकें सांगितलें म्हणजे पुरे, बेळ०

गावला एकदा घेतलेली ठाम भूमिका साहित्यिकांनी केव्हाहि सोडली नाही. सीमावाद सोडविण्यासाठी बेळगावला साहित्यिकांनी जी गुरुकिल्ली सांगितली तिलाच आता राजकीय क्षेत्रांत 'पाटसकर-योजना' असें नांव प्राप्त झालें आहे. राज्यपुनर्घटना करतांना कॉंग्रेस सरकारने देशांतील इतर सर्व भागांत एकभाषिक राज्यें स्थापना करून केवळ मुंबई शहराची अडचण दूर करण्यासाठी मराठी प्रदेशाची गुजराथी प्रदेशाशीं सांगड घातली, याचा साहित्यसंमेलनाने पुन्हा पुन्हा तीव्र शब्दांत निषेध केलेला आहे. विरोधी लोकमताची तीव्रता लक्षांत घेऊन कॉंग्रेस सरकारने द्विभाषिकाचें विभाजन करण्याचें नुकतेंच ठरविलें तेव्हा महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकरी मंडळाने ता. १ जानेवारी १९६० रोजीं भरलेल्या आपल्या सभेंत सरकारचें अभिनंदन केलें. पण तें करतांना हा एकभाषिक प्रांत अपूर्ण आहे, सीमेवरील बराच मोठा मराठीभाषी प्रदेश मराठी राज्यांत आणल्यावाचून ही अपूर्णता दूर होणार नाही हें शल्य सरकारच्या नजरेस आणून देण्याचें आपलें कर्तव्य सोडलें नाही. द्विभाषिक विभाजनानंतर ठाणें येथे भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनांत देखील आपल्या मनांतील हें असमाधान प्रकट केल्यावाचून मराठी साहित्यिक राहणार नाहीत यांत अगदी शंका नाही.

प्रस्तुत विषयासंबंधीं महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने मराठी साहित्यिकांनी केलेल्या कांही ठळक सेवेचा जातां जातां उल्लेख करून हें विवेचन पुरें करतों. डांगची भाषा मराठी आहे असा सरकारदरबारीं अनेकदा निर्णय घेण्यांत आलेला असतां आता सर्वच्या सर्व डांग

जिल्हा गुजरात राज्यांत घालण्यांत येत आहे ! केवळ भाषेच्या दृष्टीने डांगी बोली मराठी आहे हें सोपपत्तिक रीतीनें सिद्ध करणारा एक प्रबंध ठाणें येथील आगामी साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष प्रा. रा. श्री. जोग यांनी १९४९ सालीं साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष असतांना लिहून प्रसिद्ध केला. त्यांतील प्रतिपादन अद्यापि कोणीहि खोडून काढलेलें नाही. कोकणी भाषा मराठीहून भिन्न आहे व म्हणून कोकणी भाषा बोलणारा सागराच्या सीमेंतील प्रदेश महाराष्ट्रांत न घालतां त्याचा स्वतंत्र प्रांत करण्यांत यावा, हा दावा कारवार संमेलनाचे अध्यक्ष श्री. प्रियोळकर यांनी झणझणीत शब्दांत खोडून काढून त्याला कायमची मूठमाती दिली. अंमळनेर संमेलनाचे अध्यक्ष प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी खानदेशांतील अहिराणी भाषेचा परामर्श घेतला. पंढरपूर संमेलनाचे अध्यक्ष नागपूरचे डॉ. शं. दा. पेंडसे यांनी बस्तर प्रदेशांतील हळबी बोली मराठीची पोटभाषा आहे हें आपल्या भाषणांत सिद्ध करून दाखविलें. अहमदाबादच्या संमेलनांत श्री. विठ्ठलराव घाटे यांनी " महाराष्ट्र व गुजरात एकमेकांचे शेजारी आहेत. आपण शेजारधर्म पाळला पाहिजे. एकीच्या घरचें कालवण दुसरीच्या घरीं गेलें पाहिजे. गुजरातची डाळढोकळी महाराष्ट्राने व महाराष्ट्राची झुणकाभाकर गुजरातने चाखली पाहिजे. आपल्या भाषा एकमेकींस जवळच्या व जुळत्या आहेत.दोघींच्या पाठीमागे संस्कृतची पुण्याई व वरदहस्त आहे.आम्ही एकमेकांच्या जवळ आलें पाहिजे. परस्परांच्या सुखदुःखांचा परामर्श घेतला पाहिजे " अशा तऱ्हेची विचारसरणी मांडून शेजाऱ्याशेजाऱ्यांच्या मनांतील किल्मिष दूर करण्याचा प्रयत्न केला. अहमदाबादच्या याच अधिवेशनांत १९५३ सालीं पास झालेल्या एका ठरावाने " भारताच्या संविधानांत अल्पसंख्याकांना व अन्यभाषिकांना जीं जीं संरक्षणें दिलीं आहेत तीं तीं हा भावी महाराष्ट्र जबाबदारीनें आणि संतोषपूर्वक पार पाडील, कोणावर कसलाहि अन्याय वा कोणतेंहि आक्रमण होणार नाही याची काळजी वाहील " अशी स्पष्ट शब्दांत ग्वाही दिलेली आहे. बेळगाव, कारवार आणि गोमंतक या भागांतील मराठी प्रजेवर होणाऱ्या भाषिक अन्यायाला सर्वांत आधी साहित्यिकांनीच वारंवार प्रखर शब्दांत तोंड फोडलेलें आहे.

राजकीय भूमिकेवरून प्रचंड आंदोलन केल्यानंतर संयुक्त महाराष्ट्राची मुख्य मागणी पदरांत पडण्याचा सुदिन प्राप्त झाला. या आनंदाचा मोठा वांटा साहित्यिकांनी मागितला तर त्यांचा तो हक्कच होय. या आनंदावर सीमाप्रश्नाचें विरजण पडावें ही गोष्ट मनाला वारंवार टोचत राहते. डॉ. पेंडसे यांनी पांडुरंगाच्या सान्निध्यांत चंद्रभागेच्या तीरीं अंतःकरणाच्या उमाळ्याने बोललेल्या कांही वाक्यांची या वेळीं आठवण होते–" लोकशाही सत्तेचा हात लोकमताच्या नाडीवर नेहमी पाहिजे. पण दिल्लीश्वरांची परंपरा बादशाही आहे. जागृत होण्यास त्यांना बराच वेळ लागतो. दिल्लीच्या शापित वास्तूचा तो परिणाम असावा ······· पण लोकशाही आणि बादशाही फार दिवस एकत्र नांदूं शकणार नाहीत. लोकशाहीपुढे बादशाहीला नमावेंच लागेल. " अस्तु. ● ● ●

प्रा. श्री. मा. कुलकर्णी, एम्. ए.

# कादंबरी

१९५८ सालाच्या तुलनेने १९५९ साल कादंबरीच्या क्षेत्रांत तेजीचेंच म्हणावें लागेल. ५८ सालीं अभावाने तळपणारे अनेक ज्येष्ठ कादंबरीकार ५९ सालीं आपापल्या कलाकृतींसह कादंबरीच्या क्षेत्रांत उपस्थित झालेले दिसतात. नेहमीच्या निष्ठेने प्रा. फडक्यांनी 'अंजलींतून' दोन कादंबरी–पुष्पें वाचकांच्या हातीं दिलीं आहेतच; शिवाय पूर्वी मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या यांच्या दोन कादंबऱ्या– 'भरारी' व 'जहर' –या वर्षी पुस्तक–रूपाने प्रकाशित झाल्या आहेत. श्री. खांडेकर, श्री. माडखोलकर व श्री. पु. य. देशपांडे या जुन्या पिढींतील कादंबरीकारांच्या कादंबऱ्याहि यंदा प्रकाशित झाल्या आहेत. नंतरच्या पिढींतील पेंडसे-दांडेकर ही जोडीहि या वर्षी तळपतांना दिसते. चार–दोन कादंबऱ्या लिहून पूर्वीच या क्षेत्रांत पदार्पण करणारांपैकीहि बऱ्याच जणांनी आपली हजेरी याहि वर्षी लावलेली आहे. श्री. र.वा. दिघे यांच्यासारखा एखादाच प्रसिद्ध कादंबरीकार या वर्षी मागे राहिलेला दिसतो. स्त्री-कादंबरीकारांपैकी मात्र या वर्षी कोणीहि पुढे आलेलें दिसत नाही. पण कांही नवीनांनी या क्षेत्रांत पदार्पण करून ही उणीव भरून काढली आहे. यांपैकी कांहींनी स्वतःच्या भविष्या-संबंधी बऱ्याच आशाहि निर्माण केल्या आहेत.

अशा नवागतांपैकीच 'बारी' या कादंबरीचे लेखक श्री. रणजीत देसाई हे आहेत. कोल्हापूर–बेळगाव मार्गावरील झाडींत राहणाऱ्या बेरड जमातीची कथा या कादंबरींत आली आहे. 'तेग्या' हा जसा त्या जंगलांतील बेरडांचा नाईक तसाच तो कादंबरीचा नायक आहे. त्याची बायको नागी, त्याचा मित्र चंद्रोजी व त्याचे साथीदार तुका, काळू, बाळा इत्यादींच्या साहाय्याने बेरड जमातीच्या धाडशी, क्रूर, भयंकर पण तरीहि इमानी अशा जीवनाचें चित्रण सहानुभूतीने व कौशल्याने श्री. देसाई यांनी केलें आहे. कालमानानुसार बदललेल्या या बेर-डांच्या जीवनाचें चित्रण जितकें हळुवार तितकेंच चटका लावणारें झालें आहे. कथेची गुंफण व तिचा परिपोष, व्यक्तिचित्रण, निसर्गवर्णन, जीवनदर्शन इत्यादि अंगोपांगांकडे लक्ष पुरवून कादंबरी लिहिल्यामुळे तिच्यांत आकर्षकता आलेली आहे.

'बारी' या कादंबरींत बेरडांचें जीवन चित्रित झालें आहे, तर श्री. अण्णाभाऊ साठे यांच्या 'फकिरा' या कादंबरींत 'मांग' या जमातीचें जीवन चित्रिलें आहे. बेरडांच्या जीवना-प्रमाणेच मांगांचें जीवनहि धाडशी व क्रूर. श्री. देसाईंच्याप्रमाणेच श्री. साठे यांनीहि या जीवनाचा जवळून व जिव्हाळ्याने अनुभव घेतला आहे. परंतु त्या अनुभवाला कल्पिताच्या साहाय्याने फुलविण्याचा व त्यांत रंग भरण्याचा फारसा प्रयत्न त्यांनी न केल्यामुळे कलाकृति म्हणून 'फकिरा' ही 'बारी' पेक्षा उणी ठरते. असें असलें तरी मांग जमातीच्या खडतर, धाडशी व प्रसंगीं करुणाजनक जीवनाचें चित्रण वाचकांचें लक्ष व सहानुभूति ओढून घेतल्या-शिवाय राहत नाही. इंग्रज सरकारने पुढे या जमातीला तारेच्या कुंपणांत व हजेरीच्या बंधनांत डांबून व जखडून टाकलें. त्यानंतरच्या त्यांच्या जीवनाचें करुणाजनक चित्रण विभावरी शिरूरकरांच्या 'बळी' या कादंबरींत पाहावयास सापडतें. त्याच्या पूर्वीच्या धाडशी जीवनाचें चित्रण साठे यांनी येथे करून त्यालाहि चिरंतन रूप दिलें आहे.

लुप्त होत चाललेल्या अशाच एका वर्गाच्या जीवनाला शब्दरूप देण्याचा प्रयत्न श्री. साठे यांनी आपल्या दुसऱ्या एका कादंबरींत–वैजयंता तिचें नांव–केलेला आहे. तमासगिरांचा वर्ग हा सुद्धा महाराष्ट्रांतील एक वैशिष्ट्यपूर्ण वर्ग आहे. याहि वर्गाच्या जीवनाचा लेखकाला जवळून अनुभव आहे. तमाशगिरांच्या व्यभिचारी व अनिश्चित जीवनांतून बाहेर पडून गरती स्त्रियांचें सुखी वैवाहिक जीवन जगण्याची धडपड करणाऱ्या एका स्त्रीच्या जीवनाची कहाणी वैजयंतांत सांगितली आहे. वास्तवाचा भक्कम आधार व लेखकाची तन्मयता यामुळे ती परिणामकारक झाली आहे. परंतु प्रतिभेने कलाकृतीचा घाट मात्र तिला दिला गेला नाही. प्रत्यक्ष जीवन कितीहि अद्भुत व आकर्षक असलें तरी त्याला कलेच्या माध्यमांतून रसिकांच्या समोर मांडतांना कल्पनेच्या साहाय्याने फुलविणें व रेखीव स्वरूप देणें जरूर आहे हें लेखकाने लक्षांत घेतलेलें दिसत नाही.

श्री. ह. श्री. शेणोलीकर हे वाङ्मयाचे चिकित्सक अभ्यासक म्हणून ओळखले जातात. 'मायणीची मंजुळा' ही कादंबरी लिहून त्यांनी आता एका निराळ्या दालनांत प्रवेश केला आहे. 'मायणीची मंजुळा' ही खेड्याच्या पार्श्वभूमीवरील एक साधी सरळ प्रेमकथा, किंबहुना श्री. क्षीरसागरांनी म्हटल्याप्रमाणे, कामकथा आहे. मी तर तिला सूडकथाहि म्हणेन. वासनांची तृप्ति न झाल्यामुळे चिडून व अपमानित होऊन एका तरुण, सुंदर पण व्यभिचारी स्त्रीने एका निष्पाप, कोवळ्या तरुणाला सूडाग्नींत कसें होरपळून काढलें याची ही कहाणी आहे. नाटकांत किंवा सिनेमांत शोभतील असे कांही प्रसंग व योगायोगांचा बराच उपयोग या गोष्टी लेखकाचा नवशिकेपणा दाखवितात. पण यापेक्षाहि या कादंबरींतील महत्त्वाची उणीव म्हणजे हेतुशून्यता व कोणत्याहि एका विशिष्ट दृष्टिकोनाचा अभाव ही होय. त्यामुळे कोणत्याहि पात्राविषयीच्या कोणत्याहि भावनेला व सहानुभूतीला उत्कट स्वरूप प्राप्त होऊं शकत नाही. असें असलें तरी स्वाभाविक वर्णनें,कांही सत्प्रवृत्त व कांही दुष्प्रवृत्त व्यक्तींचीं ठळक चित्रणें व रंजकता यांमुळे ही कादंबरी लक्ष वेधून घेते.

नवीन कादंबरीकारांत 'सुलताना' या कादंबरीचे लेखक श्री. रज्झाक यांचा उल्लेखहि करायला हवा. इंडोनेशियाच्या स्वातंत्र्यसंग्रामाच्या पार्श्वभूमीवर संतोष चौधरी–दोस्तांचे हस्तक म्हणून इंडोनेशियांत गेलेल्या हिंदी सैन्यांतील एक तरुण अधिकारी–व सुलताना ( इंडोनेशियन क्रांतिकारकांचें नेतृत्व करणारी एक तरुणी ) यांची प्रेमकथा रंगविली आहे. रोमांचकारी घटना व पार्श्वभूमीचें नावीन्य हीं या कादंबरीचीं प्रमुख आकर्षणें. परंतु कादंबरीच्या दृष्टीने त्रोटकपणा जाणवतो आणि संपूर्ण व्यक्तिदर्शनाची व व्यापक जीवनदर्शनाची अपेक्षा अपूर्णच राहते. लेखकाची पहिली कादंबरी या दृष्टीने मात्र ती खचितच आशादायक आहे.

नव्यांचें स्वागत येथेच थांबवून मी जुन्यांच्या समाचाराकडे आता वळतों. प्रा. ना. सी. फडके हे ज्येष्ठ व कांही बाबतींत श्रेष्ठ कादंबरीकार होत. अलीकडे प्रा. फडके यांच्या कादंबऱ्यांतून विवाहबाह्य व विवाहाशिवायच्या स्त्री-पुरुषसंबंधाला प्राधान्य मिळत चालल्याचें दिसतें. 'भरारी' व 'जहर' या दोन्ही कादंबऱ्यांतून त्याचें चित्रण जसें आढळतें तसेंच त्यांच्या ताज्या 'धोका' या कादंबरींतहि त्याला स्थान मिळालेलें दिसतें. आश्चर्याची व कांहीशी खेदाची गोष्ट अशी की, इतर अनेक कादंबरीकारांच्या कादंबऱ्यांतहि या विषयाला महत्त्वाचें स्थान मिळत चालल्याचें दिसतें. खुद्द ५९ सालांतील 'अमला,' 'काळ बदलतो आहे,' 'कलंदर' व 'मायणीची मंजुळा' इतक्या कादंबऱ्यांतून कमी–अधिक प्रमाणांत विवाहबाह्य संबंधाचें चित्रण आलेलें आहे; आणि पौराणिकतेचा बुरखा बाजूला सारला तर खांडेकरांच्या 'ययाति' या कादंबरींतहि हाच विषय दिसेल. कादंबरीकाराला कोणताहि

विषय वर्ज्य नसतो व नसावा हें मत मलाहि मान्य आहे; परंतु लेखकाच्या निश्चित दृष्टिकोनाच्या अभावीं कळत न कळत अशा विषयाकडे आरंभीं क्षमेच्या व सहानुभूतीच्या दृष्टीने पाहतां पाहतां जर वाचक पुढे उपेक्षेच्या व मग आवडीच्या दृष्टीने पाहूं लागला तर ती गोष्ट खचितच भयावह म्हटली पाहिजे व तिला जबाबदार लेखकच म्हटला पाहिजे.

'भरारी' या कादंबरीचा नायक मुकुंद मंत्री याचें प्रेम व विवाह यासंबंधीचें हें मत पाहा. "केवळ विवाह-बंधनाचा विच्छेद करतां येत नाही म्हणून जें स्त्रीपुरुष एकत्र राहतात ते व्यभिचार करतात. उलट त्यांचं परस्परांवर अतीव प्रेम आहे त्यांच्या एकत्र राहण्याला धर्मविधीच्या आधाराची किंचित् देखील गरज नाही." या मताप्रमाणेच त्याचं वर्तनहि होतं. एका इनामदाराचा हा मुलगा. कॉलेजच्या वसतिगृहांत असतांना त्याच्या खोलीवर काम करायला येणाऱ्या एका सुताराच्या मुलीवर—कावेरीवर—प्रेम करूं लागतो व पुढे तिच्याशीं विवाह केल्याशिवायच तिच्यासह राहूं लागतो. घरदार सोडावें लागल्यामुळे हा कलावंत लेखक केवळ लेखनावर उदरनिर्वाह करीत हलाखीचे दिवस काढतो. कांही काळ दमासगिरांशीहि त्याचा संबंध येतो. त्याने लिहिलेल्या कादंबरीवर व तिच्यावर आधारित चित्रपटावर, त्यांतील मतें पुरोगामी असल्यामुळे (व चित्रपटांतील कांही देखावे आक्षेपार्ह असल्यामुळे) टीका व बहिष्काराचें सत्र सुरू होतें व तो वाळींत टाकल्यासारखा होतो. अशा हलाखींतच त्याचा अंत होतो. पण त्याच्या मृत्यूनंतर मात्र त्याने लिहिलेल्या दुसऱ्या एका कथेवरील (ती पुरोगामी होती की नाही कळत नाही) चित्रपटाला राष्ट्रपतिपदक मिळतें व सतत पन्नास आठवडे चित्रपट चालल्याबद्दल थिएटरच्या व्यवस्थापकामार्फत लेखकाचा—त्याच्या मृत्यूनंतर—सत्कार करण्यांत येतो. असें हें या कादंबरीचें थोडक्यांत कथानक आहे. रूढीने त्याच्यावर कोणताहि जुलूम केलेला नसतांना मुकुंदाचें रूढिबाह्य वर्तन केवळ लहरीखातर असें वाटतें. एखाद्याला जिवंतपणीं छळायचें व मृत्यूनंतर त्याचा उदोउदो करायचा अशी समाजाची उफराटी रीत कांही नवीन नाही. परंतु मुकुंदाच्या वांट्याला असा खडतर छळहि आलेला दिसत नाही, किंवा मृत्यूनंतरचा त्याचा सत्कारहि मोठासा मातबर म्हणतां येत नाही. ज्या चित्रपटाची पूर्वी होळी झाली त्यालाच कालांतराने हा बहुमान मिळाला असेंहि न झाल्यामुळे समाजाची चूकहि नजरेंत भरत नाही. एकंदरीने समाजाविरुद्ध जाण्याला पुरेशीं कारणें व उदात्त ध्येय यांच्या अभावीं मुकुंदाचें चित्र परिणामकारक वाटत नाही. त्याची कीव येते पण सहानुभूति वाटत नाही.

याच कादंबरींतील मुकुंदाचे एक हितचिंतक व प्रथितयश कादंबरीकार जयंतराव भावे यांनी मुकुंदाच्या विचारसरणींतला दोष दाखविला आहे व बहुसंख्य लोकांच्या बाबतींत विवाह-बंधनाची आवश्यकता प्रतिपादिली आहे. परंतु कादंबरीच्या वाचनाने मुकुंदाचं उदाहरण अपवादात्मक आहे व त्याचे विचार एकांगी व आतेरेकी आहेत, असा ठसा सर्वसामान्य वाचकांच्या मनावर उमटतो काय व तसा तो उमटावा हें लेखकाला अभिप्रेत आहे की नाही हा प्रश्न आहे. फडक्यांच्या लेखनांतील चटकदारपणा व चित्रणांतील रेखीवपणा इ० सर्व गुण जमेला धरूनहि विषय व आशय या दोन्ही बाबतींत लेखकाच्या कल्पनेने फार उंच भरारी मारली आहे असें म्हणतां येत नाही.

प्रा. फडक्यांच्या अगदी अलीकडील 'धोका' या कादंबरींतहि विवाहबाह्य संबंधाला स्थान मिळालेलें आहे. अशा संबंधाच्या 'धोक्याचा' 'इशारा' देण्यासाठींच जरी ही कादंबरी त्यांनी लिहिली असली तरी धोक्याच्या जाणिवेपेक्षाहि अशा संबंधाच्या गोडीचाच ठसा वाचकांच्या मनावर जास्त उमटण्याचा संभव आहे.

मकरंद जोग हा एक तरुण व कर्तबगार इंजिनियर आणि अमला ही एका सेवानिवृत्त बड्या पोलिस अधिकाऱ्याची कॉलेजांत जाणारी मुलगी ही या कादंबरींतील नायक-नायिकांची जोडी आहे. अकल्पित भेट, पहिल्या भेटींतच चटका, त्याचें आकर्षणांत रूपांतर, ओढ, वाढत्या भेटीगांठी व शेवटीं 'तूं माझी होशील का ?' हा नायकाने नायिकेला विचारलेला प्रश्न इत्यादि सर्व नेहमीचे टप्पे नेहमीच्याच चटकदार व रंगतदारपणाने फडक्यांनी याहि कादंबरींत साधले आहेत; पण या कादंबरीचें नावीन्य पुढील टप्प्यांत आहे. नायकाने विचारलेल्या या प्रश्नाला सरळ उत्तर देण्याऐवजी आपल्या एका आत्याने लिहिलेल्या कादंबरीची प्रत पाठवून तें दिलें आहे, किंवा होकाराचें उत्तर देतांना या कादंबरीच्या द्वारा एका धोक्याची सूचना तिने दिली आहे असें म्हणतां येईल. कादंबरींतील या कादंबरीच्या नायक–नायिकांचें जीवन पुष्कळ अंशाने मकरंद-अमलाच्या जीवनाशीं जुळणारें असतें. त्यांतील नायक चंद्रवदन हाहि एका मोठ्या कारखान्यांतील कर्तबगार अधिकारी असतो. हंसा नांवाच्या एका श्रीमंत व्यापाऱ्याच्या मुलीशीं त्याचा प्रेमविवाह होतो; पण पुढे कामाचा व्याप वाढत जाऊन चंद्रवदन जसजसा त्यांत गुरफटत जातो तसतशी हंसा त्याच्यापासून दूर जाते व एकटेपणाचा भयाणपणा कमी करण्याच्या नादाने एका नृत्यशिक्षकाच्या संबंधांत येते; आणि शेवटीं एकीकडे विवाहाची निष्ठा व दुसरीकडे नवें आकर्षण यांच्या ओढाताणींतून सुटका करून घेण्यासाठीं आत्महत्या करते. अशा रीतीने बड्या अधिकाऱ्यांना व त्यांच्या भावी पत्न्यांना एका धोक्याची सूचना हंसाच्या उदाहरणाने दिलेली आहे.

हा धोका टाळण्यासाठी मकरंद जोगने आपल्या नोकरीचा राजिनामा दिला हें स्वाभाविक व योग्य झालें काय ? किंवा हंसाचें उदाहरणच अपवादात्मक नाही काय ? या प्रश्नांची मी येथे चर्चा करीत नाही. या कादंबरीवरील माझा सर्वांत मोठा आक्षेप हा आहे की, सुरवातीपासून तों शेवटपर्यंत तिचें आवाहन वाचकांच्या वासनांना आहे. कादंबरीचें आवाहन एकाच वेळीं बुद्धि, भावना, वासना, कल्पना या सर्वांना असतें व असूं शकतें. परंतु तिचें मुख्य व अंतिम आवाहन भावनेला असलें पाहिजे व तिने वाचकांच्या भावनेचें उन्नयन व सहानुभूतीचा विस्तार साधला पाहिजे. त्या दृष्टीने बव्हंशीं वासनेच्याच पातळीवर रेंगाळणाऱ्या व पुनःपुन्हा तिलाच चाळविणाऱ्या या कादंबरीचा दर्जा खालचाच मानला पाहिजे.

फडक्यांच्या 'कलेकरिता कला' या मतांत मला फारशी उणीव दिसत नाही. कलेचं स्वातंत्र्य मला मान्य आहे. फडक्यांच्या कलागुणांचा मला परिचय असून त्यांचा मी चाहता आहे. कथेची मनोहर गुंफण, व्यक्तींचं जिवंत चित्रण, चटकदार संवाद व सहजसुंदर शैली हे त्यांच्या कादंबऱ्यांचे ठळक गुण फार महत्त्वाचे आहेत. पण तरीहि फडक्यांची कादंबरी वाचून अंतःकरण सखोल सहानुभूतीनं फारसं हलत नाही की उदात्त भावनेने तें भरून जात नाही. याला कारण कलावंत या नात्यानं त्यांनी ठेवलेली अतिरेकी अलिप्तता व मुख्यतः वासनांच्याच पातळीवरील आवाहन हेंच होय असें मला वाटतें.

'धोका' या कादंबरींत प्रा. फडक्यांनी एका धरणाच्या बांधकामाची पार्श्वभूमि घेतली आहे, तर श्री. गो. नी. दांडेकरांनी भाकडा व नंगल येथे शतद्रु नदीवर बांधलेल्या प्रचंड धरणाच्या इतिहासालाच आपल्या 'आम्हां भगीरथाचे पुत्र' या कादंबरीचा विषय बनविला आहे. रूढ अर्थाने ही ऐतिहासिक कादंबरी नाही; परंतु तिच्यांतहि सत्य व कल्पित यांचं मिश्रण झालेलं आहे. या धरणाच्या योजनेचा हा इतिहास सादर करतांना श्री. दांडेकरांनी एक कथानक उभें केलें आहे. भाकड्याच्या पंडितजीचा–गीतारामचा–मुलगा जीवन हा या कथेचा नायक. एंजिनियर व्हावयाचें व शतद्रूवर धरण बांधून पंजाबच्या निपाण्या प्रदेशाला

व राजस्थानच्या मरुभूमीला जलसिंचित करून तेथे नंदनवन फुलवावयाचें हें त्याचें जीवित-ध्येय. अनेक अडचणींना तोंड देऊन व अनेक मित्रांच्या साहाय्याने त्याने शेवटीं आपलें ध्येय पूर्ण केलें. ब्रिटिशकालीन क्रांतिकारकांच्या चळवळीचा एक भागहि या कथेंत गुंफला गेला आहे. अनेक सुखदुःखांचे प्रसंग चांगले चित्रिले आहेत. जीवन, जोगेंद्र, अर्जुन अशीं कांहीं व्यक्तिचित्रेंहि चांगलीं आहेत. जीवनच्या पत्नीचें–विनयवतीचें-चित्र विशेष लक्ष वेधून घेतें. पडद्याआडचं शांत, सोशिक व त्यागी जीवन तिच्या रूपाने साकार झालें आहे. कादंबरीचा विषय नवीन आहे. नवीन प्रदेशाची पार्श्वभूमि त्याला लाभली आहे. त्यामुळे एका नवीन जीवनाची व त्यातील सुखदुःखाची नवी जाणीव उत्पन्न होते. हें सर्व खरें असलें तरी मोठा कालखंड, त्यामुळे टप्प्याटप्प्याने पुढे जाणारें कथानक, निवेदनात्मक पद्धतीने पुष्कळसा भाग उरकणें इ० कारणांमुळे कादंबरीचा कांहीं भाग कंटाळवाणा झाला आहे. संवादावर वाजवी-पेक्षा जास्त भर देण्याचा दोषहि या कादंबरींत दिसतो. या सर्व गोष्टी जमेला धरून एकीकडे दांडेकरांचें अभिनंदन करीत असतांनाच दुसरीकडे प्रस्तुतसारखे विषय कादंबरीच्या माध्यमांत चपखलपणें बसूं शकत नाहीत व म्हणून त्यांचा पार्श्वभूमीदाखल उपयोग करणेंच अधिक श्रेयस्कर असें सुचवावेंसें वाटतें.

दांडेकरांची कादंबरी विषयनिष्ठ तर श्री. पेंडसे यांची कादंबरी 'कलंदर' ही व्यक्तिनिष्ठ आहे. पावणेपांचशे पानांची ही कादंबरी म्हणजे 'हत्या' चा उत्तरार्ध आहे. मराठींतील बहुतेक 'उत्तरार्ध कादंबऱ्या 'प्रमाणेच हीहि पूर्वार्धाच्या तुलनेंत नीरसच उतरली आहे. 'हत्या' हा लहानपणापासूनच दुर्दैवी. लहानपणीं एका मित्राच्या–गुंड्याच्या–संबंधांत किटाळ येऊन वयाच्या १५व्या वर्षी तो मुंबईला पळून आला. पण दुर्दैवाने त्याचा तेथेहि पाठपुरावा केला. शेजाऱ्याच्या गरीब मुलीवर उपकार करण्याचा परिणाम मुलगी पळविण्याचा आरोप येऊन गुन्हेगार ठरण्यांत झाला. हत्या एक सामान्य मुलगा; पण त्याच्यांत मुलखावेगळी माणुसकी होती. स्वतः हालअपेष्टांत असतांहि इतरांच्या हालअपेष्टा कमी करण्यासाठी तो धडपडत होता. या स्वभावापायीं त्याला विलक्षण अनुभव आले व जगांतील चांगुलपणा-वरील विश्वास उडून जाण्याची पाळी त्याच्यावर आली! हत्याचे विलक्षण अनुभव, त्याचे बदलणारे मनोविकार व त्याच्या जीवनांतील खळबळ तपशिलाने व बारकाईने लेखकाने रंगविलीं आहेत. कादंबरीचा पहिला बराचसा भाग कंटाळवाणा वाटतो. अनावश्यक तपशील व पाल्हाळ कमी केला असता तर कादंबरी अधिक रेखीव व रोचक झाली असती.

'ययाति' ही श्री. खांडेकरांची कादंबरी 'पौराणिक' म्हणून विशेष कुतूहल उत्पन्न करणारी आहे. पौराणिक नाटकें मराठींत बरींच झालीं. पण पौराणिक कादंबऱ्या मात्र अगदीच नगण्य. त्या दृष्टीने खांडेकरांचा हा प्रयत्न स्वागतार्ह आहे. मात्र 'ययाति' ही शुद्ध पौराणिक कादंबरी नाही. पुराणांतील एका उपाख्यानांतील कथासूत्राचा आधार घेऊन लिहिलेली ती स्वतंत्र कादंबरी आहे असा लेखकाचा दावा आहे व कांहीं प्रमाणांत व कांहीं बाबतींत तो खरा आहे.

'ययाति' हा खांडेकरांना आजच्या सर्वसामान्य मनुष्याचा पुराणकालीन प्रतिनिधि वाटतो. विविध सुखें मिळूनहि अतृप्त राहणारा व नवनव्या सुखाच्या मागे आंधळे-पणाने धावणारा. देवयानी, शर्मिष्ठा व कच या पात्रांच्या स्वभावकल्पनेंतहि खांडेकरांनी बदल केला आहे. कचावरच्या पहिल्या प्रेमाला विसरूं न शकलेली व म्हणून ययातीवर खरें प्रेम करूं न शकणारी, अशी ही देवयानी आहे. केवळ वासनेच्या आहारीं जाऊन ययातीशीं संबंध ठेवणारी खांडेकरांची शर्मिष्ठा नसून, ज्ञातीसाठीं त्याग करणारी व ययातीला उत्कट प्रेम

देणारी अशी ती आहे. कच हा सर्वांवर निरपेक्ष प्रेम करणारा ' विकसित आत्मा ' आहे. त्याचें उत्तरचरित्र संपूर्णतः काल्पनिक असें खांडेकरांनी रंगविलें आहे.

ययाति, शर्मिष्ठा, देवयानी, कच, यांच्या रूपाने प्रेमाचे विविध प्रकार रंगविणें एवढेंच खांडेकरांचें ध्येय नाही. शर्मिष्ठेची प्रेमकथा किंवा ययातीची कामकथाच त्यांना रंगवायची नाही, तर नेहमीप्रमाणे याहि कादंबरीच्या द्वारा आजच्या समाजस्थितीचें चित्रण व आजच्या सामाजिक समस्येचें सूचन त्यांना करावयाचें आहे. परंतु नेहमीप्रमाणेच तें त्यांना साधलेलें नाही. ययातीच्या चित्रणांत आजच्या सर्वसामान्य मनुष्याचें दर्शन घडणें लेखकाने ' पार्श्व-भूमींत ' दिलेल्या दिव्य चक्षूशिवाय शक्य नाही. ' क्रौंचवधा ' प्रमाणेच ' ययाति ' हि लेखकाचा अभिप्रेत आशय व्यक्त करण्यास असमर्थ ठरली आहे. ययाति, देवयानी व शर्मिष्ठा यांनी केलेलीं आत्मनिवेदनें आलटून पालटून दिलीं आहेत. ही पद्धति अगदीच मिळमिळीत वाटते. पौराणिक वातावरण व एका सम्राटाच्या वैभवाचें व जीवनाचें चित्रण करण्याला लेखकाची प्रतिभा असमर्थ ठरली आहे. कदाचित् आधुनिकतेचा साज चढविण्याच्या भरीला पडण्याचाहि हा परिणाम असेल. या उणीवा सोडल्या तर कांही प्रसंगांच्या चित्रणांतील कल्पकता, मनोविश्लेषणांतील कौशल्य इत्यादीमुळे कादंबरी वाचनीय झाली आहे.

' रुक्मिणी ' हें श्री. माडखोलकरांच्या कादंबरीचें नांव पौराणिक वाटण्यासारखें असलें तरी वस्तुतः ती तशी नाही. ' नागपूर प्रांतांतल्या ज्या जुन्या प्रतिष्ठित मध्यमवर्गाचा आज झपाट्याने ऱ्हास होत चालला आहे त्याच्या जीवनाचें वर्णन करण्याचा हा प्रयत्न आहे ' असें लेखकाने म्हटलें असलें तरी श्रीमंत, व्यसनी, विलासी व रंगेल जीवनाचेंच—नागपुरांतीलच एका श्रीमंत घराण्यांतील व्यक्तीचें व कांही बड्या अधिकारी व राजकारणांतील व्यक्तींचें—चित्रण या कादंबरींत फारच थोड्या आडपडद्याने केलें आहे. मध्यप्रांत—वऱ्हाडांतील राजकारण माडखोलकरांनी आपल्या आरंभीच्या कादंबऱ्यांत रंगविलें होतें. ही कादंबरी राजकीय नसली तरी तिच्यांतहि उत्तरार्धांत राजकारणाचें वर्णन बरेंच आलें आहे. त्याच्या जोडीला क्लबांतील बेबंद व बेहोष जीवनाचें वर्णनहि भरपूर आलेलें आहे.

महाराज ( श्रीमंत घराण्यांतील व्यसनी पण कर्तबगार गृहस्थ ), रुक्मिणी ( महाराजांची पहिली पत्नी ) व उर्मिला ( महाराजांची तिसरी पत्नी ) एवढींच यांतील प्रमुख पात्रें. त्यांच्या जोडीला चीफ सेक्रेटरी, गृहमंत्री, दारूमंत्री इ० अनेक व्यक्ति यांत आहेत. ' रुक्मिणी ' या नांवावरून रुक्मिणीला कथानकांत प्राधान्य असेल असा समज होतो; परंतु महाराज, उर्मिला व राजकारण—क्लबकारण—यांनीच कादंबरीचा मोठा भाग व्यापला आहे. रुक्मिणी आपल्या संयमी, त्यागी व व्रतस्थ जीवनाने लक्ष वेधून घेते. परंतु लेखक तिच्या अंत:करणांत फार खोल शिरूं शकला आहे असें वाटत नाही. याचें कारण लेखकाची भूमिका छायाचित्रकाराची व त्याहीपेक्षा वृत्तान्त-कथकाचीच मुख्यत: आहे.

प्रत्यक्षांतील व्यक्ति व घटना यांना फारच थोडया व जुजबी फेरफाराने कादंबरींत दाखल करणें नीतीच्या दृष्टीने गैर व कलेच्या दृष्टीने गौणच म्हणावें लागेल. कादंबरींतील पात्रें व्यक्ति-विशिष्ट असूनहि मानवसामान्य व प्रातिनिधिक असावीं लागतात. त्यासाठी कल्पिताचा चांगलाच आधार घेणें जरूर असतें. व्यक्ति काय किंवा घटना वा प्रसंग काय कल्पिताच्या साहाय्याने परिपुष्ट झाल्याशिवाय त्यांना कलात्मकता प्राप्त होत नाही. प्रस्तुत कादंबरीच्या बाबतींत कलाकृति निर्माण करण्याची लेखकाची भूमिकाच दिसत नाही.

ज्येष्ठ कादंबरीकारांत श्री. पु. य. देशपांडे यांची गणना होते. दीड तपाहून अधिक काळ देशपांडे यांनी कादंबरीलेखन सोडल्याला लोटला. पण या वर्षी आकस्मिकपणें त्यांची

एक कादंबरी—' आहुति '—प्रकाशित झालेली पाहून विस्मय वाटला व कुतूहल जागृत झालें. पण कादंबरी-वाचनाने मात्र पूर्ण निराशा झाली. कादंबरींत बौद्धिक चर्चांना वामनराव जोशांनी प्रथम आणून सोडलें. पुढे अनेक कादंबरीकारांनी या गोष्टीचा कमी-अधिक प्रमाणांत ( गैर- ) उपयोग केला. स्वतः पु. य. देशपांडे यांच्याच ' विशालजीवन ' या कादंबरींत समाजवादावरील चर्चा व व्याख्यानें कांही कमी आलेलीं नाहीत. परंतु प्रस्तुत ' आहुति ' कादंबरीने या बाबतींत नवा विक्रम केला असून, शुष्क शास्त्रीय चर्चा कादंबरीच्या प्रकृतीला मानवत नाही हें पूर्णपणाने सिद्ध करून दिलें आहे. " स्थलकालपरिस्थितीने आपाततः घडविल्या गेलेल्या पिंडाला चिच्छक्तीच्या स्पर्शांमुळे आमूलाग्र हादरा बसल्याशिवाय आणि जीवभाव विश्वभावांत सहजपणें विसर्जित होऊं शकल्याशिवाय पिण्ड व ब्रह्माण्ड यांच्यांतील प्रकृतिसिद्ध अशा संबंधाचें यथार्थदर्शन घडणें अशक्य आहे. असें दर्शन घडणें हाच मानवाचा परम पुरुषार्थ आहे " अशा प्रकारचें प्रमेय कादंबरीच्या द्वारा लेखकाला मांडायचें आहे. त्यासाठी कथानकाचा एक निर्जीव सांगाडा लेखकाने कसाबसा उभा केला आहे, व आगापिच्छा नसलेल्या कांही पात्रांच्या तोंडून वेदान्त वदविला आहे. संतांच्या चरित्रांतहि आढळणार नाहीत असे कांही चमत्कारहि या वेदान्तपर प्रबंधांत आढळतात. माडखोलकरांच्या ' भंगलेल्या देवळां'तील ' प्लेटॉनिक लव्ह 'लाहि मागे टाकील असें ' वेदान्त प्रेम 'हि या कादंबरींत (!) आहे. ईशा ( स्वतः निवेदक ), विद्या ( त्याचा मित्र ), आहुति ( विद्याची प्रेयसी ), नित्यानंद ( ' खिनेसृष्टि ' साताहिकाचा संपादक ) इ० सर्वच पात्रें एकजात वेदान्ती असून त्यांच्या वेदान्तपर दीर्घ भाषण-संभाषणांतून वाट काढतां काढतां वाचकांचीच ' आहुति ' पडण्याचा प्रसंग येतो. कादंबरी लहान असल्यामुळेच तो टळतो. लहानपणा हाच या कादंबरीचा (?) सर्वांत मोठा व एकमेव गुण.

श्री. दत्त रघुनाथ कवठेकर यांची ' रुपेरी कडा ' ही या वर्षीच्या सर्व कादंबऱ्यांत कलाकृति म्हणून श्रेष्ठ ठरेल. पांचशेच्यावर पृष्ठें असूनहि कोणत्याहि क्षणीं कंटाळवाणी न वाटणारी व शेवटपर्यंत वाचकांच्या मनावरील आपली पकड कायम ठेवणारी अशी ही कादंबरी आहे.

आबासाहेब कुबेर हा गरिबींतून वर येऊन भल्याबुऱ्या मार्गानं श्रीमंत झालेला कंजूष व व्यवहारी माणूस. वेणू व क्षमा या त्याच्या पहिल्या बायकोच्या दोन मुली. सुंदर पण स्वच्छंदी. वेणू बुद्धीने मंद व छानछोकी. क्षमा बुद्धिमान्, वेणूपेक्षाहि सुंदर, हट्टी व स्वतंत्र वृत्तीची. वेणूचें लग्न आबासाहेबांनी मोठ्या धोरणाने P. W. D. तील एका लाच खाऊन श्रीमंत बनलेल्या कंजूष अधिकाऱ्याच्या कुरूप व मतिमंद मुलाशीं—राजाभाऊशीं—जमवून दिलें. या लग्नाचा परिणाम राजाभाऊच्या अधिकच उल्लू बनण्यांत व वेणूच्या अधिक चेंढेल व आळशी बनण्यांत झाला. क्षमेचं शिक्षण चालू होतं. तिच्याहि लग्नाची खटपट सुरू झाली. नायगावच्या देशमुखाचा सुशिक्षित मुलगा सुधाकर याचें स्थळ हेरण्यांत आलें. सुधाकर हुशार व देखणा होता. त्याचें कुटुंब मोठें व एकत्र होतें. वाडा, मळा, बाग, गिरणी व शेतजमीन अशा भरपूर इस्टेटीचा तो मुख्य हिस्सेदार होता; परंतु लहानपणींच आईवडील वारल्यामुळें त्याचा सांभाळ काकाकाकींनी केलेला होता. त्यांतहि काकीचा अधिकार कुटुंबांत मोठा होता. अखेर क्षमा व सुधाकर यांचा विवाह झाला व क्षमा सास्वा-सासरे, जावा-नणंदा, दीर, त्यांचीं मुलें यांनी भरलेल्या मोठ्या कुटुंबांत दाखल झाली. ती सर्वांना आवडली होती. हळूहळू ती त्या घरांत रुळलीहि असती; परंतु पाठराखण म्हणून, मागे लागून आलेल्या वेणूने आपल्या चमत्कारिक वागण्याने व विषारी

जिभेने तेथे विरोधाचें वादळ सुरू केलें. क्षमेच्या मूळच्या हट्टी व स्वतंत्र वृत्तीमुळे व सुधाकराच्या करारी व ध्येयवादी स्वभावामुळे पतिपत्नींतील अंतर वाढत गेलें व पहिल्या अपत्याच्या जन्मानंतर लवकरच क्षमा घर सोडून निघाली. पुढे तिने हट्टाने घटस्फोटहि मिळविला. सहासात वर्षांनंतर अचानकपणें आपल्या मुलाची व पतीची गाठ पडल्यानंतर क्षमेच्या मनांत पुन्हा विविध विचारांचे व भावनांचें वादळ सुरू झालें. सुधाकराच्या संमतीने ती परत नायगावला येऊन राहिली. परंतु सुधाकर तिच्याकडे केवळ आपल्या मुलाची आई एवढ्याच दृष्टीने पाहत असल्यामुळे ( व तेथील एकंदर परिस्थितीमुळे ) तिला तेथे राहणें असह्य होतें. आपल्या पूर्वीच्या वागण्याचा तिला पश्चात्ताप होतो पण वेळ निघून गेलेली असते. शेवटीं तें घर कायमचं पुन्हा सोडण्याचा ती निश्चय करते. पण या प्रसंगीं आंतल्याआंत स्वतःहि यातना सहन करणारा सुधाकर तिला अडवतो व अशा रीतीने पतिपत्नींचें पुनर्मीलन होतें. कथानकाचा हा शेवट किंचित् नाटकी वाटला तरी उत्कट व परिणामकारक आहे.

एकत्र कुटुंब, विभक्त कुटुंब, पतिपत्नींची समानता, स्त्री-स्वातंत्र्य, विवाह व विच्छेद, पत्नी व माता इ० अनेक कौटुंबिक व सामाजिक प्रश्नांना या कादंबरींत कलेच्या नाजूक हाताने व परिणामकारकपणें हाताळलें आहे. पण या कादंबरीचं श्रेष्ठत्व हे प्रश्न हाताळण्यावरच केवळ अवलंबून नाहीं; किंबहुना हे प्रश्न जाणीवपूर्वक हाताळल्याचा पुसट देखील भास कादंबरी वाचतांना होत नाहीं. कलात्मक चित्रणांतून आपोआप झालेलें तें समस्यासूचन आहे. कलाकृति म्हणून या कादंबरीचा मोठेपणा कथानकाच्या स्वाभाविक परिपोषांत व विविध व्यक्तींच्या वास्तव व जिवंत चित्रणांत आहे. आपट्यांच्या कादंबऱ्यांनंतर विशाल जीवनपट मराठी कादंबरींतून लुप्तच झाल्यासारखा झाला होता. कवठेकरांच्या या कादंबरींत विविध व विपुल पात्रांना आपापल्या स्वभाव-वैशिष्ट्यांसह विशाल कथानकांत वावरतांना पाहून एक हरवलेलं कादंबरीचं विश्व गवसल्याचा आनंद वाचकांना होतो. आपट्यांच्याच कादंबऱ्यांचा आणखी एक महत्त्वाचा गुणविशेष मला या कादंबरींत आढळतो; तो म्हणजे वास्तवता व आदर्शवाद यांचा मनोहर संगम.

दीर्घकाल स्मरणांत राहतील व वाचकांना मनांत घोळवाविशीं वाटतील अशीं अनेक वास्तव व जिवंत पात्रें कवठेकरांनी या कादंबरींत निर्माण केलीं आहेत व ते या कादंबरीचं मोठंच वैभव आहे. व्यक्तिदर्शनाप्रमाणेच कथानकाचा परिपोष करण्यांतहि श्री. कवठेकरांनी असामान्य कौशल्य दाखविलें आहे. उपकथानकांचा समावेश करून कथानकाला भरीवपणा आणण्यांतहि त्यांनी चांगलें यश संपादन केलें आहे. या कादंबरींतील खेळकर, मोकळ्या, स्वाभाविक, अर्थवाही व प्रत्ययोत्पादक शैलीचाहि आवर्जून उल्लेख करायला हवा. "कलात्मक रंजन, भावनांचें आवाहन, सामाजिक शिकवण आणि सूक्ष्म किंवा विशाल जीवनदर्शन अशा अनेक चढत्या पातळ्यांवर चांगली कलाकृति एकाच वेळीं विहार करूं शकते" असें श्री. खांडेकर म्हणतात. कवठेकरांची ही कादंबरी अशा श्रेष्ठ कलाकृतींपैकीच एक आहे.

ज्यांचा प्रामुख्याने परामर्श घेणें आवश्यक होतें अशा ५९ सालांतील या एवढ्याच कादंबऱ्या. उरलेल्यांचा धावता आढावा वा ओझरता उल्लेख केला तरी चालण्यासारखें आहे. त्यांपैकी कित्येकांना कादंबरी म्हणणेंहि रास्त होणार नाही.

'गेल्या बारा वर्षांतील राजकीय उत्पातांचे पडसाद मराठी साहित्यांत उठलेच नाहीत' असें विधान अलीकडेच पं. महादेवशास्त्री जोशी यांनी केलें होतें. त्याला प्रा. फडके यांनी आपल्या एका लेखांत सविस्तर उत्तरहि दिलें आहे. या संदर्भांत या वर्षीच्या कांहीं कादंबऱ्यांचा उल्लेख करण्यासारखा आहे. दांडेकरांच्या कादंबरीचा उल्लेख वर आलाच आहे.

त्याखेरीज श्री. स. शं. देसाई यांची 'आहुति', कृ. मु. उजळंबकर यांची 'आम्ही असे लढलों', व कृ. शं. कुलकर्णी यांची 'काळ बदलतो आहे' या तीन कादंबऱ्यांचा उल्लेख करायला हवा. देसाई यांची 'आहुति' ही कादंबरी पूर्वीच्या हैद्राबाद संस्थानांतील रझाकार चळवळीच्या पार्श्वभूमीवर असून बीदर व उस्मानाबाद या दोन जिल्ह्यांतील अज्ञात हिंदु वीरांनी मुक्तिसैन्य उभें करून त्या चळवळीला कसें तोंड दिलें याचा रोमहर्षक वृत्तान्त तींत आला आहे. कथा-परिपोष व व्यक्तिचित्रण यांच्याकडे लक्ष पुरविलें नसल्यामुळे कादंबरी म्हणून ती कमी महत्त्वाची ठरते. पण रोमहर्षक घटनांमुळे वाचनीय झाली आहे. श्री. उजळंबकरांची 'आम्ही असें लढलों' ही कादंबरी भारतांतील इतर प्रदेशांप्रमाणेच वऱ्हाडने इंग्रजांशीं जो स्वातंत्र्यलढा दिला त्याचा कथात्मक वृत्तान्त सादर करणारी आहे. लढ्याची पार्श्वभूमि १८५७ च्या स्वातंत्र्यसमरापासून घेतली आहे. परंतु मुख्य भाग ४२ च्या चळवळीनें व्यापला आहे. कादंबरीच्या दृष्टीने कांही अंगें अविकसित राहिलीं असलीं तरी ओघवत्या शैलीने व गतिमान् चित्रणाने स्वातंत्र्य-संग्रामाचा आढावा घेण्यांत व त्याला वाचनीय बनविण्यांत लेखकाला यश मिळालें आहे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर संस्थानांच्या विलीनीकरणाचें जें पर्व सुरू झालें त्याची पार्श्वभूमि घेऊन श्री. कृ. शं. कुलकर्णी यांनी 'काळ बदलतो आहे' ही आपली पहिलीच कादंबरी लिहिली आहे.

श्री. पां. गो. लोहकरे यांच्या दोन कादंबऱ्या या वर्षी प्रकाशित झाल्या आहेत, परंतु एकीलाहि 'कादंबरी' म्हणतां येणार नाही. 'तें जग वेगळेंच आहे' यांत छत्तीस वर्षे Clerk of the Court च्या हाताखाली उमेदवारी करून निवृत्त झालेल्या एका उमेदवाराने कोर्टाच्या जीवनांत आपणांला दिसलेले कांही प्रसंग व कांही व्यक्ति यांचें वर्णन केलेलें आहे. 'शुभमंगल सावधान' या त्यांच्या दुसऱ्या कादंबरींत विवाहविषयक कांही समस्या मांडण्याचा व सोडविण्याचा कृत्रिम खटाटोप केला आहे.

श्री. चंद्रकांत काकोडकर यांची 'अमला' ही कादंबरी सुद्धा पूर्ण विकसित कादंबरी नसून एकेरी वाढीची दीर्घ कथाच आहे. प्रेम एकीवर व विवाह दुसरीशीं अशा आपत्तींत सापडलेल्या एका तरुणाच्या व त्याच्या पत्नीच्याहि आयुष्यांत निर्माण झालेली समस्या यांत चित्रिली आहे. एक वाचनीय प्रेमकथा असें तिचें वर्णन करतां येईल. अं. शं. अग्निहोत्री यांची 'खुपणारं सुख' ही एका ध्येयवादी, त्यागी व स्वतःच आखून घेतलेल्या मार्गानं जाणाऱ्या सत्प्रवृत्त गृहस्थाची शोककथा लक्ष वेधून घेणारी आहे. अंबादास अग्निहोत्री यांची 'तात्या देवकुटे' ही कादंबरी नसून एका कारकुनाचें शब्दचित्राच्या पद्धतीने काढलेलें लहानसें जीवनचित्र आहे. श्री. उद्धव ज. शेळके यांच्या 'नांदतं घर' या कादंबरीलाहि दीर्घकथा हेंच नांव योग्य होईल. एका अविभक्त कुटुंबाच्या सुखदुःखाची कथा शेळक्यांनी चांगली रंगविली आहे. संवादावर वाजवीपेक्षा जास्त भर दिल्यामुळे तिला श्रुतिकेचें स्वरूप येऊं पाहत आहे. 'वैशाख' ही श्री. माधव कानिटकरांची पहिलीच कादंबरी आहे. ती एक साधी प्रेमकथा असून तिला सरस करण्याचा त्यांनी बराच प्रयत्न केला आहे. कथा व कादंबरी यांच्यांतील मूलभूत भेद त्यांनी लक्षांत घ्यायला हवा, तरच त्यांना या नव्या क्षेत्रांत यशाची अपेक्षा करतां येईल.

श्री. वि. वि. बोकील हे कथाकार व कादंबरीकार म्हणून प्रसिद्धच आहेत. त्यांनी 'प्रीति वहीण भक्तीची' ही कादंबरी इतकी थोडक्यांत ( केवळ ९६ पृष्ठें ) कां आटपावी हें कळत नाही. आहे त्या स्वरूपांतहि ती चित्तवेधक आहे. तिच्यांत कादंबरीची सामग्री आहे.

योग्य परिपोषाच्या अभावीं एका चांगल्या कादंबरीला मराठी वाचक मुकला आहे. 'मायेचे कढ ' ही श्री. कृ. मु. उजळंबकरांची या वर्षीची दुसरी कादंबरी. लहानशीच व कांहीशी बाळबोध वळणाची ही कादंबरी त्या वृत्तीच्या कांही वाचकांना आवडण्यासारखी आहे.

१९५९ सालांतील कादंबऱ्या या अशा आहेत. या कादंबऱ्यांच्याकडे साकल्याने पाहिलें असतां काही गोष्टी लक्षांत येतात. थोड्याच वर्षांपूर्वी ललित वाङ्मय हें शहराकडून खेड्याकडे, सुशिक्षितांकडून अशिक्षितांकडे, मध्यम व उच्च वर्गाकडून कनिष्ठ वर्गाकडे झपाट्याने वाटचाल करूं लागलें होतें. प्रत्येक वाङ्मयप्रकारांत याला अपवाद होते. परंतु ती एक 'टूम' होऊं पाहत होती. ५९ सालांतील बहुतेक कादंबऱ्यांतून सुशिक्षित व सुस्थितींत असलेल्या नागर पांढर-पेशा वर्गाचें चित्रणच आलेलें दिसतें. ही गोष्ट चांगली किंवा वाईट हा प्रश्न नाही. त्यासाठी हा उल्लेखहि केला नाही. मात्र कोणत्याहि 'टुमी'च्या आहारीं जाणें व जिवंतपणा आणि कला-त्मकता हीं विशिष्ट समजाच्याच चित्रणांत असूं शकतात असें मानणें, या गैरसमजांतून लेखक-वर्ग बाहेर पडत आहे ही गोष्ट योग्यच म्हटली पाहिजे.

दुसरी नजरेंत भरण्यासारखी गोष्ट म्हणजे, कांही मोजक्याच का होईना, कादंबऱ्यांचा प्रचंडपणा. सर्वच बाबतींत संकोच व लघुता हें अलीकडील काळाचें बोधचिन्ह होऊन बसलें आहे. कादंबरी या प्रकारालाहि याची बाधा झाल्याशिवाय राहिली नाही. हरिभाऊ आपट्यांच्या काळची पांचशेच्या घरांतली पृष्ठसंख्या कमी होतां होतां दोनशे सव्वादोनशेपर्यंत संकोच पावली होती. कांहींनी तर त्याच्याहि खाली घसरगुंडी सुरू केली होती. ५९ सालांतीलच कित्येक कादंबऱ्यांनी आपला पसारा शे-सव्वाशे पानांत आटोपलेला दिसतो. या पार्श्वभूमीवर 'रुपेरी कडा,' 'कलंदर,' 'आम्ही भगीरथाचे पुत्र,' 'ययाति ' यांसारख्या पांचशेच्या घरांत पृष्ठ-संख्या नेणाऱ्या कादंबऱ्या नजरेंत भरल्याशिवाय राहत नाहीत. 'लघुता ' हें जसें लघु-कथेचें बाह्य परंतु तरीहि महत्त्वाचें वैशिष्ट्य होय, तसेंच भव्यता, भरीवपणा हें कादंबरीचें बाह्य असलें तरी महत्त्वाचें वैशिष्ट्य होय. या महत्त्वाच्या वैशिष्ट्याकडे कादंबरीकारांचें लक्ष गेलें (त्यांच्या प्रतिभेंत तेवढें सामर्थ्य आलें) व प्रकाशकांनीहि या वैशिष्ट्याच्या आविष्काराला अडथळा केला नाही म्हणून ते दोघेहि अभिनंदनास पात्र आहेत.

याच संदर्भांत — पुन्हा ५९ सालांतील कादंबऱ्यांच्याकडे पाहून सुचणाराच — एक मुद्दाहि येथेच चर्चिणें आवश्यक आहे. कादंबरी व कथा यांच्यांतलि मूलभूत भेद, हा तो मुद्दा होय. हा भेद लक्षांत न घेतल्यामुळेच कित्येकांनी आपल्या कथेला कादंबरीच्या सदरांत ढकललें आहे व त्यामुळेच वाचक-टीकाकारांवरहि त्या कथेला कादंबरी मानण्याची आपत्ति आली आहे. कादंबरी व कथा यांच्या सीमारेषा काटेकोरपणाने ठरावेिणें कठीण आहे, याची मला जाणीव आहे. तितक्या काटेकोरपणें त्या ठरविण्याची आवश्यकता नाही हें म्हणणेंहि मी मान्य करतों. परंतु हल्लीच्याप्रमाणे अगदीच ढोबळपणा व भोंगळपणाहि नको. कथेची वाढ एकांगी असते, तिची वीण एकेरी असते व तिचा वाचकांच्या मनावर होणारा संस्कारहि एकेरी असतो. उलट कादंबरीच्या कथनकाचा परिपोष अनेक अंगांनी व्हावा लागतो. तिच्या कथानकांत कथोपकथांच्या अनेक धाग्यांची गुंफण व्हावी लागते, व मुख्य म्हणजे तिच्या द्वारा होणारें जीवनदर्शन सखोल व व्यापक असावें लागतें. या गोष्टी साधण्यासाठी साहजिकच कादंबरीचा विस्तार व व्याप मोठा असावा लागतो. लघुकथेपेक्षा विस्ताराने कितीहि दीर्घ असली तरी ती जर एकेरी असेल व एकांगी वाढीची असेल तर ती कथाच म्हणावी लागेल. तिला फार तर दीर्घ, प्रदीर्घ अशीं विशेषणें लावावीं; पण तिला कादंबरी म्हणूं नये. तें नांव अधिक व्यापक, भरीव, भक्कम व भव्य अशा प्रकारासाठी राखून ठेवणेंच उचित होईल. एखाद्या

टुमदार बंगलीला ‘ प्रासाद ’ हें नांव देणें बंगलीच्या मालकाच्या दृष्टीने आत्मगौरवाचें ठरलें तरी भाषेच्या अचूक अर्थवाहित्वाला बाधा आणणारेंच तें जसें ठरेल, तसेंच शे-सव्वाशे पानांच्या कोणत्याहि कथेला कादंबरी हें नांव देणें ठरणार आहे.

वास्तवाचा कादंबरीला आधार असतो व असावा हें खरें असलें तरी तो एका विशिष्ट मर्यादेपर्यंत व विवक्षित स्वरूपाचाच असावा हें मुद्दाम सांगण्याची आवश्यकता ‘ रुक्मिणी ’, ‘ फकिरा ’ यांसारख्या कांहीं कादंबऱ्यांच्या संदर्भांत जाणवते. प्रत्यक्षाचा जसाचा तसा उपयोग करणें यांत कला नाहीं. प्रत्यक्षांतील अनुभव मनांत घोळवून व रुजवून, तसेंच त्याला कल्पनेने खुलवून फुलवून मगच त्याचा आविष्कार करण्यांत खरी कला आहे. कादंबरीकाराची भूमिका छायाचित्रकाराची किंवा वृत्तान्तलेखकाची नसून नवनिर्माणकाराची आहे याचा विसर कादंबरीकारांनी पडूं देऊं नये.

कादंबरीला कोणताहि विषय वर्ज्य नाहीं हें कादंबरीकाराच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीने खरें असलें, तरी सर्वच विषय कादंबरीला अनुरूप असतात असें समजणें मात्र चुकीचें आहे. ‘ आम्ही भगीरथाचे पुत्र, ’ ‘ आम्ही असे लढलों, ’ ‘ आहुति ’ इत्यादि कादंबऱ्यांकडे या मुद्द्याच्या स्पष्टीकरणासाठीं अंगुलिनिर्देश करतां येईल. एखादा अलौकिक प्रतिभेचा लेखक कोणत्याहि विषयावर कलापूर्ण कादंबरी लिहूं शकेल हा संभव मी नाकारीत नाहीं. ज्ञानेश्वरासारखा प्रतिभाशाली कवि अध्यात्महि ‘ साहित्याचिया वरवां ’ सांगूं शकतो. परंतु इतरांनी तसा प्रयत्न केल्यास कलेची आहुति पडते हें विसरून चालणार नाहीं.

आणखीहि कांहीं गोष्टी व कांहीं प्रश्न सुचण्यासारखे असले तरी हें समालोचन येथेच संपविणें भाग आहे. ५९ सालांतील कादंबऱ्यांचें स्वरूप व दर्जा यावरून लक्षांत येण्याला हरकत नाहीं. या समालोचनांतून अनुवादित कादंबऱ्या, विविध मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या कादंबऱ्या आणि जुन्या कादंबऱ्यांच्या नव्या आवृत्त्या वगळल्या आहेत. या सालीं प्रथमच पुस्तकरूपानें प्रकाशित झालेल्या स्वतंत्र कादंबऱ्यांपैकीहि कांहीं कादंबऱ्या माझ्या नजरेंत आल्या नसण्याचाहि संभव आहे. त्यामुळे त्यांचा विचार या समीक्षणांत झाला नाहीं. ● ● ●

प्रा. गो. म. कुलकर्णी, एम्. ए.

# संकीर्ण ललित गद्य

गद्याच्या एकंदर क्षेत्रांत ललित आणि ललितेतर यांच्या सीमारेषा आज एकमेकांत इतक्या मिसळलेल्या आहेत की, त्यांतून "ललित गद्य" असें नेमकें बाजूला काढणें कठीण. अलीकडच्या आपल्या साऱ्याच गद्यावर प्रसन्नतेची एक छटा चमकत असलेली दिसते. प्रौढ, तर्कनिष्ठ, विवेचन-प्रधान गद्याला, लालित्याचीं आभरणें चढविण्याचा सोस, केळकर—फडके—काळापासूनच विशेष वाढीला लागला असला तरी त्यांत एक कृतक नटवेपणा होता, आशय आणि अभि-व्यक्तीचा एकजीव झाला नव्हता. आज मात्र या प्रकारचें गद्य लिहिण्याकडे अधिक प्रवृत्ति होत आहे. आशयअभिव्यक्तीचा हा एकमेळ, कथाकाव्याच्या क्षेत्रांत जेवढा जाणवतो तेवढा ललित गद्याच्या क्षेत्रांत जावणत नाही ( तत्त्वतः तसा तो जाणवणेंहि कठीण. ). तथापि त्यांत होत असलेल्या स्थित्यंतराच्या खुणा दिवसेंदिवस स्पष्ट होत आहेत. ज्ञानाच्या विशिष्ट क्षेत्रांत रूढ होत असलेलें अतितार्किक गणिती पद्धतीचें कांही एक गद्य बाजूला ठेवलें तर सर्वसाधारण-पणें, नितळ अनौपचारिक, सूचक, गतिशील गद्य आज मोठया प्रमाणांत साकार होऊं लागलें आहे.

प्रस्तुत लेखांत विचार करावयाचा आहे तो १९५९ मध्यें प्रसिद्ध झालेल्या प्रमुख संकीर्ण ललित गद्याचा. लघुनिबंध, प्रवासवर्णनें, शब्दचित्रें, विनोदी लेख इत्यादींचा या सदरांत अंतर्भाव करण्यांत येतो. तसा तो येथेहि केलेला आहे. तथापि भिन्नभिन्न स्वरूपाच्या व आत्यं-तिक व्यक्तिनिष्ठ अशा या गद्याला एकत्र आणणारें सूत्र कोणतें हें प्रथम पाहणें अवश्य आहे. ललित आणि ललितेतर यांच्यामधील फरकाची चर्चा करण्याचें हें स्थळ नसलें तरी वस्तुनिष्ठ सत्य-कथनापेक्षा त्या सत्याचीं व्यक्तिनिष्ठ अंगोपांगें व त्या अंगांपर्यंत वेऊन जाणारी प्रवृत्ति व पद्धति यांचेंच प्राधान्याने जेथे दर्शन होतें तेंच खरें ललित गद्य असें कल्पून पुढील विवेचन केलें आहे. यासाठीच वस्तुनिष्ठ ज्ञानावर किंवा माहितीवर भर देणारी 'सदाचार चिंतनी' (डॉ. ग. श्री. खैर) किंवा 'पूज्य विनोबांच्या जंगम विद्यापीठांत' (ले. कुंदर दिवाण) हीं पुस्तकें विचार-दृष्टया कितीहि मोलाचीं असलीं तरी तीं या सदरांतून वगळावयासच हवीत; तीच स्थिति डॉ. भा. गो. घाणेकर यांच्या 'काशी-वाराणशी दर्शन' व गौतमबुवा पाठक यांच्या 'श्री. सोम-नाथतीर्थ' या पुस्तकांची. हीं दोन्ही पुस्तकें एका दृष्टीने क्षेत्रवर्णनात्मक म्हणतां येतील; पण डॉ. घाणेकरांची दृष्टि केवळ धार्मिक नाही. काशीची भौगोलिक, सामाजिक, धार्मिक इत्यादि सर्वच प्रकारची माहिती त्यांनी या पुस्तकांत संकलित केली आहे. विशिष्ट स्थळांसंबंधीची ही निरनिराळ्या प्रकारची उपयुक्त माहिती साक्षेपाने गोळा केल्याबद्दल डॉ. घाणेकरांचें वास्तविक कौतुक करावयास हवें; परंतु या माहितीबरोबरच त्यांनी केलेल्या असंबद्ध अशा वैयक्तिक इतर माहितींच्या भेसळीमुळे या पुस्तकाला अनौचित्याचा फार मोठा डाग लागला आहे ( उदा. लेखकाने मारुतीचा रचलेला पाळणा व तदनुषंगिक माहिती पहावी. ). सोमनाथ-वर्णनांत श्री. पाठकांनी या तीर्थाची धार्मिक, ऐतिहासीक, पौराणिक माहिती व अलीकडेच भारत सरकारच्या प्रेरणेने घडून आलेलें या स्थळाचें पुनरुत्थान यांची हकीगत दिली आहे.

लेखक या समारंभाला हजर होता. लेखकाच्या कीर्तनकाराच्या पेशामुळे की काय कोण जाणे पण पुस्तकांत पाल्हाळ फार आला आहे. शिवाय वृत्तान्तकथन व इतिहास यांची त्याने गल्लत केली आहे ती वेगळीच. केवळ माहितीच्या दृष्टीनेच विचार करावयाचा झाल्यास श्री. ज. पां. देशमुख यांचें ' मला दिसलेला रशिया ' हें पुस्तक अधिक चांगलें आहे. रशिया-अमेरिकेसारख्या देशांबद्दल लिहितांना ' राजकारण ' टाळणें कठीण. शिवाय श्री. देशमुख हे पेशाने वृत्तपत्रकार असलेले; पण आनंदाची गोष्ट अशी की, त्यांनी हें पुस्तक कोणत्याहि प्रकारच्या पूर्वग्रहापासून अलिप्त ठेविलें आहे. स्तुतिनिंदेच्या भानगडींत न पडतां रशियन जीवनाचे निरनिराळे पैलू प्रमाणबद्ध व पद्धतशीर रीतीने त्यांनी वाचकांच्या समोर ठेवले आहेत. रशियांत जाऊं इच्छिणाऱ्यांच्या दृष्टीने पुस्तकांतील माहिती ' उपयुक्त ' करण्याचा लेखकाचा मूळ उद्देश यामुळे पुष्कळच सफल झाला आहे.

लालित्यापेक्षा माहितीवरच भर देऊन लिहिलेलें याच जातीचें दुसरें एक पुस्तक म्हणजे प्रा. अनंत काणेकर यांचें ' रक्ताची फुलें. ' प्रस्तुत पुस्तकापुरती प्रा. काणेकर यांची भूमिका वृत्तपत्रकाराची आहे. स्वातंत्र्योत्तर कालांतील भारत सरकारच्या निरनिराळ्या योजना, पुनर्वसाहतीचे प्रयोग, समाजविकासाचे प्रकल्प यांचा स्थूल परिचय हें पुस्तक करून देतें. एखाद्या छायाचित्रकाराने फिरत्या कॅमेऱ्याच्या साहाय्याने कांही दृश्यें ओझरतीं टिपावींत त्याप्रमाणे काणेकरांनी येथें केलें आहे. एखाद-दुसऱ्या शेऱ्यांतून वा शीर्षकांतून काणेकरांचें व्यक्तित्व काय प्रकट होईल तेवढेंच. सारा भर आहे तो नवी वेचक माहिती मोजक्या शब्दांत देण्यावर. १९५९ मध्ये प्रसिद्ध झालेलें प्रा. काणेकरांचें दुसरें पुस्तक ' बोलका ढलपा ' हें. हें ' रक्ताचीं फुलें ' याहून आकाराने पुष्कळच मोठें आहे. गेल्या दहा-बारा वर्षांत लिहिले गेलेले त्यांचे स्फुटलेख, आकाशवाणीवरील कांही भाषणें, आत्मनिवेदनपर फुटकळ आठवणी, थोडयाशा व्यक्तिपरिचयात्मक छटा, कांही काल्पनिक मुलाखती असें या पुस्तकाचें संमिश्र स्वरूप आहे. व्यक्तिपरिचयात्मक व आठवणीवजा लेखांतून अधूनमधून काणेकरांच्या मिस्किल व्यक्तित्वाचें दर्शन घडतें; पण त्याच्या मुक्त आविष्काराला या पुस्तकांतहि फार थोडा अवसर मिळतो. यामुळे १९५९ सालीं त्यांचीं दोन पुस्तकें प्रकाशित होऊनहि तीं ललित गद्याच्या कक्षेंतून वगळावीं लागतात.

'बोलका ढलप्याच्या' तोलामोलाचें म्हणून नव्हे पण संमिश्र स्वरूपाचें म्हणून श्री. गो. ना. आपटे यांच्या ' ग्रामीण चित्रें ' या पुस्तकाचा उल्लेख करतां येईल. या पुस्तकाचा मुख्य भर ग्रामीण जीवनांतील कांही व्यक्ति व प्रसंग यांच्यावरच असला तरी पुस्तकाचें नांव मात्र कांहीसें फसवें वाटतें. आरोग्यशास्त्रविषयक माहितीचा ग्रामीणतेशीं खास असा कांही संबंध नाही; तथापि या पुस्तकाचीं शेवटचीं चव्वेचाळीस पृष्ठें या एकाच विषयाला वाहिलेलीं आहेत. बाकीच्या पृष्ठांतून व्यक्तिपरिचय व कथावजा प्रसंग यांची सरमिसळ केली आहे. शिवाय यांतील व्यक्तिपरिचय व प्रसंगनिवेदन अगदीच पोपट पद्धतीचें असल्याने कलादृष्ट्या त्यांचा विचार संभवतच नाही.ललितप्रचुर करण्याचा हेतु पुढे ठेवून लिहिलेलें पण पूर्णतया फसलेलें दुसरें पुस्तक श्री. शं. व. चव्हाण यांचें ' मनाचा पारवा. ' सपक विनोद, सामान्य कोटिक्रम, परिचित गोष्टींचेंच चर्वितचर्वण, बोधाचा हव्यास इत्यादींमुळे हें पुस्तक कोणत्याच प्रकारचा अनुकूल ग्रह निर्माण करीत नाही. लेखकाने पूर्वी केव्हा तरी काव्यलेखन केल्याचा उल्लेख या पुस्तकाच्या प्रास्ताविकांत आढळतो, पण त्याचा मागमूसहि या पुस्तकांत कोठे लागत नाही. १९५९ चें एक ललितनिबंधसदृश पुस्तक एवढेंच याचें महत्त्व.

ललित निबंधाचे खास शिक्कामोर्तब असलेलीं या सालचीं पुस्तकें खालीलप्रमाणें :—

( १ ) मंझधार–वि. स. खांडेकर. ( २ ) दिलजमाई–रघुवीर सामंत. ( ३ ) शब्दांच्या दुनियेंत–शांता शेळके. ( ४ ) मी भटकते आहे–वसुंधरा पटवर्धन आणि ( ५ ) शैशव दूत–देवीदास बागूल. लेखकांच्या नांवांकडे ओझरती नजर टाकली तरी त्यांत जसा खांडेकरासारखा वयाने व मानाने ज्येष्ठ असलेला साहित्यिक आहे, तसा देवीदास बागूलसारखा ललित वाङ्मयाच्या क्षेत्रांत पहिलें पाऊल टाकणारा ' नवागत ' हि आढळतो.

श्री. खांडेकर व रघुवीर सामंत हे जुन्या पिढींतील लेखक लघुनिबंध हीच संज्ञा वापरतात, तर याच प्रकारच्या लेखनाला शेळके, पटवर्धन व बागूल ही अलीकडच्या पिढींतील मंडळी ललित निबंध असें संबोधितात. ही संज्ञाभिन्नता कांहींशी या प्रकाराकडे पाहण्याच्या दोन पिढ्यांतील दृष्टिकोनाची निदर्शक म्हणतां येईल. खांडेकरांचें लघुनिबंधलेखन गेलीं तीस-बत्तीस वर्षे अखंडपणें चालू असून त्यांचा हा आठवा संग्रह; एवढें विपुल लघुनिबंधलेखन अन्य कोणीं केलेलें दिसत नाही. लघुनिबंधलेखनाच्या खांडेकरांच्या या दीर्घ कारकीर्दींत या लेखनप्रकारांत अनेक चढउतार झाले, पण खांडेकरी साच्यांत तसा बदल झाला नाही. रंजनाबरोबरच उद्‌बोधन हें वाङ्मयाचें ध्येय मानणाऱ्या, काव्यशास्त्रविनोदाची जात्याच हौस असलेल्या, सर्व तंत्रांचीं बंधनें फारशीं न मानवणाऱ्या खांडेकरांसारख्या गोष्टीवेल्हाळ व्यक्तीला हा स्वैर लेखनप्रकार विशेष जवळचा वाटावा यांत नवल नाही. दैनंदिन जीवनांतील कोणतें तरी निमित्त पुढे करून व आपल्या भावनेला, कल्पनेला वा विचारांना विशिष्ट प्रकारें चालना देऊन ते आपल्या लघुनिबंधाची सुरवात करतात. बहुश्रुतता, सुभाषितें, कोट्या यांच्या साहाय्याने कधी आत्मनिवेदन तर कधी आत्मविश्लेषण करीत, प्रासंगिक वा अप्रासंगिक जीवनभाष्यें झोडीत व अधूनमधून जीवनांतील कारुण्य व विनोद यांकडे अंगुलिनिर्देश करीत तो निबंध पुढे पुढे सरकतो. बऱ्याच वेळा तो एकाच ठिकाणीं रेंगाळतोहि. त्याचा शेवट मात्र केव्हा व कसा होईल याचा पत्ता नसतो. लघुनिबंधाला ' Loose sally of the mind ' म्हणतात खरें, पण खांडेकरांच्या हातीं त्याचें स्वरूप फारच Loose होतें. 'मंझधार'मध्ये त्यांच्या पूर्वीच्या निबंधांतील विचारजाडय व पाल्हाळ कमी झालेला दिसतो. हा एक स्वागतार्ह बदल सोडला तर त्याचें बाकीचें स्वरूप पूर्वीचेंच आहे; आणि यापुढे तें बदलण्याची अपेक्षा करणें चुकीचें. प्रतिष्ठित लघुनिबंधकाराचा एक नवा संग्रह या भावनेनेच याचें स्वागत करणें योग्य.

खांडेकरांसारख्या रुळलेल्या लघुनिबंधकाराच्या जोडीनेच रघुवीर सामंत यांचाहि विचार करावयास हरकत नाही. त्यांचेंहि लघुनिबंधलेखन वीस-बावीस वर्षे चालू आहे. दलितांबद्दलचा कळवळा, समजून सांगण्याची हौस, साध्या विषयांतील मोठा आशय पिंजत राहण्याची प्रवृत्ति या साऱ्या गोष्टी साधारणपणें सामान्य लघुनिबंधांची एकेकाळची रूढ चाकोरी दाखविणाऱ्या आहेत. खांडेकरांच्या बहुश्रुततेमुळे, बौद्धिक उंचीमुळे किंवा अंतर्मुखतेमुळे या पद्धतीचे दोष कांहींसे लोपल्यासारखे वाटतात; पण विशिष्ट गुणांच्या निश्चित अस्तित्वाच्या अभावीं त्या लेखनपद्धतीचे दोष तेवढे सामंतांच्या निबंधांतून उघडे पडलेले दिसतात.

त्या मानाने शांताबाई शेळके व वसुंधराबाई पटवर्धन यांचे पहिलेवहिलेच ललितनिबंधसंग्रह अधिक स्वागतार्ह आहेत. समजून सांगण्याचा हव्यास दोघींतहि अधूनमधून डोकावतो. ( फडके-खांडेकराचे संस्कार या लेखिकांवर झाले असल्याने हें अटळच मानावयाचें काय? ) या बोधप्रवणतेकडे दुर्लक्ष केलें आणि आपल्याकडील स्त्री-लेखनांत खेळकरपणा किंवा अवखळपणा अद्यापि अवतीर्णच झाला नाही म्हणून हाहि मुद्दा बाजूला ठेवला, तर प्रांजळपणा व

भावनेची कोवळीक हे ललित निबंधाचे गुण दोघींच्याहि लेखनांत कमीजास्त प्रमाणांत का होईनात दिसतात. वृत्तीपरत्वें दोघींच्या दृष्टिकोनांत अर्थातच फरक आहे. शांताबाई बऱ्हंशी बहिर्मुख, बाह्य पसाऱ्यांत रमणाऱ्या, तर वसुंधराबाई अन्तर्मुख व चिंतनशील वाटतात. शेळके यांच्या निवेदनाला मुळांत विशिष्ट भाववृत्ति प्रेरक होत असली तरी त्या प्रेरणेचें रूपांतर सामान्यत: गंभीर तत्त्वप्रतिपादनांत होतें; आणि एवढें अपुरें वाटूनच की काय,त्या मधूनमधून सारांशवजा व सिद्धान्तवजा वाक्यांची पेरणी करीत राहतात. भाषेची जडणघडणहि ललित निबंधापेक्षा गंभीर तत्त्वप्रतिपादनाला अधिक पोषक ठरणारी आहे. ' वेडीं फुलें आणी रात किंवा मनांतील बाग ' सारख्या लेखांतून हळुवार वृत्तीचें कांही दर्शन होतें. पण या वृत्ती फुलून आल्याचा प्रत्यय केव्हाच येत नाही. या दृष्टीने वसुंधराबाईंचें लेखन ललित निबंधाच्या कसोटीला अधिक उतरणारें आहे. बाईंचें उद्दिष्ट बऱ्याच ठिकाणीं विचारदर्शन हेंच असलें तरी या विचाराबरोबरच त्यांच्यामागील प्रौढ पक्व मनाचेंहि दर्शन घडतें. या मनाने उलटसुलट धाग्यांचा गुंफलेला गोफहि कांही वेळा वाचकांस पाहावयास सापडतो. रस-रूप-गंधांची त्यांची जाणीवहि अधिक संवेदनशील आहे. ' दिवा लागणें ' सारख्या शब्दांतील सौंदर्य जेवढ्या सूक्ष्मपणें त्या टिपतात तेवढें ' शब्दांच्या दुनियेचा ' विचार करूनहि शांताबाईंना टिपतां आलेलें नाही. ' मी अशी मी तशी' सारख्या निबंधांतील आत्मविश्लेषणाची पातळीहि बरीच वरची आहे. पण या प्रकारची उंची त्यांना क्वचितच गाठतां येते. व्यक्तित्वाच्या ठाशीव आविष्कारामुळे त्यांतील हळुवारपणा हरपला जातो. मूळच्या भावकंदाला आणली अंकुर फुटत नाहीत. असे थोडेसे कोवळे अंकुर श्री. देविदास बागूल यांच्या ' शैशव दूतांत ' पाहावयास सापडतात. या अंकुरांचा परिपोष मुख्यत: अभिजात वाङ्मयाच्या रसिक संस्करणांत आहे. या संस्करणाची खुद्द लेखकालाहि कधी कधी वाजवीपेक्षा अधिक जाणीव होत राहिल्याने त्याच्या भाषाशैलीला कांही ठिकाणीं कृत्रिम डौल प्राप्त होतो. " निसर्गाच्या सांनिध्यांत आणि संतांच्या स्मृतींत बागुलांची प्रतिभा जशी बहरते आणि रंगते तितकी ती इतरत्र क्वचितच रंगते" या श्री. वि. द. घाटे यांच्या प्रस्तावनेंतील उद्गारांत श्री. बागूल यांच्या लेखनाचें वैशिष्ट्य व मर्यादा समाविष्ट झाल्या आहेत.

अभिजात ललित वाङ्मयाच्या संदर्भात श्री. रामचंद्र ढेरे यांच्या ' अमृतकन्या ' व डॉ. गो. के. भट यांच्या ' वेडगांवचे शहाणे ' या पुस्तकांचा आवर्जून उल्लेख करावयास हवा. विदग्ध संस्कृत काव्यनाटकांतील नायिकांच्या ( सीता, उमा, शकुन्तला, राधा, वसन्तसेना इत्यादि ) व्यक्तित्वांतील विविध सौंदर्यछटांचें श्री. ढेरे यांनी मनोज्ञ दर्शन घडविलें आहे. श्री. ढेरे हे जुन्या वाङ्मयाचे संपादक व संशोधक या नात्यानेच आतापर्यंत परिचित होते. या पुस्तकाने त्यांच्या रसलोलुपवृत्तीचेंहि दर्शन घडविलें आहे. या भावपूर्ण चित्रमालेला त्यांनी निसर्गसौंदर्याची पार्श्वभूमि निवडल्याने वृत्ति व संस्कार या दोन्ही बाबतींत ते श्री. बागूल यांना फार जवळचे आहेत; आणि त्यामुळेच श्री. बागूल यांच्या शैलींतील गुणदोष नेमके येथेहि त्याच प्रकारें प्रकट झाले आहेत. प्राध्यापक गो. के. भट यांचें पुस्तक संस्कृत-प्राकृत साहित्यांतील विदूषकांचा परिचय करून देणारें आहे. ढेरे यांच्या पुस्तकाप्रमाणेच परिचय व व्यक्तिदर्शन असेंच याहि पुस्तकाचें स्वरूप असलें तरी लेखकाचा भर आहे तो रसग्रहणापेक्षा विवेचनावर. त्यांच्या ' विदूषक ' या संशोधनपर ग्रंथाचा हा पूरक भाग मानावयास हरकत नाही. अभिजात संस्कृत साहित्याचा, विशेषतः नाट्याचा रसग्रहणात्मक परिचय करून देणाऱ्या लेखकांत प्राध्यापक भट अग्रगण्य आहेत. या पुस्तकाच्या द्वारा संस्कृत साहित्यांतील विनोदाच्या मर्यादाहि त्यांनी प्रांजलपणें प्रकट केल्या आहेत. संस्कृत साहित्याच्या

अभिमान्यांची रसिकता आग्रही असते ही समजूत प्रा. भट यांनी खोटी पाडली आहे. संस्कृत साहित्य-परिचयदृष्ट्या श्री. भट व ढेरे यांचीं पुस्तकें परस्परपूरक झालीं आहेत.

'अमृत कन्या' व 'वेडगांवचे शहाणे' हीं पुस्तकें व्यक्तिचित्रणप्रधान असलीं तरी त्यांतील व्यक्तित्व विशिष्ट कालांतील, विशिष्ट देशांतील, विशिष्ट प्रकारच्या संकेतांनी बद्ध आहे. त्यावर कर्वीच्या कल्पनेचीं पुटें चढलीं आहेत तीं वेगळींच. वास्तवाच्या मरुभूमींतच ज्यांची वाढ झाली आहे, जीवनांतील संकेत हे ज्यांच्या बाबतींत गळून पडले आहेत, नव्हे या संकेतांनी जे कधी बद्धच होऊं शकलेले नाहीत; जीवनांतील सुखदुःखांचा खरा अर्थ व रस ज्यांना आकलन झाला आहे; जीवनाच्या आस्वादाची धुंदि डोळ्यावर तरळत असली तरी ज्यांचें इमान वाढत्या वयाला दाद न देतां ताठपणें उभें आहे आणि ज्यांचे केस पांढरे झाले असले तरी मनें हिरवींच राहिलीं आहेत अशा कांही व्यक्ति पाहावयाच्या झाल्यास श्री. वि. द. घाटे यांच्या 'पांढरे केस हिरवीं मनें' या पुस्तकाकडेच वळावें लागेल. सुमारें वीस वर्षांपूर्वी श्री. घाटे यांचें 'कांही म्हातारे आणि एक म्हातारी' हें पुस्तक प्रसिद्ध झालें आणि आता दोन दशकांच्या दीर्घ कालावधीनंतर हें दुसरें पुस्तक पुढे येत आहे. वाङ्मयांत सामान्यतः तरुण-तरुणींच्या सलज्ज कुजबुजीकडे जेवढें अवधान दिलें जातें तेवढें कृतान्तकटकामलध्वजा फडफडविणाऱ्या जरेकडे दिलें जात नाही. पण श्री. घाटे यांची सहृदयता एवढी मोठी की त्यांनी आपल्या या दोन्ही पुस्तकांतून याच तऱ्हेच्या व्यक्तींना प्राधान्य दिलें आहे. केवळ वृद्ध स्त्री-पुरुषांनाच चित्रण-विषय करणाऱ्या या प्रवृत्तीवर कोणीतरी Nostalgic असा शेरा मारला आहे. विशिष्ट वृत्तीचे वृद्ध स्त्री-पुरुष लेखकाला मोहिनी घालतात; त्यांच्या मधुरस्मृतीभोवती त्याचें मन रुंजी घालीत राहतें आणि 'गेला तो जमाना' असे दुःखोद्गारहि क्वचित् त्याच्या तोंडातून निघतात हें खरें आहे. पण भूतकाळाकडे आत्मीयतेने पाहणारें हें मन भविष्यकाळाबद्दलहि तितकेंच सोत्कंट आहे. याचें प्रत्यंतर याच पुस्तकांत पुष्कळदा मिळतें. खरी गोष्ट अशी आहे की, श्री. घाटे यांना तारुण्यांत आढळणारा जीवनाचा कैफ व खऱ्या वृद्धावस्थेंत प्रकट होणारें मनाचें पक्वपण यांचें एक मधुर रसायन अभिप्रेत आहे. हें रसायन अर्थातच दुर्मिळ असल्याने व तें तारुण्यापेक्षा वृद्धावस्थेंतच निर्माण होण्याची स्वाभाविक शक्यता असल्याने ज्या ज्या वृद्ध स्त्री-पुरुषांत त्यांना त्याची प्रचीती आली त्या त्या स्त्री-पुरुषांकडे देशाचा, परिस्थितीचा, प्रकृतीचा वा परिचयअपरिचयाचा विचार न करतां त्यांनी लोलुपतेने झेप घेतली. यामुळे या व्यक्ति-चित्रणांत जसे ग्वाल्हेरच्या महाराजांसारखे पराक्रमी पुरुष आहेत तशी इंग्लंडमध्ये घरकाम करून राहणारी 'मॉड' सारखी सामान्य मोलकरीणहि आहे. यांत राजकीय कार्यकर्ते आहेत, कलाप्रेमी कलंदर आहेत आणि साहित्यवेड्या व्यक्तींप्रमाणेच फुलवेडे जीवहि आहेत. कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारची उत्कट विलक्षणता हा या सर्व व्यक्तींचा स्थायीभाव.या लोकविलक्षण वर्तनामागची त्या त्या व्यक्तीची भूमिका श्री.घाटे अतिहळुवारपणें उलगडून दाखवितात आणि मोजक्या वर्णनाने व प्रसंगनिवेदनाने बहिरंगाबरोबरच त्या व्यक्तीच्या अंतरंगाचेंहि दर्शन सहजपणें घडवितात. या साऱ्याच लेखनांत तन्मयता व ताटस्थ्य यांचें एक गमतीदार मिश्रण आहे. अकारण प्रदर्शन न करतां योग्य तें वातावरण नेमकेपणें निर्माण करणारी विदग्ध अशी रसवृत्तीहि आहे. लेखकाचें वाचकांशीं होणारें वर्तन खेळीमेळीचें व सलगीचें असल्याने क्वचित् वडीलकीच्या भूमिकेवरून त्यांनी केलेला उपदेशहि रोचक होतो. राजकीय, सामाजिक वा सांस्कृतिक कार्य करणाऱ्या व्यक्तींच्या तुजबी माहितीवर कृत्रिम अलंकारांची रंगरंगोटी करून कांही व्यक्तिचित्रें वाङ्मयाच्या बाजारांत मध्यंतरीच्या काळांत मांडलीं गेलीं. या प्रकारचें व्यक्तिचित्रण आता मागे पडलें आहे.

शिवाय आजकाल लघुकथेनेहि या क्षेत्रावर थोडेंसें आक्रमण केलेलें दिसतें. अस्सल व्यक्ति व त्यांचें तितकेंच कलात्मक चित्रण ही चीज नेहमीच दुर्मीळ असणारी. या दुहेरी दुर्मीळतेमुळे श्री. विठ्ठलराव घाटे यांचें पुस्तक १९५९ मधील प्रकाशनांत एक मानाचें स्थान पटकावतें. या वर्षाच्या ललित गद्यांतील वैशिष्ट्यपूर्ण प्रकाशनांत कांही प्रवासवर्णनात्मक पुस्तकांचाहि अंतर्भाव होतो. त्यांचा विचार करण्यापूर्वी विनोदी लेखसंग्रह या नांवाखाली प्रसिद्ध झालेल्या कांही पुस्तकांचा विचार करावयाचा आहे. एकूण ललित गद्यांत त्यांची संख्या अधिक आहे. १९५९ सालच्या विनोदी लेखसंग्रहांत तीन संग्रह श्री. वि. आ. बुवा यांचे आहेत (अडाण्याचा गाडा; फापटपसारा; असून अडचण नसून खोळंबा). दत्तू बांदेकर यांचे दोन संग्रह (चिरीमिरी व प्रेमाचा गुलकंद) व वसन्त सबनीस व बाळ सामंत यांचा प्रत्येकी एकेक संग्रह आहे (पानदान व मस्करी). विनोद हें ललित साहित्याचें एक प्रभावी अंग असलें तरी ललित गद्य या सदराखाली येणाऱ्या गद्याशीं त्याचें नातें कांही बाबतींतच जुळतें. कल्पकता, कोटीबाजपणा, प्रसन्न खेळकरपणा, मार्मिक निरीक्षण, विदग्धता इत्यादि बाबतींत ललित गद्याशीं त्याचें साम्य असलें तरी उत्कट भावनेच्या व सहृदय सौंदर्यदर्शनाच्या जोरावर एकप्रकारची धुंदी आणण्याचें जें महत्त्वाचें कार्य ललित गद्याकडून अपेक्षित असतें, त्याचें विनोदाला वावडें आहे. अपेक्षाभंग, विसंगतिदर्शन, विडंबन, निषेध, टीका, उपहास, उपरोध हीं विनोदाचीं प्रमुख हत्यारें; आणि मर्माघात हें प्रमुख प्रयोजन. यामुळे सर्वसाधारण ललित गद्याचें एक अंग म्हणून विनोदाचा विचार न करतां त्याला एक वेगळें व स्वतंत्र स्थान देणेंच योग्य होईल (प्रस्तुत मात्र नेहमीच्या परंपरेला धरून त्याचा या सदराखालीच विचार केला आहे.) डॉ. गो. के. भटांच्या 'वेडगांवचे शहाणे' या पुस्तकाच्या संदर्भात विचार करतां पूर्वीच्या विनोदांतील संकेतशीलता व आजच्या विनोदांतील संकेतराहित्य जाणवतें. संकेतविच्छेद, दंभस्फोट, विडंबन, जीवनांतील विसंगति व उपरोध यांचें प्रमाण आजच्या विनोदांत बरेंच आहे. प्रत्येक कालाचे कांही ठराविक विनोदविषय असतात. नवसाहित्यांतील विकृति व मध्यमवर्गीयांच्या कौटुंबिक जीवनांतील कांही हास्यास्पद विसंगति यांवर आजच्या विनोदाचा विशेष भर आहे. श्री. बुवांच्या विनोदाचा भर साहित्यविषयक कांही घडामोडी आणि सामाजिक भ्रष्टाचार यावर आणि तदनुषंगिक विडंबनावर आहे. श्री. सामंत-सबनीस यांच्या विनोदाचें आवडतें क्षेत्र म्हणजे कौटुंबिक जीवन. त्यांतल्यात्यांत बायको नांवाच्या प्राण्यावर हल्ला चढवितांना सबनीस-सामंतांच्या लेखणीला विशेष स्फुरण चढतें. या दोघांचेहि विनोद-विषय मोजकेच असले तरी त्यांत मार्मिकतेचें व मर्मभेदकतेचें प्रमाण बरेंच आहे. श्री. सबनीस यांचें लेखन कांही वेळा गंभीरतेकडे झुकतें. 'माहिती' देण्याचा त्यांच्या लेखणीला मोह होतो (पानदान, असा हा कऱ्हाडा हे लेख पाहावेत.) त्यांच्या लेखनाचा एकंदर थाट विनोदप्रधान लघुनिबंधाचा आहे. दैनंदिन जीवनांतील साध्यासुध्या घटनांतून स्लतिबाजपणें विनोदनिर्मिति करण्यांत ते कुशल आहेत. चलाख शब्दश्लेषांच्या जोडीला पु. ल. छाप विडंबन-गीतें हा पण त्यांच्या शैलीचा आणखी एक विशेष. श्री. सामंत यांच्या विनोदाची तऱ्हा वर्णनप्रधान असून विशेषेकरून ते कौटुंबिक संस्थेवर गमतीदार हल्ला चढवितात. 'मस्करी'-तील तीन-चतुर्थांश लेख याच एका विषयाला वाहिलेले आहेत; आणि त्यांतहि एक क्रम आहे (लग्न-मंडप, शुभमंगल, पाहिला पाळणा इ.). खुसखुशीतपणा हें त्यांचें खास वैशिष्ट्य. त्यांची शैलीहि अधिक घरगुती व अनौपचारिक वाटते.

श्री. बुवा व बांदेकर हे त्या मानाने विनोदाच्या क्षेत्रांत अधिक काल वावरणारे. जीवनाच्या विविध क्षेत्रांतील विसंगति हेरून विविध प्रकारें ती मांडण्याकडे दोघांचाहि कल.

विनोदाचीं निरनिराळीं मिश्रणें बनविण्याची हौस दोघांनाहि सारखीच. या साऱ्या गोष्टी दोघांत समान असल्या तरी श्री. बुवांना बांदेकरांच्याप्रमाणे या क्षेत्रांत अद्यापि तरी यशप्राप्ति झालेली नाही. विनोदी लेखनाबद्दलचा त्यांचा उत्साह अमाप आहे आणि या प्रकारच्या लेखनाला आवश्यक असलेली बरीच सामग्रीहि त्यांच्या संग्रहीं आहे. पण त्यांच्या हातून अपेक्षित फलनिष्पत्ति मात्र होत नाही. कल्पना वाजवीपेक्षा ताणणें, विशिष्ट कल्पनांचें चर्वितचर्वण करणें, तारतम्याचा अभाव असणें इत्यादि प्रकारच्या दोषांमुळे त्यांचा विनोद बोथट वाटतो. मामुली रंजनापलीकडे त्याची मजल जात नाही.

या सर्वांत अर्थातच श्री. बांदेकर हे अग्रगण्य विनोदी लेखक होत. त्यांच्या विनोदाची तऱ्हाहि आजच्या सर्वसाधारण विनोदी लेखनाहून वेगळी आहे. विनोदाचें कोणतेंहि हत्यार ते सारख्याच कौशल्याने चालवितात. अन्यायाची चीड व उपेक्षितांचा कळवळा हे त्यांच्या लेखणीचे स्थायीभाव. यामुळे त्यांच्या विनोदाला कारुण्याचाहि एक पदर असतो. विशिष्ट राजकीय परिस्थितीमुळे व विशिष्ट व्यवसायक्षेत्रामुळे त्यांच्या लेखनांत राजकीय स्वरूपाच्या विषयाला महत्त्व प्राप्त होत असलें तरी त्यांची कल्पकता एवढी प्रभावी आहे, व विनोदबुद्धि इतकी तल्लख आहे की, ते केव्हा, कोणत्या घटनेंतून कशा प्रकारचा विनोद चपखलपणें निर्माण करतील हें सांगतां येत नाही. कथा, काव्य, लोकगीत, कीर्तन, आरती, जाहिरात, एखादा वृत्तान्त, त्रोटक बातमी – त्यांच्या विनोदाला चालना द्यावयाला कांहीहि पुरतें व त्या त्या साऱ्याचा आश्रय करून त्यांचा विनोद अनिरुद्धपणें संचारूं लागतो. त्यांतील प्रासंगिकता व कांही बाबतींतील ठराविकपणा क्वचित् खटकत असला तरी दीर्घ कालपर्यंत सातत्याने व चतुरस्रपणें विनोदाचा हुकमी वापर करणाऱ्या, शिवरामपंत परांजपे व अच्युतराव कोल्हटकर यांची परंपरा नव्या जोमाने चालविणाऱ्या एका समर्थ लेखकाला आपण मुकल्याची दुःखद जाणीव त्यांचे लेख वाचीत असतांना होत राहते.

१९५९ मधील कांही प्रवासवर्णनपर पुस्तकांचा विचार करूनहि श्री. अरविंद गोखले ( अमेरिकेस जावें पाहून ); प्रभाकर पाध्ये ( उडता गालिचा ); ज्ञानेश्वर नाडकर्णी ( विलायतची वारी ) आणि गंगाधर गाडगीळ ( सातासमुद्रापलीकडे ) या चार लेखकांचीं प्रवासवर्णनपर पुस्तकें मुद्दाम मागे ठेवलीं; कारण या लेखकांबद्दलच्या वाचकांच्या विशेष अपेक्षा. स्वातंत्र्योत्तर कालांत परदेशगमन करणाऱ्यांची संख्या झपाट्याने वाढत चालल्याने प्रवासवर्णनात्मक वाङ्मय बाळसें धरूं लागलें आहे. गेल्या वर्षींच्या मानाने ही संख्या थोडी घटलेली दिसली तरी चार प्रथितयश लेखकांचीं प्रवासवर्णनें एकाच वर्षी प्रसिद्ध होण्याचा सुयोग याच वर्षी प्राप्त झाला आहे. स्वतःचें वास्तव्यस्थळ सोडून नव्या स्थळीं कारणपरत्वे संचार करीत असतां त्या त्या स्थळांच्या अवलोकनाने बुद्धीवर व मनावर जे संस्कार उमटत राहतात त्यांचें चित्रण करणें ही प्रवासवर्णनामागची प्रमुख भूमिका. वातावरण साधारणपणें एकाच प्रकारचें असूनहि वृत्तिपरत्वे आणि हेतुपरत्वे हें संस्करण किती भिन्न भिन्न प्रकारचें होऊं शकतें, याचा प्रत्यय हीं पुस्तकें देतात. तेव्हा तुलनात्मक विचारापेक्षा त्या त्या लेखकाचा दृष्टिकोन लक्षांत घेऊनच त्यांचा विचार करणें इष्ट.

श्री. गोखले यांच्या पुस्तकांत कलावंताच्या व्यक्तित्वापेक्षा एक भारतीय सामाजिक मन कार्यकर झालेलें दिसतें. अमेरिकन समाज व संस्कृति यांबद्दलची माहिती ( कांही वेळा आंकडेवारीसकट ) वाचकांच्या समोर ठेवणें, हें गोखले यांच्या या लेखाचें प्रयोजन दिसतें; त्यामुळें या पुस्तकाची नोंद एका दृष्टीने ललितेतर गद्यांत करणें योग्य ठरलें असतें; परंतु या माहितीच्या अनुषंगाने गोखले यांच्या भावप्रवण वृत्तींचेहि दर्शन होत असल्याने या माहितीला

एक आकर्षक स्वरूप प्राप्त झालें आहे. त्यांची नेहमीची सुश्लिष्ट निवेदनशैली हाहि लालित्याला परिपोषक होणारा घटक. या लेखसंग्रहाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग कल्पिल्यास पूर्वार्धांत ( अमेरिकेस पोहोंचेपर्यंतच्या काळांत ) कलात्मक व्यक्तित्वाला अधिक अवसर मिळालेला दिसतो. प्रत्यक्ष प्रवासांत त्यांच्या भाववृत्तींना आलेलें उधाण पृ. १३-१४ वर चांगलेंच पाहावयास मिळतें. अमेरिकेच्या भूमीवर पदार्पण केल्यानंतर मात्र हें मन व्यावहारिक भूमिकेवरून अधिकाधिक विचार करूं लागलेलें दिसतें. प्रत्यक्षांत हें असेंच झालें असेल असें नव्हे, पण येथे ग्रथित झालेले अनुभव मुख्यत्वें या प्रकारचे आहेत, एवढें खरें.

समाजकारण, राजकारण वगैरे गोष्टींचें प्राबल्य श्री. प्रभाकर पाध्ये यांच्या प्रवासवर्णनांत आढळेल असा एक समज त्यांच्या इतर लेखांच्या वाचनाने व हालचालींमुळे होतो. त्यांचें पर्यटनहि असल्याच कारणांनी घडलें आहे. पाध्ये यांच्या व्यक्तित्वांतील तर्ककर्कश, विवेचक व सौंदर्यप्रेमी रसिक, त्यांच्या इतर लेखनांतून फार अलगपणें वागतात. त्यामुळें 'कलेचीं क्षितिजें' व 'व्याधाची चांदणी' हीं पुस्तकें एकाच लेखकाचीं असतील हें खरेंहि वाटत नाही. पण त्यांच्या प्रवासवर्णनपर लेखनांत मात्र या दोहोंचा मिलाफ आढळतो; आणि यामुळेच राजकारणप्रेमी, विश्लेषणप्रवण, तत्त्वजिज्ञासूप्रमाणे केवळ कलाभिरुचि व निसर्गसौंदर्य यांची आवड असलेल्या व्यक्तीलाहि त्यांचीं प्रवासवर्णनें प्रिय वाटतात. त्यांच्या एरव्हीच्या तत्त्वचर्चेंतील जाडयहि येथे लोप पावतें; व साऱ्याच निवेदनाला एक मुलायम स्वरूप प्राप्त होतें. खुद्द पाध्ये यांनाहि हा लेखनप्रकार मानवल्याचें लागोपाठ प्रसिद्ध होणाऱ्या या तिसऱ्या संग्रहावरून दिसतें. देशाटनद्वारा त्यांनी जी पंडितमैत्री केली, जो सभेंत संचार केला, मानवी जीवनाचें जें अवलोकन केलें आणि कलेचा व निसर्गसौंदर्याचा आस्वाद घेतला त्याचा चातुर्यपूर्ण ठसा त्यांच्या इतर दोन प्रवासवर्णनसंग्रहाप्रमाणे याहि संग्रहावर उमटला आहे.

श्री. ज्ञानेश्वर नाडकर्णींच्या 'विलायतच्या वारी'चें उद्दिष्ट वरील दोघांहून थोडें वेगळें आहे. विलायतेंतील इतर जीवनांगांची व प्रवासांत येणाऱ्या गोडखारट अनुभवांची त्यांनीहि थोडीफार कल्पना दिली आहे आणि त्यांतून त्यांच्या कधी मिस्कील, खेळकर तर कधी संयत आणि सौजन्यपूर्ण व्यक्तित्वाचें दर्शनहि होतें; परंतु परदेशच्या वारींतील त्यांचें प्रमुख विलोभन परदेशांतील कला व साहित्य हें आहे. पाश्चात्त्य कला व साहित्य यांच्या केवळ आस्वादाने त्यांची तृप्ति होत नाहीं; त्या निर्मितीभोंवतालचें वातावरण व वृत्ति जाणून घेण्याची त्यांना जिज्ञासा आहे. या जिज्ञासेंतून त्यांनी जी धडपड केली व जें त्यांच्या हातीं लागलें त्याचा कांही भाग या पुस्तकांत आला आहे. कलाप्रेमी व्यक्तीला यांत ब्रिटिश रंगभूमि किंवा आर्ट गॅलरीज् याधारखी माहिती म्हणूनच मोलाची वाटते. निवेदनासाठी दैनंदिनीच्या पद्धतीचा अवलंब केल्याने नेमकेपणा व मोजकेपणाहि चांगला साधला आहे.

या सदरांतील शेवटचें महत्त्वाचें पुस्तक म्हणजे श्री. गंगाधर गाडगीळ यांचें 'साता-समुद्रापलीकडे' हें. या पुस्तकाचा शेवटीं विचार करण्याचें कारण, १९५९ च्या ललित गद्यांत सर्वच दृष्टींनी जाणवणारें त्याचें वेगळेंपण. प्रवासवर्णनाच्या सदरांत त्याची नोंद झाली असली तरी रूढ प्रवासवर्णनांच्या चौकटींत तें बसत नाही. प्रवासवर्णनपर लेखाबद्दलच्या नेहमीच्या अपेक्षा कांही प्रमाणांत गाडगीळ पुऱ्या करतात, पण त्या आनुषंगिक रीतीने. त्यांचा जो विशेष कटाक्ष आहे ( निदान यांतील कांही लेखांतून ) तो, विशिष्ट संस्कारांतून कलावंताच्या शुद्ध भूमिकेंत या संस्कारांना जें एक तरल, गुंतागुंतीचें, व्यापक स्वरूप प्राप्त होतें, तें साकार करण्यावर. त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें झाल्यास, मनाचा पारा चिमटींत पकडण्याचा, मनांतल्या गुहा चाचपडण्याचा, निरर्थकतेच्या डोहांत डुंबण्याचा

खेळ, या प्रवासाच्या निमित्ताने ते खेळत राहतात. निसर्गाचें बदलतें रूप, आधुनिक विज्ञानाने प्रवर्तित केलेलें नवें यंत्रयुग, रोमसारखी उद्ध्वस्त प्राचीन संस्कृति आणि तिच्या सांनिध्यांत नांदणारें चिरंतन कलाविश्व, यांच्या दर्शनाने मानवी जीवनाचा एक भव्य-भीषण पट लेखकाच्या दृष्टीसमोर तरळत राहतो; त्याला एक स्थलकालांतील स्वरूप प्राप्त होतें आणि मग या स्वरूपांतील सौम्य–कठोर, उदात्त–क्षुद्र, विशाल आणि संकुचित छटांचा वेध लेखक घेत राहतो. हा वेध घेतांना श्री. गाडगीळ कधी तत्त्वचिंतकाचा तर कधी विदूषकाचा डोळा वापरतात. विदूषकाच्या डोळ्याने ते समाजजीवनांतील विसंगति हेरतात तर तत्त्वचिंतकाच्या दृष्टींतून ते कलेचें गहन गूढ उकलण्याचा प्रयत्न करतात (या दृष्टीने रोम-संबंधीच्या दोन्ही लेखांकडे लक्ष वेधणें आवश्यक वाटतें ).

श्री. गाडगिळांच्या शैलीचें स्वरूपहि अतिशय लवचिक आहे. बदलत्या दृश्याबरोबर बदलत जाणारी भाववृत्ति व तिचे वेग-आवेग ते समर्थपणें शब्दांकित करतात. यासाठी आवश्यक असलेली लय साध्या वाक्यरचनेंतून निर्माण होणें शक्य नसल्याने, परिच्छेदांची व वाक्यांची लांबीरुंदी त्यांना बदलावी लागते; विरामचिन्हें अधिक अर्थघन करावीं लागतात; प्रौढ संस्कृत शब्दांचें भांडार खोलावें लागतें (काप्री, चिरन्तन रोम, व्हेनिस हे लेख पाहावेत). आणि हें सारें वाचकाला स्तिमित करतें. स्वतःमधील कलावंताला जपण्याचा प्रयत्न हा लेखक वाजवी होऊन अधिक सावधपणें तर करीत नाही ना, अशी एक पुसट शंकाहि अधेमधेच त्या वाचकाच्या मनांत डोकावून जाते.

एवंगुणविशिष्ट अशा या पुस्तकाला एकंदरीने प्रवासवर्णन मानावें की नाही हा पहिला प्रश्न; आणि तसें तें मानावयाचें झाल्यास मराठींतील आजपर्यंतच्या प्रवासवर्णनाच्या विकास-परंपरेंत एक नवा टप्पा या पुस्तकाने गाठला, व या प्रकारच्या लेखनाला एक नवी दिशा दाखविली असें म्हणावें लागेल. श्री. गाडगिळांनी या पुस्तकाला लिहिलेलें प्रास्ताविक छोटेंसेंच असलें तरी या दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. गो. चिं. भाटे प्रणीत स्थूल माहितीपर प्रवास-वर्णनाच्या पठडीनंतर कालेलकरांच्या व काणेकरांच्या प्रवास-वर्णनाचे कित्ते घोटून एक नवा साचा रूढ केला गेला. या साच्यांत कलावंताला वस्तुनिष्ठ आशयाशीं कमीजास्त तडजोड करावी लागते. गद्यलेखक म्हटलें की, अशी तडजोड अपरिहार्य आहे असेंहि कोणी म्हणेल; पण श्री. गाडगिळांनी अशी तडजोड करण्याचें नाकारून या क्षेत्रांत कांही नवे प्रश्न निर्माण केले आहेत. कलात्मक गुणवत्तेबरोबरच या पुस्तकाचें हें अंगहि विचारांत घेण्याजोगें आहे.

• • •

डॉ. प्रा. ना. ग. जोशी, एम्. ए., पीएच्. डी.

# कविता

## भूमिका

वर्षावर्षाला प्रसिद्ध होणाऱ्या कवितासंग्रहांचें समीक्षण करणें ही गोष्ट एका अर्थानें फार सोपी आहे. कारण वर्षभराच्या काळांत काव्याच्या शैलींत फारसा फरक झालेला नसतो— बहुधा मागील कडव्यावरून पुढे चाल चालू असते; आशयाची वेगळीक ( नेहमीच ) कमी असते; आविष्काराच्या रंगाची प्रतिकृति होत असते— क्वचित् ढंग माजत असतो, व मुखवटे बदलून होणाऱ्या त्याच-त्या ठशाच्या वासुदेव-लीला जास्त दृष्टीस पडण्याची शक्यता असते. उलट, असें समीक्षण करणें अवघड जाण्याचा संभव असतो. कारण कविता ही सदाच " आगळी " भासत नसली तरी तींत ताजेपणा, उमदेपणा, स्वच्छंदपणा असूं शकतो; बहरांतील ठराविकपणा बोचत असूनहि उमललेपणा, गहिरेपणा जाणवूं शकतो. समीक्षणांत बहरांतील या स्थूल-सूक्ष्म गंधरेखा उमटावयास पाहिजे असतात.

मराठी कवितेचा गतवर्षीचा बहर एकंदरीनें पाहतां भरदार आणि बहारदार होता असें म्हणावें लागतें. प्राचीन-मध्ययुगीन कवितांचे संग्रह गतवर्षी प्रसिद्ध झाले; कविजनांच्या कृतींचे प्रादेशिक संग्रह निघाले; कवींच्या वैयक्तिक रचनांचे उत्तम संग्रह प्रकाशांत आले; मराठी कवितेच्या जुन्या-नव्या वळणांची तुलनात्मक कल्पना येण्यास उत्तम सामग्री गतवर्षी उपलब्ध झाली; नव्या-नव्यांतील " आगळी -"क लक्षांत येईल असे काव्यसंग्रह आपणांस मिळाले; आणि कालचे आजच्या नवेपणाशीं कशी सलगी करतात नि आजचे कांही बाबतींत कालच्या वळणावर जाणें कसें धर्मबाह्य मानीत नाहींत, हेंहि सुबुद्ध रसिकाच्या लक्षांत येण्यासारखी कविता प्रकट झाली. गेल्या वर्षीच्या मराठी कवितांचें—कवितासंग्रहांचें शलाका-परीक्षण केल्यानेहि ही गोष्ट आपल्या प्रतीतीस सहज येते.

## नवीन कवितासंग्रह

बऱ्याच वर्षांनी पु. शि. रेगे यांच्या कवितांचा संग्रह " **पुष्कळा** " गतवर्षी प्रकट झाला. ' शब्द ' या कलाद्रव्याच्या विविधरंगी छटांचा आविष्कारासाठीं उपयोग करणें हें रेगे यांच्या काव्यकलेचें वैशिष्ट्य या संग्रहांतहि पुरेपूर प्रत्ययास येतें. विविध लयींचीं वलयें घेत घेत " पुष्कळा "मधील काव्यशैली नटत-मुरडत जातांना आढळते. " पुष्कळा " या कवितेंतील ' पुष्कळ ' शब्दाच्या वेगवेगळ्या स्वरूपांतून स्त्रीसौंदर्याच्या विविधरूपी पुष्कळतेचें आलेखन समर्पकपणें झालें आहे. "सात गाथां"तील ध्वनितार्थ, "अंतर" कवितेंतील रंगप्रतिमा, " भाषा"मधील सूचक भाषा, "जेव्हां"मधील चित्रगर्भ अर्थवलयें, "संग" मध्ये आकाशाला फुटलेल्या मनांतून गळणाऱ्या धुंद उदासाच्या फुलांनी आठवून दिलेला सुखसंग आणि "असूर्यपश्या " मधल्या ' तिचीं ' मखमली अक्षें—सर्वत्र या स्त्रीसौंदर्यसूचक संवेदनांची किमया पाहतां पाहतां घडते. " विचारिलें मज त्यांनीं " या कांहीशा स्थूल पातळीवरच्या कवितेंत कवीने "सौंदर्याच्या पंड्यां"च्या प्रश्नमालेला दिलेलें उत्तर कवीच्या दृष्टिबिंदूचें निदर्शक आहे कवि म्हणतो, मला " आप्राण अभिलाषेचें विश्व संदीपविणारे दोनच डोळे.—

" भुऱ्या सांवळ्या पानांमधला स्तंभित वारा,
सोनेरी कणसांवरचा हंसेरा, लपरा, झिपरा, सूर्यपिसारा
अन् तिच्या शुभ्रतर शुभ्र हिमाच्या वक्षावरचा
तीळ जांभुळा डाव्या "

एवढेंच ठाऊक आहे. परंतु वाचकांना हेंहि कळून चुकतें की, या कवीला 'नार्सिससवाणे उगाच डोळ्यांतलें पाहणें, डोळ्यांत पाहणें' साधलेलें आहे आणि त्याची काव्यकला ही आपली 'मख-मली अस्त्रं' शतधा मोकळीं ठेवून भरती ओसरल्यानंतरच्या दुपारच्या पुळणीची थंडगार ऊब भर पहाटे कशीतरी व कुठून तरी पांघरून पहुडली आहे—कदाचित् ' वक्षावरचा राधेच्या सुखसंग ' आता ' थंडगार उबे'त सुस्तावलेला असावा ! रेगे यांची ' पुष्क—कळावंती ' कविता या संग्रहांत तरी 'पुष्कळ पुष्कळणारी' ठरली आहे.

विंदा करंदीकर यांच्या ' ध्रुपद ' नामक काव्यसंग्रहाने त्यांच्या " मृद्गंधा "तील नव-काव्याचीं वैशिष्ट्यें नुसतीं टिकवूनच धरलेलीं आढळत नाहीत, तर त्यांत नवीन प्रयोगामुळे वेगळीकहि आणलेली आहे. या संग्रहांतील ' जातक ' विभागांत अनेक कविता ' तिच्या-' विषयींच्या अनुभूतीचे क्षण, व त्या त्या वेळच्या भाववृत्ति प्रतिमाबद्ध करतांना आढळतात. रेगे यांना शब्द-सामर्थ्याची जाणीव रहावीशी वाटते, तर करंदीकरांच्या प्रतिभेला " शब्दांची माती झाल्यावर " गाणें सुचतें; ' अनुभूतीच्या आठवणीचा विलक्षण दाब ' पडल्यावर तो 'क्षण'फुटतो आणिक नंतर क्षणांत अद्‌भुत घडून "'माझेंपण माझ्याशीं येतें" असें कवि "क्षणांत अद्‌भुत होतें " या दर्शनी कवितेंतच सांगून आपणांस विश्वासांत घेतो; " फूल मुकें राहणारच नाही " या कवितेंत कवीने सुचविल्याप्रमाणे त्यांच्या मनांतील भावफुलें काव्यरूपाने फुलणें हा निसर्गधर्मच आहे; गुपितें कितीहि लपविलीं तरी फुलें उमलणारच. पहिल्या विभागांतील अनेक कविता

तुझ्या उरांतील गुदमरणारें गाणें
गाऊं लागलें स्पर्शपल्लवी गाथा

अशा प्रक्रियेने सिद्ध झालेल्या गाथा आहेत. " मला टोचतें मातीचें यश, " " विलयाची जर वेळच आली, " " मुक्तीमधलें मोल हरवलें, " "किलबिललेलें उजाडतांना," " चित्र-गंधा, " " उभारलेली, " " हुश्शार, " " भोवळभोळी, " " वर्दळवेडी, " " जेव्हां आलिस गंधअंधशी, " इत्यादि कवितांत सूचक नाजूकपणा आहे, संवेदनांची तरल मखमल आहे. त्याउलट " उंट, " " गांठ, " " पिसाळलेल्या उग्र खुन्यासम, " " चोळी, " "खडक फोडतो अपुले डोळे," " धुक्यांत उठले सरपटशत्रू, " " म्हातारी ". वगैरे कवितांत जाणिवेचा तिरकस कोन, अनुभवांचा आडवा छेद, अनपेक्षित संबंधदर्शनें यांमुळे भावनिक क्षणांची बौद्धिकतेशीं झालेली तद्रूपता अनुभवास येते; परंतु " खोट्या पैशाचें गाणें, " " घेता, " " चिंधी " यांसारख्या कवितांत शब्दांची ध्वनिशक्ति सूचकते-पेक्षा खोचकतेकडे कललेली दिसते; तीच गोष्ट " आततायी अभंगां " ची; त्यांतील उद्दामपणा मुद्दामपणाकडे वळल्यासारखा भासतो; कूटात्मक चमत्कृति क्लृप्तीप्रमाणे वापरल्यागत दिसते; मार्मिकपणाला ध्वनिततेची जोड कमी मिळालेली जाणवते; त्यांत जोश आहे, पण नजाकत कमी आहे; रंगेलपणा आहे, पण रंगिलेपणा कमी आहे. " तालचित्रें " या नांवाने त्यांनी जे प्रतिमाप्रयोग केलेले आहेत त्यांत कल्पकताच केवळ नसून संवेदकताहि आहे. परंतु त्यांतील

तालविषयक अनुभूतींचें क्षेत्रच मुळीं फार वैयक्तिक असल्यामुळे हीं "तालचित्रें" पुरीं अर्थवाहक वाटत नाहीत. असें असलें तरी त्यांचीं "मुक्त सुनीतें" फारच अर्थव्यंजक झालीं आहेत; व्यापक विश्वात्मक संज्ञेचीं प्रस्फुरणें त्यांत प्रतिमानिविष्ट केलेलीं आहेत. विशेषतः "संहिता," "तूं गात रहा, गीतांत रहा," "आज प्रार्थना प्राणाएवढी," "हे माडांनो" या सुनीतांमध्ये आंदोलित लयींच्या मुक्तशैलीचा उपयोग करून त्यांनी जें अनुभूतिविश्व प्रकट केलें आहे तें वाचकाला स्तिमित करणारें आहे.

रेग्यांच्या "पुष्कळा"चा बाज ठुंबरीचा आहे; ध्वनिततेच्या बुंथीआडूनहि तिचे रंगढंग समर्पकपणें प्रतीत होतात; करंदीकरांच्या धृपदांतील कवितांनी जिथे दीपचंदी तालाची व अभिसारिकेच्या मंथर-मदिरतेची साथ सोडली नाही तिथे त्या हृदयंगम ठरल्या आहेत. पण अनवट असूनहि मोहक मुखड्यांची ख्याली रीत सोडून ते जेव्हा धृपद-धमाराच्या ठणठणीत प्रकृतींशीं नातें जोडतात, तेव्हा नजाकत व गोडवा जातो. त्या तऱ्हेची अनुभूति रोखठोक पद्धतीच्या व प्रकटार्थाच्या रचनाशैलींतून अधिक समर्पकपणें व्यक्त होईल असें वाटतें. इंग्रजी-प्रमाणेच मराठींतहि साध्या-सहज पण अर्थव्यंजक ध्वनींच्या "न्यू लाइन्स्" रचल्या जाण्याला भरपूर अनुकूल भूमि आहे हें गतवर्षींच्या नियतकालिकांतून प्रकट झालेल्या करंदीकरांच्याच "बालगीतां"वरून तरी वाटूं लागतें.

"जोगवा" ह्या आरती प्रभु यांच्या कवितासंग्रहाने मराठी काव्यसृष्टींत उत्कृष्ट भर पडली आहे. कोकणच्या वातावरणाचा ताजेपणा आणि पुळणीचा ओलावा घेऊन कविमन १९५३ सालीं काव्यसृष्टींत शिरलें. हिरव्या-पिवळ्या "हळदिवी" रंगाची ओढ आणि ओल्या पुळणींतील कोरीव काम यांच्या प्रतिमा प्रथम प्रथम विशेष आढळतात. काव्यात्मतेची गहिरी छाप १९५६ पर्यंतच्या कवितांत टिकून राहिलेली दिसते. या कवितांपैकीं बहुतेक अतिशय मोहक छटांनी भरलेल्या आहेत—विशेषतः "नादवेणा मौनांतली," "मिळालेलें मला लूळ," "झरे निळी सर," "गंध," "काळोखाची गांठ जियाला," "कांपऱ्या हातांनी," "वेदना," "उन्हें धावतां निळीचीं" वगैरे. परंतु अशा रम्यात्म कवितांबरोबरच "तिचा नवसाचा गर्भ," "तुझें मन," "इथेंच," आणि "विजेचा देठ तुटेना," "कपाळाला अर्धी आठी", "झाडें नग्न झालीं" वगैरे कवितांतून रूढ काव्यात्मतेकडून लोकविलक्षण प्रतिमांच्या संबंधलयींच्या नव्या शैलीकडे तोल कललेला आढळतो, आणि त्यापुढच्या "प्रारंभापासोन" तों "झाडें वाकलीं" या कवितेपर्यंतच्या काळांत कविमन त्यां नवलाईंत चांगलेंच रमून गेलेलें दिसतें. परंतु कवीने आपली भाववृत्तींची बैठक पक्की ठेवली आहे व म्हणूनच त्यानंतर १९५९मधील "भार," "मनाचा दगड," "देहपूजा" व शेवटची "डोह" या कवितांतील रचनाशैली बरीचशी सरलतेची झालेली आहे. अनुभूतींचा प्रमाणिकपणा, संवेदनांची तरलता, रंगदार शब्दलावण्य आणि निरागस मनोवृत्ति यांमुळे त्यांच्या कवितांचा ताजेपणा कायम आहे. कविता कोठल्याहि छटांनी युक्त असो-वर्णनात्मक सरळ धाटणीची असो किंवा तिरकस जाणिवांची नि चित्रात्मक प्रतिमांची असो — तिला आकार हा असावाच लागतो. धुंद धुक्याची मोहिनी अनुभूति म्हणून सयुक्तिक असली तरी कविताबंधाला कांहीतरी बंदिश लागते, चित्राकृति हवी असते. नवकवींच्या कांही नव-काव्यांत आढळून येऊं लागलेली आकारातीत धुक्याची (नेब्यूलस्) अवस्था सुदैवाने "जोगवा"-मध्ये अजून तरी आलेली नाही.

"कातरवेळ" हा शंकर रामाणी यांचा काव्यसंग्रह. कांही चांगल्या भावकविता यांत आहेत. "स्वैर भटकावें," "सांज," "किनारा" यांत, प्रस्तावकर्ते पु. शि. रेगे म्हणतात तसें कवीचें स्वतंत्र व्यक्तित्व प्रतीत झालें आहे; तशाच आणखीहि कांही कविता नांव घेण्यासारख्या वाटतात—"क्षण हंसल्या," 'मी कुणी एक पाहिली," "रात्र अशी" वगैरे. अर्थात् या कवितांत अगदी स्वतंत्र पृथगात्मकता आहे असें म्हणतां येणार नाही. तसेंच "काळरात्र झाली मीरा," "धुकें," "वेदनेच्या डहाळीला," "तुझिया रात्रीला" यांसारख्या कवितांत आढळणारी वेगळीक ज्या नव्या प्रतिमांचा आधार घेऊन आलेली आहे ती कवीच्या मूळ काव्यात्मतेशीं बेमालूम जुळणारी वाटत नाही. कवीने आपली अभिव्यक्ति जशी केवळ सांकेतिक होऊं देतां कामा नये, त्याप्रमाणे त्याने आपल्या काव्यात्मतेच्या जिव्हाळ्याची भावपूर्ण बैठकहि सोडून चालणार नाही; कारण सर्वच जुन्या गोष्टी जशा सदासर्वदा नित्यनव्या राहत नाहीत, तशा सर्वच नव्या तऱ्हा स्वतःच्या व्यक्तित्वाला पोषक असतील असें नाही. या संदर्भात **दिंडी गेली पुढें** हा मधुकर केचे यांचा कवितासंग्रह लक्षांत घेण्यासारखा आहे. छोट्याशा कवितांचा हा छोटासा संग्रह काव्यगुणांबाबत भरघोस ठरणारा आहे. संतांच्या वाणीवर पोसलेली भाववृत्ति व काव्यात्मतेने भरलेलें व्यक्तित्व हें उत्कट उमाळ्यामुळे व तळमळीमुळे जेव्हा कवितारूपाने प्रकट होतें तेव्हा तें अंतरंगाला कळतें. पान १४ वरची "जेव्हां कळलें ...." ही कविता, पृ. १८ वरची "टिकलीएवढें ..." पृ. २० वरील "माझ्यासमोर सागर," पृ. ३२ वरील "अवघें ब्रह्माण्ड," पृ. ४४ वरील "एका नव्या जाणिवेंत" अशा कांही कवितांत या सामर्थ्याची चाहूल लागते. मराठी काव्याची दिंडी पुढे पुढे जात राहणारच. तिला झिपटतां न आलें तरी मागिलांनी स्वतःला लंगडें मानून घेण्याचें कारण नाही; आधीच्या दिंडीच्या अभंगाचे सूर जर आठवत असतील तर ते विरलेले नाहीत. कारण ज्या तुकयाच्या अभंगवाणीचे सूर या कवितांत पडसादतांना आढळतात त्याने दिंडीच्या बाहेर राहूनहि दिंडीची सेवा केली होती. मात्र कवीच्या कवितेंतील हे उदासवाणे उद्‌गार एक भाववृत्तीचा क्षण म्हणून रसिकांच्या लक्षांत राहतील.

रवींद्र बोरगांवकर यांचा "**रुजवा**" आणि लक्ष्मीकांत तांबोळी यांचा "**हुंकार**" हे दोन कवितासंग्रह अशाच तऱ्हेच्या कांही उत्कट व भावपूर्ण कवितांनी नटलेले आहेत. "**रुजवा**"-मधील बोरगांवकरांची पहिलीच कविता "रुजवा" वेधक आहे. काव्यात्मतेचे पूर लोटल्यावर कवीच्या भावविश्वाची काय स्थिति होते तें पर्यायाने यांत सूचित झालेलें असावें. पुराने वेळ घेरली नि रात्र थरारली, रात्र भूगर्भाशीं भिडली नि पात्र नभावरी चढलें—अशा उत्कटतेंत "लक्ष वेळ रुजते, तिला नक्षत्रांची फुलें येतात आणि अव्हेरलेलें बिंब लाटांतून झुलतें." मंगेश पाडगांवकरांनी प्रस्तावनेंत या कवितेंतील प्रतिमांची विशिष्टता दर्शविली आहे ती योग्यच आहे. तसेंच "दुपार," "ऊन असावें," "विश्व अनोखें," "कांच काचावी मनाची" यासारख्या कवितांत कवीची आत्मीय वेगळीक जाणवते. लक्ष्मीकांत तांबोळींच्या "**हुंकार**" मध्ये अशा वेगळ्या उठून दिसणाऱ्या कविता "हुंकाराचा घुमे पारवा," "आतां फक्त उरलेली," "झाला रात्रीचा चांदवा" या आहेत. सांकेतिक परंतु वेधक भावकाव्यें म्हणून "तुझ्यांत असलें विश्व निराळें," "मावळतीचें स्वप्न," "सोहळा," "तुडुंब भरली यमुना ..." "शीळ होती ओठावर" वगैरे कवितांकडे बोट दाखवितां येईल. परंतु यापलीकडचें परमोत्कट किंवा दाहक व्यक्तिमत्त्व या संग्रहांत तरी व्यक्त झाल्याचा प्रत्यय येत नाही. कवि रस-गंगाधर यांच्या "**जाग**" या कवितासंग्रहाची गत बरीचशी अशीच आहे. त्यांतील अनेक कवितांत मोहक भावतरंग उमटले आहेत—"बहुरुपी," "तुझ्या डोळ्यांत," "सागराला जाग आली," "तीन अभंग,"

"याच भीषण धुंदींत," " क्षणाक्षणाच्या अंतरीं " इत्यादि कवितांत, "जीवनाच्या संघर्षांत" किंवा " क्षणिका " यांसारख्या कवितांत सूचक प्रतिमात्मकता आणण्याचा प्रयत्न आहे, पण त्यांतूनच अनुकरणात्मकतेचा पडसाद उमटलेला ऐकूं येतो. वर्णनपर भावगीतांची निर्मिति व्हावयास अनुकूल अशी मनोवृत्ति अनेक कवितांत आढळते, पण तिचा परीघ मर्यादित आहे, गति रुंधलेली आहे. प्रभावी नि पृथगात्म व्यक्तिमत्त्वाचा ठसा उमटलेला आढळत नाही. के. अंबादास यांच्या "मंदिर" संग्रहांत काव्याची हौस व हौसेचें काव्य आढळतें एवढेंच. यांतील कविता प्रसंगोपात्त रचलेल्या पद्यांच्या व गाण्यांच्या स्वरूपाच्या आहेत. कांही ठिकाणीं शैली नीटस आहे. " कांहीं कणिका, " " यामिनी गे, " " शोध, " " ही नवीन पाउलवाट " यांतील पद्यरचना चांगली आहे. परंतु वैयक्तिकतेच्या पलीकडे जाऊन रसिकांच्या मनाची पकड घेईल अशी उत्कट अस्मिता निदान या कवितांत तरी प्रकट झालेली नाही.

यशवंत कवींच्या "पर्वकाल ये नवा" या संग्रहांत पांच संगीतिका ग्रथित केलेल्या आहेत. प्रस्तावनाकार श्री. विठ्ठलराव घाटे यांनी निर्देशिल्याप्रमाणे त्या सुबोध आहेत व त्या अर्थानेच 'प्रसन्न' आहेत. "प्रतापगड " मध्ये पोवाड्याची धाटणी आहे, " जीवितनौका " मध्यें भग्न हृदय-प्रेमिकांची प्रदीर्घ कालावधीने भेट घडून आली तर तेथे कोणतें भाव-नाट्य प्रकट होईल तें पद्यमय संवादरूपाने-कवीच्या शब्दांत म्हणजे " जिवाभावाच्या गाण्यां " नी आकारित केलें आहे. "देव्हाऱ्यांतील नाणें" यांतील मध्यवर्ती कल्पना काव्यात्म आहे; "आसवांची संहिता वाचतां ही कथा व देवता ज्ञात होते, कोणत्याहि पुराणांत जी आढळणार नाहीं" असा आशय कवीने भरतवाक्य म्हणून नारदाच्या तोंडीं घातला आहे; " पर्वकाळ ये नवा " ही संगीतिका चिंतनात्मक अधिक आहे. अगदी बोधात्मक वाटावी इतकी थीटपाठ आहे; आणि " सुसर आणि वानराचा पोर " ही बालगोपाळांसाठी लिहिलेली एक सस्वर सताल श्रुतिका आहे. संगीत श्रुतिकांचा पिंडच दृश्य–श्राव्य व लोकगम्य आशयाचा घडलेला असतो. त्यांतून ह्या संगीतिका प्रयोगात्मक असल्यामुळे त्यांत वाचकाला दिपवून टाकणारे रचनाबंध किंवा आर्तोत्कट भावगुंजन यांची अपेक्षा करणें अयोग्य ठरेल. यशवंत कवींची नवनवे प्रयोग करण्याची अजून कायम राहिलेली वृत्ति मात्र निःसंशय कौतुकास्पद होय.

वैयक्तिक कवितासंग्रहांमध्ये शिरीष पैंचा 'कस्तुरी' हा वैशिष्ट्यपूर्ण संग्रह, संजीवनी मराठे यांचा अलीकडच्या गीतांचा "परिमला" संग्रह आणि मीना दीक्षित या कवयित्रीच्या नीटस व पृथगात्म काव्यांचा संग्रह "मीना" यांचा समावेश करावयास पाहिजे. याशिवाय अलीकडच्या काळांतला परंतु मध्यकालीन धाटणीचा भक्तिमय "श्रीगुरुदेवचरितामृत" हा निंबाळहून प्रसिद्ध झालेला म. श्री. देशपांडे यांचा ग्रंथ नमूद करावयास हवा.

याशिवाय नवीन कवींच्या काव्यांचीं संकलनेंहि प्रकट झालीं आहेत. त्यांत देशपांडे–प्रभु–संपादित **आरती**संग्रह, प्र. अ. भारतीकृत संकलन **गंधवती**, मांडवकर–भोयर–साखरकर–सेलूकरांचा **नव्हाळी** संग्रह, भा. ल. रानडे संपादित **कल्पफुलें** इत्यादि संग्रह मुख्य आहेत. वेगवेगळ्या मराठी प्रदेशांतील कवींच्या कविता यांमध्ये संकलित झाल्या आहेत.

## प्राचीन काव्यें

गेल्या वर्षी प्राचीन कवींच्या निवडक उताऱ्यांचा एक व निवडक भावकाव्यांचा एक असे दोन संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. "नवें नवनीत" या नांवाने ज. श. देशपांडे यांनी

प्राचीन-अर्वाचीन कवींच्या पद्यप्रबंधांचा संग्रह संपादित केला आहे. त्यांतील जुन्या कवींच्या कविताच कांहीशा वैशिष्ट्यपूर्ण आहेत. अलीकडील कवींच्या काव्यांची निवड केवळ भरताड म्हणून वाढविल्यासारखी झाली आहे. नवनीताच्या शतसांवत्सरिक आवृत्तीमुळे **'नवें नवनीत'** कांहीसें अनावश्यक झालें आहे; पण त्यांतील लिंगायत-किरिस्तांव-जैन वगैरे कवींचे उतारे चांगले आहेत. पण ग्रंथाचा एकंदर प्रचंड खटाटोप पाहतां संपादकांच्या हौशीचें कौतुक वाटलें तरी श्रमांचें वैयर्थ्य पाहून वाईट वाटतें. मराठी काव्याची त्यांची आवड यापेक्षा सुटसुटीत, व्यवस्थित व रसिकदृष्टीच्या कवितासंग्रहाने प्रकट झाली असती तर फार बरें झालें असतें असें वाटल्यावाचून राहत नाही. **''प्राचीन गीतभांडार''** हा प्राचीन कवींच्या जवळजवळ साडेतीनशे निवडक भावगीतांचा संग्रह बा. ग. जोशी यांनी संपादित केला आहे. प्राचीन कवींची रसदृष्टि व आधुनिकांची कलादृष्टि यांतील समांतर धागे उलगडून दाखविण्याच्या दृष्टीने यांतील गीतांची निवड झालेली असून आवश्यक सूचक टीपा, प्रथम चरणांची सूचि वगैरे देऊन संग्रह व्यवस्थित स्वरूपांत प्रकट करण्याचा प्रयास त्यांत केलेला आहे. अशा तऱ्हेच्या गीतसंग्रहाची उणीव भासत होती व ती बरीचशी भरून निघावी असें या **''गीतभांडाराचें''** स्वरूप आहे, असें जर या संग्रहाचें वर्णन केलें तर तें उचित व न्याय्य वाटावें. सरोजिनी बाबर यांनी जुनीं स्त्रीगीतें एकत्र करून त्यांतून ग्रामीण मराठी स्त्रीमनाचा मागोसा घेण्याचा चांगला प्रयत्न चालविलेला आहे व त्यांचें अलीकडचें दृश्य फळ म्हणजे **''रुखवत''** हा स्त्रीगीतांचा संग्रह होय. सोज्ज्वळ व निरागस स्त्रीहृदयाचे पडसाद यांत उमटले असणें अगदी स्वाभाविक होय.

प्राचीन ग्रंथांचीं संपादनेंहि गेल्या वर्षी झालीं. कृष्णदयार्णवांच्या **''हरिवरदा''** या सुप्रसिद्ध ग्रंथाचा ५ वा खंड रा. चिं. ढेरे यांनी संपादित केला आहे. तसेंच शेख महंमद बाबांचा **''योगसंग्राम''** हा तत्त्वज्ञानात्मक ग्रंथ उत्तम प्रकारें संशोधून बा.सी. बेंद्रे यांनी संपादित केला आहे. अभिजात जुन्या ग्रंथांच्या प्रमाणभूत संहिता उपलब्ध होणें अत्यंत आवश्यक होय. वरील संपादन-प्रयत्नांनी त्या दिशेकडे पावलें पडत असल्याचें कळून येतें. दे. ल. महाजन-प्रथित **''श्रीदेवीमाहात्म्यसार''** हा ग्रंथ दुर्गामातेच्या प्राकृत प्रशस्तीचें सार आहे. त्या तऱ्हेच्या भक्तींत रममाण होणारा मोठा वर्ग अजून महाराष्ट्रांत आहे. त्याला हा ग्रंथ फारच उपयोगीं पडेल असा आहे.

## विशेषांकांतील कविता

**रूपगंधा**—या काव्याला वाहिलेल्या नियतकालिकाचे दोन अंक गतवर्षी निघाले. **छंद-सत्यकथांच्या** प्रत्येक अंकांतून चांगल्या कविता प्रकट झाल्या. बहुतेक नियतकालिकांचे दिवाळी अंक कवितांच्या गुच्छांनी दरवळलेले आहेत. नव-काव्याला एवढें प्रमुख स्थान प्राप्त व्हावें हा कवींच्या खऱ्या सामर्थ्याचाच महिमा होय. अशा कांही ठळक विशेषांकांत '' सत्यकथा, '' '' मौज, '' '' दीपलक्ष्मी, '' '' दीपावली, '' '' साधना, '' '' नवयुग, '' ''केसरी,'' ''आनंदवन,'' ''सुगंध,'' ''गांवकरी,'' ''वाङ्मयशोभा,'' '' किर्लोस्कर,'' यांचे दिवाळी अंक व '' विवेक''चा विजयादशमी विशेषांक हे अंक विशेष लक्षांत राहण्यासारखे झाले आहेत. मराठी कवींच्या गेल्या तीन पिढ्यांमधील कवि-मंडळींनी आपापले काव्याविष्कार मराठी रसिकांना सादर केले आहेत. सोपानदेव, ना. घ. देशपांडे, बोरकर, कुसुमाग्रज, ठोकळ, काळेले, पु. शि. रेगे, वि. म. कुलकर्णी, करंदीकर, पाडगांवकर, वसंत बापट, दिलीप चित्रे, आरती प्रभु इत्यादि अनेक नवे-जुने कवि त्यांत दिसतात. खास लक्षांत राहण्यासारख्या

अनुक्रमणिका

कविता अनेक प्रसिद्ध झाल्या आहेत. त्यांतील कांही वैशिष्ट्यपूर्ण कविता ह्या आहेत. पु. शि. रेगे–" गाणें " ( मौज ); ना. घ. देशपांडे–" उभा अंधार शरमला " ( साधना ); " कांही नाही–" ( केसरी ); बोरकर–" चित्रवीणा " ( किर्लोस्कर ); कुसुमाग्रज– " बाजीराव " ( किर्लोस्कर ); " असेंच कांही " ( दीपावली ); " सांची " ( नवयुग ); " माता " ( केसरी ); इंदिरा–" चुकलें माझें " ( गांवकरी ); "वातलीं ना कानामध्ये" ( सत्यकथा ); वसंत बापट–" तूं गर्भालस " ( साधना ); मंगेश पाडगांवकर–" कळी दव होण्याआधीं " ( किर्लोस्कर ); " तोंवर उमा राहीन " ( मौज ), " तुझी स्तूण .... " ( सत्यकथा ); " पक्षी " ( दीपावली ); " कैदी " ( आनंदवन ); " एक अस्तित्व " ( केसरी ); विंदा करंदीकर–" बालगीतें " ( मौज, सत्यकथा, केसरी, साधना, ); सदानंद रेगे–" पांगारा " ( नवयुग ); " माझा डोळा होतो आकाश " ( आनंदवन ); " जाग " ( सत्यकथा ); पद्मा–" ती तशीच आहे " (केसरी); " मी अंधार होऊन लपलें होतें " ( मौज ); दिलीप चित्रे–" हीं बर्फाचीं गंधवादळें " ( मौज ); " माझे कान ऐकतात किनाऱ्यावर " ( सत्यकथा ); " रेडियमच्या जंगलाप्रमाणें " ( दीपावली ); " गझल " ( साधना ); ग्रेस–" जन्म " ( सत्यकथा ); " चित्र " ( दीपावली ); " शोकगीत " ( साधना ); पद्मा लोकूर–" क्षितिजाच्या रेषेपाशीं " ( दीपावली ); सरिता पदकी– " वर्षे " ( केसरी ); आरती प्रभु–" मी श्वास पेरिले होते " ( मौज ); माडगूळकर– " शिववैराग्य " ( विवेक ).

### फलित

गतवर्षीच्या मराठी कवितांचा एकंदर विस्तार लक्षांत घेतल्यावर एक गोष्ट स्पष्टपणें नजरेंत भरते ती ही की, मराठी काव्याला पुन्हा एकदा महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें आहे. नव्या–जुन्या सर्वांवर आविष्काराच्या तिरकस, दूरान्वित, सूचक पद्धतीची जबरदस्त मोहिनी पडली आहे. नवीन कविता सुबोध नसली तरी ती एका तपापूर्वी वाटली तेवढी दुर्बोध वाटत नाही. आता तर या नव्या कवितेलाहि एक साचेबंदपणा येऊं पाहत आहे. संकेत,शब्दसंहति, लय या सर्व बाबतींत अनुकरणाची लाट येऊं लागली आहे. वेगळेपण दाखविण्याच्या सयुक्तिक इच्छेच्या पोटीं, संबंधलयींचा परीध अमाप रुंदावत जाऊन त्याला आकारहीन व्यावर्तमयतेचें किंवा धुकेपणाचें रूप येऊं पाहत आहे, व अशा वेळीं चूट, लकबी, चमत्कृति यांचाच पसारा वाढत जाऊन मुख्यार्थाचें सूचन डावललें जात आहे की काय असा संभ्रम उत्पन्न होत आहे. अगदी सरळसोट व धोपटमार्गी गेय कवितेची पुनः प्रस्थापना होणें आज जरी शक्य वाटत नसलें तरी केवळ गुंतागुंतीच्या, तिरप्या छेदाच्या, अबोधप्राय अशा कवितांच्या पुढे एखादी मिताक्षरी, ध्वनिसंकुल पण चित्राकृतिमय अशी नवीनतर कविता मराठींत येणें शक्य आहे असें कांही रचनांमुळे वाटूं लागलें आहे. करंदीकर, चित्रे, आरती प्रभु यांच्या अगदी अलीकडच्या कवितांपैकी कांहींचा घाट या तऱ्हेला जवळचा आहे. कांहीं झालें तरी मराठी कविता ही विकास पावत राहणारच; आहे त्या स्वरूपांत ती फार काळ तशीच राहणें कठीण आहे. एक पर्याय शक्य आहे व तो असा की, आत्यंतिक बौद्धिक-भावनिक पातळी-वरची कवितेची लौकिक वाढ फार मर्यादित होऊन वर दर्शविलेला नवतर प्रवाह मराठी कवितेच्या क्षेत्रांत विकास पावेल. मराठी कवितेला अशी अवस्था येऊं लागल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं आहेत. अर्थात् काव्यरसिक महाराष्ट्राला अशी अधिकाधिक समृद्ध होणारी कविता आवडत राहील याबद्दल शंका नाही. ● ● ●

प्रा. भवानीशंकर श्री. पंडित, एम्. ए.

# बालवाङ्मय

गुदस्ता प्रसिद्धि पावलेल्या बालवाङ्मयाचें हें विहंगमावलोकन आहे. कारण समग्र वाङ्मयाचा पुस्तकशः व लेखशः परामर्श घेण्याचा विचार केला, तर तो शक्य कोटींतला होणार नाही व व्यवहार्य ठरणार नाही. अलीकडे आनन्द, शालापत्रक, बालसन्मित्र, मुलांचें मासिक व बालक या खास मुलांच्या साहित्यासाठी वाहिलेल्या मासिकांतून, स्त्री-मासिकांत खास लहान मंडळीसाठी राखून ठेवलेल्या विभागांतून आणि लोकसत्ता, सकाळ, तरुणभारत, गांवकरी इत्यादि मतपत्रांच्या रविवारच्या अंकांतून बालवाङ्मय विपुल प्रमाणांत प्रसिद्ध झालें आहे आणि प्रचंड प्रमाणांत प्रसार पावलें आहे. या नैमित्तिक वाङ्मयाशिवाय ढवळे पॉप्युलर प्रकाशन, चित्रशाळा प्रकाशन, महाराष्ट्र प्रकाशन, आनंद प्रकाशन, व्हीनस प्रकाशन इत्यादि संस्थांनी पुस्तकांच्या स्वरूपांत भरीव वाङ्मय निर्माण केलें आहे. तेंहि संख्येने कमी नाही. हें सारेंच वाङ्मय सकस व सरस आहे असें म्हणण्याचें धाडस कुणीच करणार नाही. परंतु ' नमुना ' म्हणून त्यांच्यांतील कांहींकडे अंगुलिनिर्देश करतां येईल. याचा अर्थ असा नाही की तेंच तेवढें नमुनेदार आहे. त्याशिवाय पुष्कळ नमुनेदार असण्याचा संभव आहे. परंतु त्या सर्वांची खानेसुमारी करणें म्हणजे शंख आणि शिंपले यांची मोजदाद करण्यासारखें होणारें आहे. तेव्हा या संक्षिप्त समालोचनांत तिकडे हेतुपुरस्सरच दुर्लक्ष केलें आहे.

बालवाङ्मयाच्या या प्रचंड उत्पादनावरून मुलामुलींच्या समाजांत वाचनाची आवड दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत आहे असा कुणी निष्कर्ष काढल्यास तो चुकण्याचें कारण नाही. सध्या खेड्यापाड्यांतूनहि बालक--मंदिरें उघडत आहेत तीं हा निष्कर्ष खरा असल्याचा पाठपुरावा करतील. याशिवाय अलीकडे ' स्वराज्यां 'त शासनाकडून प्रौढसाक्षरांच्या शिक्षणाला उत्तेजन देण्यांत येत आहे. त्यासाठी जिल्हानिहाय सरकारी वाचनालयें स्थापन करण्यांत येत आहेत आणि त्यांच्याकरिता ग्रंथनिर्मिति करणाऱ्या साहित्यिकांना प्रांतीय शासन व मध्यवर्ती शासन पारितोषिकें देत आहे. प्रौढसाक्षरांसाठीं निर्माण होणारीं उपयुक्त पुस्तकें हीं बालवाङ्मयांतच जमा होणारीं आहेत. तेव्हा या समालोचनांत त्यांचाहि परामर्श घेतला आहे. बालवाङ्मयाच्या निर्मितीला उत्तेजन मिळावें या उद्देशाने प्रांतीय शासनाने एक साहित्य-समिति स्थापिली आहे आणि शिक्षणखात्यामार्फत निरनिराळ्या जिल्ह्यांतून शिक्षकांचीं शिबिरें भरविण्यांत येत असून पुस्तक-लेखनाचें कार्य चाललें आहे. तेव्हां मागणी आहे म्हणून पुरवठा होत आहे, विकतें आहे म्हणून पिकतें आहे हें अर्थशास्त्रीय सूत्र सत्य म्हणून लक्षांत घेणें आवश्यक आहे. प्रकाशनसंस्थांची दृष्टि व्यापारी असल्यास आश्चर्य वाटण्याचें कारण नाही. त्यांना बालवाङ्मयाचें प्रकाशन किफायतशीर वाटत आहे. शिवाय त्या वाङ्मयांतील बालोपयोगी कथाकवितांचीं पुस्तकें व शालोपयोगी पाठ्य-पुस्तकें वर्षांतून दोन-तीन वेळां फाटत असल्यामुळे त्यांचा खप अखंड असतो. तेव्हा एकंदर या परिस्थितीचें फल-स्वरूप म्हणून ही विपुल बालवाङ्मयानीर्मित आहे. अर्थात् देशांतील प्रत्येक घटकाला लेखन व वाचन आलें पाहिजे या व्यापक दृष्टीने ती आवश्यक व उपकारक आहे याविषयी वाद नाही.

बालवाङ्मयाच्या उपयुक्ततेची ही एक बाजू झाली. तिला दुसरी एक उलट बाजू आहे; तीहि लक्षणीय आहे. बालवाङ्मयाचा प्रसार हा मूलपणाच्या बाल, किशोर व कुमार या तीन अवस्थांपर्यंत म्हणजे साधारणत: वयाच्या सोळाव्या वर्षापर्यंत असतो असें मानतां येईल. अर्थात् या बाबतींत प्रौढसाक्षरांच्या वयाकडे लक्ष देण्याचें कारण नाही. या अवस्थांत ' गुरु-मुखा'ची अत्यंत आवश्यकता असते तिकडे समाजाचें दुर्लक्ष होत आहे. बालवाङ्मयाच्या प्रसारामुळे मुलें व मुली मनांतल्या मनांत वाचावयास शिकतात. याचा एक दुष्परिणाम म्हणजे त्यांच्या वाणीवर व कानांवर गुरुमुखांतून निघालेल्या शुद्ध उच्चारांचे संस्कार होत नाहीत. तीं मोठ्याने वाचूं लागलीं म्हणजे पदोपदीं अडखळतात. पुस्तकांत एखादें संस्कृत सुभाषित असल्यास तें त्यांना नीट वाचतां येत नाही. त्यामुळे अलीकडे समाजांत अमोघ पाठान्तरें असलेलीं व अस्खलित भाषणें करणारीं माणसें क्वचित् आढळतात. शिवाय या अवांतर वाचनाचा अप्रत्यक्ष परिणाम स्वतंत्र विचारशक्तीवरहि होतो. मात्र अक्षरओळख, माहिती मिळविण्याचें एक साधन व वेळ घालविण्यासाठी मनोरंजन या दृष्टींनी त्याचें महत्त्व नाकारतां येत नाहीं.

बालवाङ्मयांत कथेला आद्यस्थान आहे. मुलांना कथेची आवड जात्याच असते. ती ऐकतांना त्यांच्या चेहेऱ्यांवरील भिन्न भिन्न मनोविकार प्रेक्षणीय असतात. कथा सांगण्यासाठी असते. तेव्हा ती लिहिली तरी तिची शैली निवेदनाची हवी; त्याशिवाय ती बालमनाला पटणार नाही. गुदस्ता कथा-वाङ्मयाची निपज भरपूर झाली आहे. परंतु त्यांत काकोडकर हे पुन्हा पुन्हा त्याच त्या 'अरबी सुरस कथा' सांगत आहेत, देवळे त्याच त्या जुन्यापुराण्या ' ऐतिहासिक कथा ' निवेदन करीत आहेत, जोशी ' हितोपदेशांतील त्याच त्या धूर्त कोल्ह्याच्या व मूर्ख गाढवाच्या गोष्टी ' कथन करीत आहेत आणि बालवाङ्मयाचे जनक कै. सदाशिव काशीनाथ छत्रे यांच्या ' इसापनीति कथा ' पुनरावृत्त होत आहेत, तरी त्यांच्यांतला गोडवा यत्किंचि-तहि उणा झालेला नाही हें ध्यानांत घेण्याजोगें आहे. याचें कारण त्या कथांत मानवी स्वभा-वाचें सूक्ष्म निदर्शन आहे आणि त्याच्या अंतःकरणांतील प्रेम, दया, त्याग, न्याय, नीति इत्यादि प्रेरणांचें मार्मिक दर्शन आहे. मुलांना त्यांचें प्रत्यंतर पटतें. परंतु तें शब्दांत सांगतां येत नाही. त्यांचें वय वाढलें म्हणजे मग त्यांना त्या बालपणीं ऐकलेल्या गोष्टींची आठवण येते आणि त्यांच्यांतील ' सत्यं शिवं सुंदरम् ' चा साक्षात्कार घडतो.

शेक्सपियर, टॉल्स्टॉय, ह्यूगो इत्यादिकांच्या कथांना 'मराठी शेक्सपियर,' 'पाचूचें बेट', ' दया तिचें नांव, ' ' जे का रंजले गांजले, ' हे मराठी पेहेराव चढवण्याचें कार्य भागवत, हेगडे, शुक्ल प्रभृति लेखकांनी केलें आहे आणि त्यांत त्यांना पुष्कळ यश आलें आहे. या पाश्चात्त्य कथाकादंबऱ्यांचा विशेष म्हणजे त्यांच्यांतले अद्‌भुतरम्य वातावरण व त्याच्या पार्श्वभूमीवर रेखाटलेलीं शौर्य, साहस, प्रेम, पराक्रम, कर्तव्यनिष्ठा आदि मानवी सद्‌गुणांची रोमहर्षक चित्रें होत. मुलांच्या शुद्ध भावना उद्दीपित करण्याच्या दृष्टीने या कथाकादंबऱ्या प्रशंसनीय आहेत. मुलांप्रमाणे त्या मोठ्यांनाहि प्रिय व्हाव्यात अशी त्यांची जडणघडण आहे.

वरील विशिष्ट प्रकारच्या कथांशिवाय मुलामुलींना पचतील व रुचतील असे कांही स्वतंत्र कथांचे चिमुकले संग्रह प्रसिद्ध झाले आहेत त्यांची बालप्रियता दृष्टीआड करतां येत नाही. त्यांत प्रा. तारळकर यांच्या 'नानागोष्टी,' दुर्गा भागवत, यांच्या 'तामीळनाडच्या लोककथा,'

लीला भागवत यांच्या ' चिट्टू पिट्टूचा पराक्रम व इतर गोष्टी,' दादा प्रधान यांचा ' अशो-कांचीं फुलें, ' नारखेडे यांच्या ' कालच्या गोष्टी ' इत्यादि संग्रहांचा समावेश होतो. दुर्गा भागवत यांच्या 'तामीळनाडच्या लोककथा' स्वतंत्रच म्हटल्या पाहिजेत. कारण काल्पितापेक्षा सत्यच हें पुष्कळ वेळां अधिक अद्भुत व मनोवेधक असतें. शिवाय कथेचें आकर्षण हें तिच्या स्वतंत्रपणावर अगर परकेपणावर अवलंबून असत नाही. तिची सारी माधुरी कथन-पद्धतीवर अधिष्ठित असते.

मुलांच्या वाङ्मयांत नाटकें बहुधा दृष्टीस पडत नाहीत. कारण अव्याज बालकांना थोरामोठ्यांचें ' सोंगढोंग ' साधत नाहीं. ' लपवाछपवी ' त्यांच्या स्वभावांतच नसते. परंतु ती तर नाटकाचा आत्मा आहे. मात्र या संबंधांत एक गोष्ट लक्षणीय आहे. ती अशी की, मुलें पुष्कळ वेळां प्रौढांचें ' अनुकरण ' करतात. परंतु प्रौढांना मात्र मुलांचें ' अनुकरण ' साधत नाही; आणि त्यांनी तें साधण्याचा प्रयत्न केला तर ' बालिश ' ठरतें. असें असूनहि सुविख्यात नाटककार पु. ल. देशपांडे यांचा ' नवें गोकुळ ' हा या सदरांतील बालनाटिकांचा एकुलता एक संग्रह कल्पनातीत विजयी ठरला आहे. परंतु त्याचें स्वरूप प्रत्यक्षापेक्षा ' अप्रत्यक्ष ' अधिक आहे. तें डोळ्यापेक्षा ' कानां'ना अधिक जाणवतें. तो नाटिकांचा संग्रह खरा, परंतु त्यांत ' नाट्य ' कमी आहे. ' शब्द ' जास्त आहेत.

बालकांना कथेच्या खालोखाल कवितेचा मोह असतो. कविता त्यांच्या ' संबंधी ' नको, ती त्यांच्या ' करिता ' हवी. तिचा अर्थ साधा, सरळ व सोपा हवा. किंबहुना तो नसला तरी चालेल. मात्र तिच्यांत यमक-योजना हवी, आणि तिची ' चाल ' सहज हवी. अशा नादमधुर सयमक कवितांना इंग्रजींत ( Nonsense Verse ) असें नांव आहे. आपल्याकडे निरर्थक नादमंजुळ 'बाळबोल' पुष्कळ आहेत त्यांची रचना वाटते तितकी सुकर नसते. गेल्या सालीं श्रीपाद डोंगरे यांचे 'चणे घ्या चणे' शुक्ल यांचे,'डुलूडुलू' व 'छान छान गाणीं,' नलिनी पायगांवकर यांचें ' छोटी नीरा ' व ' लक्लक् नि सुनंदा ' आणि मनोहर टेकाडे यांचा 'बालगीतें' हे कविता-संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. या संग्रहांत आपल्या विशेषगुणांनी डोळ्यांत भरेल, कानांत शिरेल असा संग्रह नाही हें कबूल केलें पाहिजे.मात्र डॉ.वि म. कुलकर्णी यांचा 'ललकार' हा बालगीत-संग्रह उल्लेखनीय आहे. रविवारच्या ' सकाळ ' मध्ये राजा मंगळवेढेकर यांचीं बालगीतें येत असतात. त्यांपैकीं अनेक गीतें बालमनोविज्ञानाच्या आणि कलेच्या दृष्टीने उत्कृष्ट आहेत हें आवर्जून सांगणें आवश्यक आहे. मात्र या गीतांचें संकलन अजून बाहेर पडलेलें नाही. अली-कडे अलीकडे सुप्रसिद्ध कवि विन्दा करंदीकर हेहि ' मुलांसाठी ' कविता-लेखन करूं लागले आहेत. त्यांच्या कविता कांहीशा निराळ्या व नव्या आहेत. त्यांत ' मुलांचें मन ' आहे.

मुलें फुलांप्रमाणे स्वभावतःच हसरीं व नाचरीं असतात. त्यांना विनोद विशेष आवडतो. या दृष्टीने ' आला विदुषक आला ' हा लीला भागवतांचा कविता-संग्रह प्रशंसनीय आहे. मुलांच्या कवितेंत बोध नसावा असा एक पक्ष आहे. परंतु अप्रत्यक्ष बोध मुलांना रुचतो हें सत्य लक्षांत घेतल्यास, त्या प्रकारची कविता मुलांकरिता लिहिण्यास प्रत्यवाय नाही. अशा प्रका-रची उपदेशपर कविता हिंदी वाङ्मयांत विपुल आहे. त्या कवितेंतील ' उक्ति ' हिंदी मुलांच्या तोंडीं खिळलेल्या असतात. मराठी वाङ्मयांत या दिशेने प्रयत्न होणें आवश्यक आहे.

मूलपणाच्या बाल व किशोर या अवस्थांत कथा, कविता, उखाणे, कोडीं इत्यादि मनो-रंजनपर सामग्री प्रिय असते, परंतु कुमार-कालांत चरित्रपर व विज्ञानविषयक वाङ्मयाची

अभिरुचि उत्पन्न होते. मुलांसाठी जीं चरित्रें लिहावयाचीं तीं श्रेष्ठ व आदर्श व्यक्तींचीं असलीं पाहिजेत. लहान मुलांनीं मनें श्रद्धा व विश्वास यांनी युक्त असतात. त्यांना साधुसंतांविषयी भक्तिभाव, वीर पुरुषांबद्दल अभिमान, शास्त्रज्ञांसंबंधीं आदर व नेत्यांसंबंधीं आत्मभाव वाटत असतो. या दृष्टीने महेश यांच्या ' सुरस संतकथां'चा उल्लेख आवश्यक आहे. त्या पुस्तकाचें स्वरूप कथात्मक असलें, तरी कथांच्या द्वारे लेखकाने संतांचीं चरित्रें सांगितलीं आहेत. या विभागांत यदुनाथ थत्ते यांच्या द्विखंडात्मक ' आधुनिक भारत-महर्षि ', दीक्षित यांचा ' तात्या टोपे ', गोंधळेकर यांचा 'मुलांचा प्रल्हाद', शिखरे यांचा ' राष्ट्रगुरु समर्थ रामदास ' आणि मराठे यांचा ' संतश्रेष्ठ तुकाराम, या ग्रंथांचा निर्देश आवश्यक आहे.

परंतु या विभागांतील विशेष महत्त्वाचे ग्रंथ म्हटले म्हणजे पुरंदरे यांचा दोन खंडांतील दहा भागांचा 'राजा शिवछत्रपति', कोगेकर यांच्या 'संशोधकांचें बालपण' याचे दोन भाग आणि वि. स. सुखटणकर यांच्या रामकृष्ण परमहंस, भगिनी निवेदिता, विवेकानंद व रामतीर्थ यांच्या बोधकथा होत. हे ग्रंथ आबालवृद्धांना सारखेच पूज्य वाटतील एवढ्या योग्यतेचे आहेत. त्यांत भक्ति असली, तरी ती डोळस आहे आणि चिकित्सा असली, तरी ती कुत्सेपासून अलिप्त आहे. पुन्हा या चरित्रग्रंथाचें स्वरूप रसमय आहे हें विशेष आहे.

---

गेल्या दीडशे वर्षांतील एकंदर मराठी वाङ्मयाचें जर फार मोठें कोणतें वैगुण्य असेल, तर तें विज्ञानविषयक ग्रंथांचा पूर्णतया अभाव हें होय. वास्तविक विचार केला तर आज-पर्यंत मराठी वाङ्मयाची वाढ ही एकांगीच झाली आहे. तिचें ललित अंग समृद्ध व संपन्न आहे. परंतु विज्ञानाचें अंग लुलेंपांगळें आहे. यापुढें स्वराज्यांत तें परिपुष्ट करण्याचा प्रयत्न होणें अत्यावश्यक आहे. मोठ्या भाग्याची गोष्ट आहे की, गुदस्ता मुलांच्या दृष्टीने विज्ञानाचें मूलभूत ज्ञान सोप्या शब्दांत समजावून सांगणारीं कांही मोजकीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांत प्रा. बर्वे यांच्या ' विज्ञान-विलास ', विज्ञान-शोभा ' व ' विज्ञान-सौंदर्य ' या पुस्तकांचा प्रामुख्याने गौरव केला पाहिजे. प्रा. बर्वे यांच्या लेखणीचें लालित्य अपूर्व आहे. त्यामुळे त्यांचा विषय जरी गहन व शुद्ध असला, तरी तो त्यांनी मोठा रंजक व उद्बोधक केला आहे. कुमारांप्रमाणेच हीं पुस्तकें प्रौढ जिज्ञासु वाचकांनाहि उपयुक्त व रसयुक्त वाटतील. आपल्या एकंदर समाजाला विज्ञानाची गोडी लागणें अत्यंत आवश्यक आहे. तेव्हा शासनाने या प्रकारच्या ग्रंथांना पारितोषिकें देऊन उत्तेजन दिलें पाहिजे.

या विभागांत अलीकडे आनंद प्रकाशनाने डॉ. आपटे यांच्या ' जीवनाधार पाणी ' आणि ' मानवमित्र अग्निदेव ' या दोन महत्त्वाच्या पुस्तकांची स्पृहणीय भर घातली आहे. यांपैकी पहिल्या पुस्तकांत सृष्टि व शरीर यांच्यांतील पाण्याच्या व्यापाराचें विवेचन आहे; आणि दुसऱ्या पुस्तकांत शेगडींतील आगीपासून तों अणूंतील आगीच्या स्वरूपासंबंधीची माहिती सोप्या शब्दांत समजावून सांगितली आहे. याच प्रकाशनाने कोगेकर यांचें 'चाक व वाहन' हें पुस्तक आणि ढवळे यांचें ' सूर्यकुलाच्या परिसरांत ' हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. यांपैकी पहिल्या पुस्तकांत चाकामुळे उत्पन्न होणाऱ्या ' गती 'चें शास्त्रीय विवेचन आहे आणि तिच्या-मुळे भिन्न भिन्न वाहनें कशीं निर्माण झालीं व पुढे आणखी कशीं होतील हें सांगितलें आहे; आणि दुसऱ्यांत खगोलाची व ज्योतिर्ज्ञानाची अद्भुत परंतु वास्तव माहिती आहे.

विज्ञानविषयक या पुस्तकांप्रमाणेच चित्रशाळेने ' घरांतला हिशेब ', ' नव्या गोष्टी ', ' भले दिवस ' व ' पत्रावळ ' हीं आज नव्याने निर्माण होत असलेल्या राष्ट्राला उपयोगीं पडतील अशीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. तीं कुमार विद्यार्थ्यांप्रमाणे प्रौढांनाहि आवडतील. मात्र त्यांतलें नियोजन, ग्रामोद्धार इत्यादि विषय अधिक रंजक केले पाहिजेत.

अशा रीतीने चालू काळांत बालवाङ्मय प्रचुरतेने निर्माण होत असलें, तरी त्यांत बऱ्याच उणिवा आहेत. अमेरिकेंत ज्याप्रमाणे मुलामुलींचें विविध विषयांचें ज्ञान वाढावें म्हणून 'बुक् ऑफ नॉलेज' किंवा 'सेल्फ एज्युकेटर' यासारखे मुलांचे ज्ञानकोश आहेत, त्याप्रमाणे ते महाराष्ट्रांत निर्माण होणें आवश्यक आहेत. त्याचप्रमाणे पाश्चात्त्य देशांत अगदी लहान मुलांना शिकविण्यासाठी ' पिक्टोरिअल बुक्स् ' असतात, तशीं आपल्याकडे ' चित्रमय पुस्तकें ' निघालीं पाहिजेत. कारण मुलांना ' प्रत्यक्ष ज्ञान ' हवें असतें, तें चित्रांवरून मिळूं शकतें. या पुस्तकांचें प्रकाशन महाग असतें व किंमत जबर असल्यामुळे त्यांचा खप होत नाही हें खरें आहे; परंतु शासनाने या बाबतींत पुढाकार घेऊन जनतेला साहाय्य करणें आव-श्यक आहे. ● ● ●

प्रा. भगवन्त देशमुख, एम्. ए.

# मराठी नाटकें

जानेवारी १९५९ ते डिसेंबर १९५९ या एक वर्षाच्या कालावधींत प्रकाशित झालेल्या नाटकांचा आढावा मला या लेखांत घ्यावयाचा आहे. कमीअधिक ४५ नाटकें या वर्षात प्रसिद्ध झालीं आहेत. एका लेखाच्या मर्यादेंत या सर्व नाटकांचें सविस्तर परीक्षण शक्यहि नाही आणि तसें तें अपेक्षितहि नसावें. मराठी नाट्यसृष्टींत निर्माण झालेल्या कांही नवीन प्रवृत्ति किंवा मराठी नाट्यवाङ्मयाला निराळें वळण लावणाऱ्या, आपला चिरस्थायी ठसा उमटविणाऱ्या अशा नाट्यकृति, यांचीच चर्चा प्रामुख्यानें या ठिकाणीं इष्ट होय. मात्र एका वर्षाच्या कालावधींत अशा प्रवृत्ति नि अशा नाट्यकृति नेहमीच आढळणें शक्य नसतें. कोणत्याहि वाङ्मय-प्रकाराच्या माध्यमांतून श्रेष्ठ प्रतिभेचा आविष्कार, एका विशिष्ट कालांत होतो तो कां ? आणि होत नाही तो कां ? याची निश्चित कारणमीमांसा करणें नेहमीच कठीण असतें. तरीहि, कोणत्याहि कलाकृतीपासून कांही किमान अपेक्षा बाळगणें अयोग्य ठरेलसें वाटत नाही. नुसती, विपुल प्रमाणांत होणारी साहित्यनिर्मिति देखील व्यर्थ ठरण्याचा संभव असतो. या दृष्टीनेच गेल्या वर्षातील नाटकांचा विचार मी करणार आहे.

नाट्यकृतीच्या मूल्यमापनाच्या दृष्टीनें आणखी एका गोष्टीचा मला प्रारंभींच उल्लेख करणें आवश्यक वाटतें. कोणत्याहि वाङ्मयप्रकाराचें तंत्र स्थिर आणि अबाधित नसतें ही गोष्ट खरी. तरी पण विशिष्ट वाङ्मयप्रकाराचें अंगभूत असें कांही सुप्तसामर्थ्य असतें की त्याचा उपयोग आशयाच्या अभिव्यक्तीस एक विशिष्ट दिशा प्राप्त करून देतो. तसेंच त्या विशिष्ट वाङ्मयप्रकाराच्या कांही मर्यादांचा बांधहि त्या आशयाच्या प्रकटीकरणास पडतो. त्यांतून 'नाट्य' हा कलाप्रकार तर निव्वळ वाङ्मयीन कलाप्रकारहि नव्हे. नाटकाचा यथार्थ नि परिपूर्ण आविष्कार नि त्याचें रसग्रहण त्याच्या प्रयोगांतच शक्य होय हेंहि नाकारण्याचें कारण नाही. मग प्रश्न पडतो तो असा की, रसग्रहण नि मूल्यमापन केवळ 'नाट्यप्रयोगांचेंच' करावें आणि नाटकांचें करूं नये काय ?

नाटकाचें मूल्यमापन, त्याची प्रयोगक्षमता संपूर्णतया दृष्टीआड करून करतां येणार नाही ही गोष्ट खरी ! परंतु केवळ एखाद्या नाटकाचे अनेक प्रयोग होणें हें त्या नाटकाच्या श्रेष्ठतेचें एकमेव गमक ठरूं शकतें काय, हा खरा प्रश्न आहे. नाटकाची, नाट्यप्रयोगाची लोकप्रियता आणि त्याची अंगभूत मौलिकता यांत विरोधच असला पाहिजे, हें जसें खरें नव्हे, तसेंच या दोन्ही गोष्टी एकरूपच असतात असेंहि नव्हे. अत्यंत सामान्य प्रतीच्या नाटकालाहि कुशल दिग्दर्शक, अभिनयनिपुण प्रथितयश नट, सुसज्ज रंगभूमि इत्यादि गोष्टींची जोड मिळाल्यास त्याचा प्रयोग केवळ सुसह्यच नव्हे तर आकर्षकहि ठरणें सहज शक्य आहे. तसेंच या गोष्टींच्या अभावीं एखाद्या श्रेष्ठ नाट्यकृतीचाहि विचका होणें संभवनीय आहे; आणि म्हणूनच नटाच्या अभिनयाचें, दिग्दर्शकाच्या कौशल्याचें तसेंच नाट्यकृतीचेंहि स्वतःसिद्ध असें मूल्य मानावें लागतें. किंबहुना, संवादाच्या 'शब्द' रूपांतून व्यक्त होणारा आशय, त्यांतून उलगडणारें, समूर्त होणारें कथानक आणि विकसित होणाऱ्या व्यक्तिरेखा यांत मुळांतच जर

नाट्याचा अभाव असेल तर त्यावर उभारली जाणारी सरस प्रयोगाची इमारत, जाणत्या रसिकाला तरी, आकर्षक कातरकाम केलेल्या कागदी डोल्यासारखी वाटण्याचा संभव अधिक ! एवढ्या विस्ताराने हें सांगण्याचें कारण असें की, गेल्या वर्षीं प्रकाशित झालेल्या नाटकांत शंभरांवर प्रयोग झालेलींहि अशीं कांही नाटकें आढळतात की ज्यामुळे मराठी नाट्य-रसिकांची अभिरुचि निकृष्ट झालेली आहे की नाट्यकृतीकडून बाळगावयाच्या आपल्या अपेक्षांतच कांही चूक आहे याचा संभ्रम निर्माण व्हावा. इतकेंच नव्हे तर, प्रयोगांच्या संख्ये-वरून, सर्वसामान्य प्रेक्षकांप्रमाणे, स्वतः नाटककारांची देखील फसगत होत असल्याचेंहि अनेकदा दिसून येतें नाट्यप्रयोग आणि नाटक यांचें परस्परावलंबित्व मान्य करूनहि, नाटकाचें स्वयंसिद्ध मूल्य विचारांत घेणें आवश्यक वाटतें तें याचमुळे.

गतवर्षींच्या प्रकाशित नाटकांचा विचार करतांना एक गोष्ट प्रामुख्याने जाणवते ती हीं की, अन्य भाषांतील कांही अभिजात कलाकृतींचीं सरस रूपांतरें अथवा त्यांचे अनु-वाद या कालांत निर्माण झाले आहेत; किंबहुना स्वतंत्र नाट्यकृतींपेक्षा या वर्षीं प्रकाशित झालेल्या नाटकांत तरी, या अनुवादित अथवा रूपांतरित नाटकांचें महत्त्व नि मोल प्रमाणाने अधिक आहे. अनुवादित वा रूपांतरित नाटकाच्या श्रेष्ठतेचें खरें श्रेय मूळ नाटककाराच्या प्रतिभेचें असतें यांत शंका नाही; आणि तरीहि उत्कृष्ट अनुवाद अथवा रूपांतर हें एखाद्या प्रतिभाहीनाचें काम नव्हे ! अनुवादासाठी विशिष्ट नाटकाची निवड करण्यापासून तें मूळ कलाकृतीचा, विशेषतः अन्य भाषेंतील नाटकाचा, आपल्या भाषेंत यथार्थ प्रत्ययकारी आवि-ष्कार करण्यासाठी केवळ दोन भाषा अवगत असून भागत नाही. मूळ कलाकृतीच्या गाभ्याला हात घालणारी मर्मग्राही रसिकता आणि मुळांतील आशयाला धक्का न लागूं देतां अन्य भाषेंत तो समूर्त करूं शकणारी समर्थ कल्पकता यांवाचून उत्तम अनुवाद वा रूपांतर शक्य नाही. ‘ जयकेतु ’ ( सदानंद रेगे ), ‘ हॅम्लेट ’ ( कै. नाना जोग ), ‘ शकुंतला ’ (ह. रा. महाजनी) या नाटकांचा या दृष्टीने प्रामुख्याने उल्लेख करावा लागेल. हीं तिन्ही नाटकें, आपल्या मूळ स्वरूपांत, अभिजात श्रेष्ठ कलाकृति म्हणून मान्यता पावलेलीं आहेत. हॅम्लेट नि शकुंतला, यांचे तर यापूर्वींहि मराठींत अनुवाद झालेले आहेत. इतकेंच नव्हे तर, एके काळीं त्यांनी मराठी रंगभूमि गाजविली आहे. हे अनुवाद होऊन बरींच वर्षें झालीं. या कालांत मराठी भाषेचें रूप कांहीसें पालटलें. मराठी रंगभूमीचा विकास झाला. मराठी रसिकांची नाट्य-विषयक अभिरुचीहि कांहीशी बदलली. या नव्या जाणिवा बाळगूनच हे नवे अनुवाद निर्माण झाले आहेत. जोगांनी हॅम्लेट तीन अंकांत बसविलें आहे तर महाजनींनी शाकुंतल पांच अंकांत बसविलें आहे. प्रयोगाच्या वेळेची मर्यादा हें याचें कारण. यासाठी मुळांत कांही संक्षेप होणें अपरिहार्य. मात्र तसें करतांना मूळ कथावस्तूस धक्का लागणार नाही याची दोघांनीहि जागरूकता बाळगली आहे. शेक्स्पिअरच्या मूळ हॅम्लेट नाटकाचें वातावरण मराठीला परकें असल्यामुळे, कै. जोगांचें कार्य अधिक बिकट होतें. हा परकेपणा घालविण्यासाठी त्यांनी मूळ नाटकांतील पात्रांचीं नांवें बदलून अनुवाद केला. नांवें बदललीं की प्रेक्षकांच्या अपेक्षा बदलतात. मराठी नांवांचीं पात्रें परकी वातावरणाशीं संबद्ध अशीं नाटकांत दिसल्यास विसंगति निर्माण होते. मग त्यांचा वेष बदलावा लागतो. मूळ नाटकाला आधारभूत अशा सांस्कृतिक संदर्भांचें रूपांतर करावें लागतें नि त्यांत कित्येकदा मूळ कलाकृतीला ओरखडा बसण्याचीहि भीति असते. या ‘ नाजूक ’ कामाची जोगांना पुरेपूर जाणीव असल्याचें दिसतें नि म्हणूनच त्यांनी आपल्या या नाटकाची नवी रंगावृत्ति, मूळ नांवें टिकवून तयार करण्याचें ठरविलें होतें. दुर्दैवाने त्यांना तें पूर्ण करण्याइतकें आयुष्य लाभलें नाही. मात्र प्रस्तुत अनुवादाच्या आपल्या

अत्यंत मार्मिक प्रस्तावनेंत कुसुमावतीबाईंनी म्हटल्याप्रमाणे जोगांनी केलेल्या या प्रयत्नाची दिशा योग्य होती यांत शंका नाही. हॅम्लेटच्या स्वगतासाठी जोगांनी केलेला मुक्तछंदाचा उपयोग देखील जसा अभिनव तसाच मूळ स्वगतांतील प्रभावी कल्पनांच्या अभिव्यक्तिसाठी अनुरूप असाच होय. या स्वगतांच्या रूपांतरांत, सर्वच ठिकाणीं मूळ शेक्सपिअरच्या रचनेची पातळी गांठता आलेली नाही हा कुसुमावतीबाईंनी केलेला उल्लेखहि यथार्थ वाटतो; आणि तरीहि जोगांना आपल्या प्रयत्नांत लाभलेल्या यशाचें मोल कमी नाही.

महाजनी, जोगांच्याप्रमाणे, आधीपासूनच नाटककार म्हणून प्रसिद्ध नसले तरी त्यांचा व्यासंग नि त्यांची रसिकता अनेक क्षेत्रांत प्रकट झालेली आहे. 'मराठी नाट्यसंगीत' या त्यांच्या ग्रंथाने ते जसें संगीताचे तसेच नाटकाचेहि 'जाणते' रसिक असल्याचा प्रत्यय आलेला आहे. त्यांच्या संस्कृत भाषेच्या नि साहित्याच्या व्यासंगाचा व मराठी भाषेवरील प्रभुत्वाचा, कालिदासाचें शाकुंतल मराठींत, आधुनिक कल्पनांना जुळेल अशा बेताने आणतांना, पूर्ण उपयोग झालेला आहे. कालिदासाच्या मूळ नाटकांतील कथानक, स्वभावरेखन, महत्त्वाच्या कल्पना यांना जशाच्या तसें मराठी-स्वरूपांत प्रकट करण्यांत महाजनींनी जागरूकतेने प्रयत्न केला आहे नि त्यांत ते पुष्कळच यशस्वीहि झाले आहेत. मूळ शाकुंतल आणि महाजनींचा अनुवाद यांचें सविस्तर तुलनात्मक विवेचन इष्ट असलें तरी इथे तें शक्य नाही. कांही गोष्टींचा मात्र मला उल्लेख करावासा वाटतो. मूळ संस्कृत, गद्यपद्यमिश्रित असें नाटक शक्य तों गद्यांत आणण्याची या नव्या अनुवादांतील योजना इष्ट अशीच वाटते. किर्लोस्करांच्या नाटकांतल्यापेक्षा पदांचें प्रमाण या अनुवादांत कितीतरी कमी आहे हेंहि योग्यच होय. विशिष्ट वेळेच्या मर्यादेंत नाटक बसवावयाचें असल्याने मूळ नाटकांतील कांही कल्पनांचा संक्षेप करण्यांत आलेला आहे. त्यामुळे कांही हृद्य कल्पना अनुवादांत न उतरणें स्वाभाविक होय. पण त्याबरोबरच कांही मुळांत नसलेल्या कल्पनाहि यांत टाकल्या आहेत. तसेंच मूळ नाटकांतील 'ध्वनि' मद्दाम रसिकांच्या सोयीसाठी स्पष्ट करून दाखविण्याचीहि भूमिका आवर्जून स्वीकारली आहे. हें स्पष्टीकरण नि ही वाढ, मूळ कलाकृतीच्या यथार्थ अभिव्यक्तीच्या दृष्टीने टाळणें अधिक इष्ट वाटतें. मूळ कल्पनांचा मराठी अनुवाद करतांना कांही ठिकाणीं तरी संपूर्ण अर्थ उतरलेला आहे असें वाटत नाही. उदाहरणार्थ 'किमिवहि मधुराणां मंडनं नाकृतीनाम्' याचें, 'जातीच्या सुंदरांना कांहिहि चालतें' असें रूपांतर करतांना 'मंडनं' ची संपूर्ण अपेक्षित अर्थच्छटा व्यक्त होत नाही. महाजनींनी स्वतः केलेली पद्यरचना कांही ठिकाणीं सहजमधुर उतरली आहे पण कांही ठिकाणीं ती, आगेमागे असलेल्या स्वाभाविक गद्य-रचनेच्या तुलनेने 'हठादाकृष्ट' वाटते. संवादांत बऱ्याच ठिकाणीं, लयबद्ध, सयमक गद्य-रचना करण्यांत आली आहे. म्हणींतल्याप्रमाणे किंवा 'कहाणी'तल्याप्रमाणे ही रचना आकर्षक वाटत असली तरी, कालिदासाच्या रचनेचें रूपांतर करतांना ही पद्धत अवलंबिली गेली नसती तर अधिक बरें झालें असतें असें वाटतें.

याच संदर्भांत, गो. के. भट यांनी अनुवादिलेल्या 'भास' यासंस्कृत नाटककाराच्या पांच नाटिकांच्या संग्रहाचा उल्लेख करणें आवश्यक होय. वस्तुतः १९५६ ते १९५८पर्यंत वेगवेगळ्या वेळीं नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या या नाटिका एकत्रित स्वरूपांत 'ऊरुभंग आणि इतर नाटकें' या नांवाने १९५९ मध्ये प्रकाशित झाल्या आहेत. या संग्रहाला प्रा. भटांनी जोडलेली प्रस्तावनाहि त्यांच्या मार्मिक रसिकतेची साक्ष देणारी आहे. पुराणकथांवर अधिष्ठित अशा आपल्या नाटकाच्या कथावस्तूचें, त्यांतील व्यक्तींच्या स्वभावांचें व त्यांतील नाट्यमय प्रसंगांचें, भास आपल्या वेगळ्या व आगळ्या प्रतिभेने जें अभिनव

दर्शन घडवितो तें प्रा. भटांनी नेमकें हेरलें असून, आपल्या अनुवादांत मराठीच्या प्रकृतीला जुळेल, मानवेल अशा रीतीने व अत्यंत सहजसुंदरतेने त्यांनी तें व्यक्तहि केलें आहे. भासाच्या समग्र नाटकांचा अनुवाद, अत्यंत प्रदीर्घ व माहितीपूर्ण अशा प्रस्तावनेसह १९३१ सालींच 'किरातां'नी प्रसिद्ध केला होता. परंतु तो अनुवाद अधिकतरशब्दनिष्ठ भाषांतराच्या स्वरूपाचा आहे. त्या तुलनेने व एकंदरींत भासाची कलाकृति मराठींत आणण्याच्या दृष्टीने श्री. गो. के. भट यांचा प्रस्तुत संग्रह अत्यंत यशस्वी होय. मुळांत कांहीहि भर न घालतां व मुळांतलें नाट्य न निसटूं देतां केलेला हा अनुवाद आदर्श वाटतो.

'जयकेतु' या सदानंद रेगे यांच्या अनुवादित नाटकाचें सारेंच स्वरूप अगदी निराळें व वैशिष्ट्यपूर्ण आहे. 'सोफोक्लीझ' या प्रसिद्ध ग्रीक नाटककाराच्या 'इडिपस रेक्स' या प्रख्यात शोकांतिकेचें रूपांतर रेग्यांनी 'जयकेतु' या नांवाने सादर केलें आहे. ग्रीक शोकांतिका मराठींत रूपांतरित करण्याचा हा पहिलाच प्रयत्न म्हणून जसा वैशिष्ट्यपूर्ण तसाच तो अत्यंत समरसून केलेला म्हणूनहि महत्त्वाचा वाटतो. अटळ नियतीसमोर हतबल असलेल्या मानवाची, मानवी सामर्थ्याची क्षुद्रता, नियतिनिर्मित दुःखांतील अपरिहार्यता व भयानकता आणि पश्चात्तापांतील कारुण्य यांचें भव्य भीषण दर्शन घडविणारी ही शोकांतिका भारतीय वातावरणाचा साज चढवून रेग्यांनी आपल्या समर्थ कल्पनाशक्तीच्या व महान् आशय पेलूं शकणाऱ्या काव्यमय शब्दरचनेच्या द्वारे प्रभावी रीतीने मराठींत आणली आहे. वैशाली नगरींतील 'जयकेतु' राजाची ही भयाण जीवनकहाणी. देवांनी उद्घोषित केल्याप्रमाणे, एका महान् पापाचा तो धनी झालेला असतो. आपल्या पित्याचा वध करून आपल्याच मातेशीं अजाणतेपणीं तो विवाहबद्ध झालेला असतो. त्याचें हें पाप जेव्हा त्याला कळतें, त्याची या सर्व घटनांबद्दल खात्री पटते, तेव्हा त्याची राणी आत्महत्या करते नि तो स्वतः आपले डोळे फोडून घेतो आणि आपल्या पश्चात् राजा होणाऱ्या आपल्या मेहुण्यावर आपल्या मुलांच्या संरक्षणाचा भार टाकून आपण स्वतः वैशालेच्या वेशीबाहेर कायमचा निघून जातो. असें स्थूल नि भडक कथानक या शोकांतिकेचें आहे. ग्रीक नाट्यपद्धतीप्रमाणे यांत वेगवेगळे अंक नाहीत. कथानकांतील खंड दाखविण्यासाठी व मध्ये गेलेला काळ नि घडलेल्या घटना स्पष्ट करण्यासाठी तसेंच नाटकांतील घटनांवर गंभीर वृत्तीने भाष्य करण्यासाठी 'वृंदा'ची (कोरस) योजना केलेली आहे. एक गोष्ट मात्र मधून मधून सारखी जाणवते ती ही की, भारतीय वातावरणनिर्मितींत लेखकाने अत्यंत काटेकोरपणा बाळगलेला असला तरीहि, देवांच्या आदेशानुसार घडणाऱ्या मानवी जीवनाच्या कल्पनेशीं भारतीय मन एकरूप होत नाही. पात्रांचीं नांवें, वातावरण भारतीय, परंतु त्यांची जीवनविषयक दृष्टि मात्र 'अभारतीय' असें त्यामुळे वाटूं लागतें. हा दोष अनुवादकाचा अर्थातच नाही. परंतु असें मात्र वाटतें की, मूळ पात्रांचीं नांवें नि वातावरण तेंच ठेवून जर अनुवाद केला गेला तर तो अधिक चांगला वठणें संभवनीय आहे. निदान तसें करणें मूळ कलाकृतीच्या दृष्टीने अधिक न्याय्य तरी निश्चितच ठरेल.

या अभिजात कलाकृतींव्यतिरिक्त आणखीहि कांही अनुवाद या वर्षांत झाले आहेत. श्री. बबन प्रभु यांच्या 'झोपी गेलेला जागा झाला' या प्रहसनाचा या दृष्टीने आवर्जून उल्लेख करायला हवा. 'प्रहसन' ही एक निरागस करमणूक असते. स्थूल घटनाप्रधान विनोद आणि विक्षिप्त, तऱ्हेवाईक स्वभावांचे अतिरेकी नमुने व योगायोग यांच्या साहाय्याने, सर्कशींतील विदूषकाच्या लीलांनी बालकांना मिळणाऱ्या आनंदासारखा निर्व्याज आनंद प्राप्त करून देणारें प्रहसन आपल्या या अनुवादासाठी बबन प्रभूंनी निवडलें आहे. अनुवादाची भाषा

परकेपणा न जाणवूं देणारी नि 'प्रहसन'च असल्यामुळे कोणत्याहि प्रसंगाच्या संभवनीयते-विषयीं विशेष चिकित्सेला अवसर नसलेला, खदखदून हसविणाऱ्या घटनांना मग उणीव कसली ? आणि या अपेक्षापूर्तीचाच केवळ हेतु यांत ठेवलेला असल्यामुळे, प्रहसन म्हणून तें चांगलें वाटतें. शेक्स्पिअरच्या कॉमेडी ऑफ एरर्सचें, श्री. शामराव ओकांनी केलेलें 'गड्या आपुला गांव बरा' हें मराठी रूपांतर आणि 'युवराज'हें बाळ गंगाधर सामंत यांनी केलेलें रूपांतर हीं आणखी दोन विनोदी नाटकें याच जातींचीं म्हणावीं लागतील. अनुवादित नाटकांच्या मालिकेंतच बव्हंशीं ज्याची गणना करतां येईल अशा 'बच्चू लछमन' या सौ. कुमुदिनी रांगणेकर यांच्या वैशिष्ट्यपूर्ण नाटकाचा थोडा अधिक विचार करणें इष्ट ठरेल.

कांहीं वास्तव घटना व एक इंग्रजी नाटिका यांवरून प्रस्तुत नाटकाच्या लेखनास प्रेरणा मिळाल्याचें लेखिकेनें म्हटलें आहे. म्हणूनच 'बव्हंशीं अनुवादित' असा शब्दप्रयोग यासाठी मीं केला आहे. मायेचा जिव्हाळा नि अनुकूल वातावरण नसलेल्या एका मुलाच्या बाह्यतः विक्षिप्त वाटणाऱ्या कृति आणि त्याला वळण लावूं इच्छिणाऱ्या, मानसशास्त्रीय दृष्टि असलेल्या विश्वनाथ पंडित या एका निपुत्रिक गृहस्थाच्या मनांतील संघर्ष यांवर हें नाटक उभारण्यांत आलेलें आहे. बच्चू हें त्या मुलाचें नांव नि लछमन हा त्याचा स्वार्थी, सुखलोलुप क्रूर असा बाप. बच्चूला विश्वनाथचा लळा लागतो, परंतु विश्वनाथाच्या पत्नीच्या मनांत, बच्चूविषयीं त्याच्या उनाडक्यांमुळे अढी पडते. यांतूनच पतिपत्नींत संघर्षाला अवसर मिळतो. या तिघां-च्येंहि मनोदर्शन, सूचक घटना व संवाद यांच्या द्वारें उत्तमरीतीनें घडविलें आहे. बच्चूवर त्याच्या बापाचा खून केल्याचा आळ येतो तेव्हांपासून नाटकाच्या शेवटपर्यंतच्या घटना मात्र घाईनें व मुद्दाम घडविल्यासारख्या वाटतात. प्रारंभीच्या भागांत नाटकानें घेतलेली मनाची पकड नंतर ढिली पडते, कारण एखादें रहस्य उलगडण्याचा प्रयत्न करावा, तसें स्वरूप शेवटीं या नाटकांत येतें.

अनुवादित वा रूपांतरित नाटकांनंतर आता स्वतंत्र नाटकांचा विचार केला पाहिजे. या बाबतींत पहिली गोष्ट जाणवते ती ही की, गेल्या वर्षांत नाटकें बरींच प्रकाशित झालीं आहेत. कदाचित् पुस्तकरूपानें प्रकाशित न झालेलीं आणखीहि कांहीं असतील. या नाटकां-च्या लेखकांत, ज्यांनी आजवर अनेक नाटकें लिहिलीं आहेत असेहि बरेचजण आहेत. परंतु कांहीं अपवाद वगळल्यास बहुतेकजण नवखे आहेत. निदान अनेकांच्या नाट्यलेखनाच्या पातळीनें अद्याप प्राथमिक अवस्था ओलांडलेली नाहीं. साहाजिकच नवखेपणाचे परिणाम या नाटकांत आढळतात. या सर्व नाट्यसंचारांत ज्यांना खरोखर कांहीं नाट्यात्मक अनुभव उत्कट-तेनें जाणवला नि आपला हा अनुभव ज्यांनी इमानानें व कलात्मकतेनें व्यक्त करण्याचा प्रयत्न केला अशा मोजक्या नाटकांत 'स्वप्नांचें हें धन' (शं. गो. साठे), 'पढे बापूराव' (ल. ना. भावे) व 'अक्षांश रेखांश' (गो. गं. पारखी) या नाटकांचा गणना करावी लागेल. विशेषतः 'स्वप्नांचें हें धन' ही शं. गो. साठे यांची नाट्यकृति एक यशस्वी रेखीव नि मनाचा ठाव घेणारी कलाकृति म्हणावी लागेल. नाटकाचा आशयच मुळांत वैशिष्ट्यपूर्ण आहे. लहानपणापासून आपल्यामध्ये असलेल्या निराळेपणाची, कलावंताच्या प्रेरणांची, मुक्त जीवन जगण्याच्या तीव्र तळमळीची जाणीव असलेले अण्णा, आपल्या वडिलांच्या मृत्युसमयीं निदान वीस वर्षें तरी चारचौघांसारखा संसार करण्याचें, नोकरी करण्याचें वचन देतात. तीं वीस वर्षें संपतात, त्या दिवशीं ते नोकरी कायमची सोडण्याच्या हेतूनें रजा घेतात. नाटकाला येथून आरंभ होतो. केवळ घरदार, मुलंबाळं, प्रतिष्ठा, पैसा, यांत रमणाऱ्या अण्णांच्या पत्नी नि यांतून बाहेर पडून आपल्या बालपणींचीं हरवलेलीं स्वप्नें शोधूं बघणारे अण्णा यांच्यांत

कधीनव्हत संघर्ष निर्माण होतो. लहानपणीं घरांतून काढून देण्यांत आलेला अण्णांचा भाऊ बापू, याच वेळीं घरीं परत येतो. भिल्लांच्या वस्तींत एकाकी जीवन जगणारा बापू अण्णांच्या संसारांत रमत जातो. घरच्यासारखा वागून कौटुंबिक जीवनाचें सुख भोगूं पाहतो नि अण्णा मात्र त्यांतून निसटूं बघतात. सहज नि प्रसंगीं नर्मविनोदानें युक्त असे संवाद, प्रत्येक पात्राचा अवश्य तेवढाच केलेला उपयोग, नाट्यपूर्ण प्रसंग नि अत्यंत सूचकतेने ते समूर्त करण्यांतील संयम नि सामर्थ्य व आशयावर असलेली घट्ट पकड यांमुळे हें नाटक प्रभावी झालें आहे. अण्णांना मोठी नोकरी सांगून येते, विलायतेला जाण्याची संधि घर चालून येते, तेव्हा तशा अर्थाचें आलेलें ऑफिसचें पत्र हातीं असतांना ते माणिकचा नाच बघण्यांत रंगून जातात नि तें पत्र त्यांच्या हातून गळून पडतें. या सूचक प्रसंगांतून अण्णांच्या मनांतील संघर्ष लेखकाने उत्कट-तेने व्यक्त केलेला आहे. सर्वत्र, अगदी बारीकसारीक घटनेंतून, वातावरणनिर्मिति नि मनो-दर्शन साधलें आहे. शेवटीं घरांतून निघून जावें या हेतूने अण्णा मुंबईला जातात नि पुन्हा परत येतात ते नवी नोकरी स्वीकारण्याचें ठरवून, कायमचे संसारांत राहाण्याकरिता. एकाकी जीवन जगणारा बापू कौटुंबिक वातावरणांत रमूं पाहतो, पण वाढलेलें झाड उपटून अन्यत्र लावणें कठीण तशी त्याची स्थिति होते. तो अडगळ बनूं लागतो नि याची जाणीव त्या आक्का करून देतात तेव्हा तो परत जायचें ठरवितो. अण्णा परत येतात, हें त्यांचें परिवर्तन जरा अनपेक्षित, घाईने घडलेलें वाटतें; पण त्यांनीं दिलेल्या स्पष्टीकरणानंतर तें स्वाभावि-कहि वाटतें. भरारी मारण्याची आकांक्षा उराशीं कवटाळून वर्षानुवर्षे पिंजऱ्यांत राहिलेल्या पक्ष्यास, पिंजरा उघडला तरी उडतां मात्र येऊं नये, तशी त्यांची स्थिति होते नि नाटकाचा शेवट रूढ अर्थाने सुखान्त होत असला तरी अण्णांच्या मनाच्या वेदनांचाच ठसा मनावर खोलवर उठतो. यामुळेच साठ्यांचें हें नाटक मोलाचें वाटतें.

'पठ्ठे बापूराव' हें ल. ना. भावे यांचें नाटक, लावणीकार पठ्ठे बापूरावांच्या चरित्रां-तील कांही खऱ्या, कांही ऐकीव अशा गोष्टींच्या आधारें पण प्रामुख्याने कल्पनानिर्मित पात्र-प्रसंगांच्या साहाय्याने रचलेलें नाटक. तमाशासाठीं कुलकर्णपणावर व आपल्या परंपरागत आचारधर्मावर लाथ मारणारा, सौंदर्याने मोहित होणारा, कलेच्या अभिव्यक्तींत देहभान हरप-णारा नि शेवटीं मनोभंग झाल्यामुळे तमाशाला कायमचा रामराम ठोकून पुण्याला एका खोप-टांत जीवन कंठणारा, रंगेल नि रगेल बापूराव समूर्त करण्यांत लेखकाला निश्चितच यश लाभलें आहे. कांही कृत्रिम वाटणाऱ्या गोष्टी मात्र यांत खटकल्यावाचून राहत नाहीत. नाम्या नि हरिभाऊ हे पुन्हा पुन्हा भेटतात नि ठराविक पद्धतीने बापूरावाच्याविरुद्ध कट रचीत अस-तात, मामलेदार रावसाहेब प्रथम बापूरावास चावडीवर तमाशा करण्यास विरोध करतात पण त्याची कीर्ति पसरल्यावर त्याच्या एका कवनाने संतुष्ट होऊन अगदी आधुनिक टीकाकारा-प्रमाणे त्याच्या कलेचें महत्त्व वर्णन करून सांगतात इत्यादि गोष्टी रसापकर्षक वाटतात. त्याच-प्रमाणे नामा, चंद्रा, पवळी यांच्या तोंडीं ज्या कल्पना लेखकाने घातल्या आहेत त्या त्यांच्या संभाव्य मनोभूमिकेशीं व बौद्धिक पातळीशीं विसंगत अशाहि कांही वेळेस वाटतात. लावण्यांची योजनाहि कांही ठिकाणीं अगदी चपखल झालीसें वाटत नाही. पण त्याबरोबरच कांही अत्यंत उत्कट प्रसंगहि यांत आहेत. पवळाच्या आग्रहाने बापूराव चार लोकांसमक्ष तिच्याबरोबर जेवतो तो प्रसंग किंवा बापूराव राजिनामा देतो तेव्हाचा प्रसंग जसे त्याच्या बाणेदारपणाचें दर्शन घडवितात त्याप्रमाणेच लष्करांतील शिपायाची कथात्मक लावणी त्याच्या शृंगारिक वृत्तीचें दर्शन घडवितें.पवळा निघून गेल्यानंतर त्याचें मन कशांतच रमत नाही. तो पुण्यास एकाकी जीवन जगूं लागतो तेव्हा त्याच्यावर एकनिष्ठ निःस्वार्थ प्रेम करणारी चंद्रा त्याच्या

सुखासाठी धडपडते, दिवाळीच्या दिवशीं त्याला उपास घडूं नये म्हणून त्याच्या कवितांच्या बाडाची रद्दी म्हणून विक्री करायला जाते तेव्हा किंवा नाटकाच्या शेवटीं बापूरावला पवळा आल्याचा भास होतो तेव्हा जाणवणारें कारुण्य मन अस्वस्थ करतें.

गो. गं. पारखी यांचें 'अक्षांशरेखांश' हें नाटक आधुनिक जीवनांतील स्त्रीपुरुष-संबंधविषयक कल्पनांच्या रूढ स्वरूपांत परिवर्तनाची आवश्यकता तीव्रतेने पटविण्याच्या हेतूंनू निर्माण झालें आहे. तसं पाहिलं तर नाटक लोकप्रिय करण्यासाठी ज्या गोष्टी मुद्दाम योजिण्याचा मोह नवख्या नाटककाराला अनावर होतो त्या येथेहि आहेतच. सुवास आणि कुंदा यांचा प्रेमविवाह होतो नि त्यानंतर कुन्दाच्या पूर्वप्रणयाची सुवासला जाणीव करून दिली जाते. त्याच्या पावित्र्यविषयक कल्पनांच्या चौकटींत हें बसत नाही. त्याच्या पुरुषी मनाला हें खपत नाही नि यांतून पतिपत्नींत संघर्ष निर्माण होतो. शेवटीं कुन्दाच्या पूर्वीच्या प्रियकराकडून त्याची उत्कट त्यागपूर्ण अशी निराळीच प्रेमकथा ऐकविली जाते नि मग सुवासचें हृदयपरिवर्तन होतें. खरं म्हणजे केवळ व्याख्यानबाजीनेच हें परिवर्तन साधलें जातें. शिवाय तिच्या पूर्वजीवनांतील प्रियकराचें प्रेम दुसऱ्या एका मुलीवर होतें नि कुन्दा शरीरानें पवित्र आहे याचें समाधानहि त्याला मिळतें. त्यांतच कुन्दा ही, त्याच्या मामाच्या पत्नीची दुसऱ्या लग्नापासून झालेली मुलगी असल्याचें कळल्याने त्याच्या व तिच्या वागणुकीविषयीच्या त्याच्या अनुचित संशयाचेंहि निराकरण होतें.साहजिकच पावित्र्यविषयक कल्पना बदलण्याचा तसा फारसा प्रयत्नच सुवासला करावा लागत नाही नि म्हणून ज्या प्रश्नाने संघर्ष निर्माण झाला तो प्रश्नच मुळांत पोकळ असल्याचें जाणवूं लागतें. त्यांतच केवळ विनोदासाठी मुद्दाम टाकलेले कांहीं अनावश्यक प्रसंग, जन्नरहस्याच्या गुंतागुंतीने निर्माण होणारी उत्कंठा, कित्येक वर्षांनंतर खूप पैसा मिळवून घरीं आलेले 'मामा' नि जीवनाच्या भाष्यकाराची त्यांनी घेतलेली भूमिका याहि ठरीव सांच्याच्या वाटतात. सुवासची लहानगी बहीण (वय ८ ते १४,) जें बोलते तें तिचें वय ८ गृहीत धरल्यास तिला न पेलणारें वाटतें. आणि तरीहि कांही उत्कट व भावनार्त प्रसंगामुळे तसेंच उदात्तीकृत अशा स्वार्थत्यागाच्या परिणामकारक आविष्कारांमुळे हें नाटक प्रभावी वाटतें.

याव्यतिरिक्त इतर बरींच नाटकें अशीं आहेत की ज्यांत एक तर नाट्यात्मक अनुभूतीचाच अभाव आहे किंवा आपली अनुभूति व्यक्त करतांना कलात्मक जाणिवेव्यतिरिक्त लेखकाने अन्य गोष्टींनाच प्राधान्य दिलें आहे. त्यांतल्या त्यांत 'तारूं लागलें किनारीं' हें शशिकला आळंदकर यांचें केवळ स्त्री पात्रें असलेलें नाटक विशेष लक्षांत राहण्याजोगें आहे. पुरुषपात्रविरहित नाटक म्हणजे आधीच त्याला मर्यादा पडणार! पण ती मर्यादा सांभाळूनहि प्रस्तुत नाटक पुष्कळच चांगलें वठलें आहे. विनाकारण अफवा उडविण्यांत आल्यामुळे एका तरुण मुलीच्या जीवनांत निर्माण झालेलें दुःख आणि तिच्या तडफदार बहिणीने त्याच अफवा उडविण्याच्या तंत्राचा उपयोग करून घडवून आणलेला सुखपूर्ण शेवट, हा या तीन अंकी नाटकाचा विषय. पहिले दोन अंक निवेदनात्मक,स्पष्टीकरणात्मक नि म्हणून जरासे कंटाळवाणेहि वाटतात. परंतु तिसऱ्या अंकांतील अनेक नाट्यपूर्ण घटनांनी मात्र मनाची पकड घेतली जाते; आणि त्यांतहि विशेषतः परिणामकारक वाटतें तें मीनाचें अवखळ, तडफदार व्यक्तिमत्त्व नि तिचें औपरोधिक धारदार बोलणें.

सौ. सुमति धनवटे यांचें 'धुळीचे कण' हें नाटक, सौंदर्याच्या अभिमानाने थिल्लरपणें प्रेमाचे खेळ करून अनेकांचें जीवन उद्ध्वस्त करणारी नयना आणि याच आपल्या धाकट्या बहिणीसाठी आपल्या स्वतःचें प्रेमही बाजूला सारणारी माया यांच्या विरोधावर मूलतः आधारलेलें आहे. परंतु नाट्यवस्तु कृत्रिम प्रसंगांनी सजविण्याचा प्रयत्न केल्याने ती कुठेच

अंतरंगाला स्पर्श करीत नाही. त्यांतच विमलाबाईंच्या अनाठायीं व अनुचित रीतीने व्यक्त होणाऱ्या भविष्याच्या छंदाने विनोदाऐवजी विसंगतीच अधिक निर्माण केली आहे. मेजर काकांचें पात्र, ' तुझें आहे तुजपाशीं ' मधील काकाजीच्या प्रभावांतून, अनुकरणांतून निर्माण झाल्यासारखे वाटतें. त्यांतच, निरपेक्ष स्वार्थाचें महत्त्व पटविणारे हे मेजरसाहेब नंतर मायाला स्वार्थत्यागाची निरर्थकता पटवूं लागतात तेव्हा नाटकाच्या सोयीसाठी ते स्वतः-शींहि प्रतारणा करतात. त्यांची सौंदर्यासक्ति नि ती व्यक्त करण्याची रीतहि कृत्रिम वाटते. श्री. मो. द. ब्रह्मे यांचें ' आनंदाश्रम ' हें नाटक एका अद्भुतरम्य कथेवर आधारलेलें आहे. जुगाराच्या नादीं लागलेल्या आपल्या मुलाला नि सुनेला अप्पांनी घरांतून घालवून दिलेलें असतें नि आपल्या नातवाला लहानाचें मोठें केलेलें असतें. अप्पांचा हा नातू करतासवरता होतो नि एक दिवस त्याचे आईवडील त्याला आपलें नातें न कळूं देतां त्याच्याकडे नोकर राहतात. नाटकाच्या शेवटीं अप्पा नि त्यांचा मुलगा व सून हीं पूर्वजीवनांतील सर्व घटना ' फ्लॅशबॅक ' पद्धतीने निवेदन करतात व शेवट गोड होतो. १९४७ सालीं हें नाटक मुळांत लिहिलें गेलें असें लेखक म्हणतात. त्या कालाचा विचार करतां यांतील 'फ्लॅश बॅक' पद्धतीच्या निवेदनाचें व त्यांतच इतर पात्रांनीहि बोलून शंकानिरसन करून घेण्याच्या पद्धतीचें निराळेंपण जाणवतें.

' जया अंगीं मोठेपण ' या श्री. ला. कृ. आयरे लिखित नाटकांत एका जुन्याच प्रश्नाची पण उत्कट अभिव्यक्ति संभवनीय होती, परंतु ती तशी साधलेली नाही. वेडसर भाऊ नि धाकट्या बहिणींची जबाबदारी स्वतः नोकरी करून सांभाळणारी ' शोभा', तिच्यांत नि धाकट्या बहिणींत निर्माण झालेला संघर्ष, आपलें प्रेम, संसार नि ही भावंडांची जबाब-दारी यांमुळे निर्माण झालेला संभ्रम--यांनी कथानकांत जीव ओतला जायला हरकत नव्हती; पण वेगळ्याच गोष्टीवर लक्ष केंद्रित झाल्याने तसें घडलेलें नाही. शोभाला फसवूं बघणारे हरि-काका नि नरेंद्र, वेडसर असूनहि अत्यंत शहाणपण दाखविणारा नि शहाण्याप्रमाणे बोलणारा दाजीबा, शोभाच्या इच्छेविरुद्ध तिला गाण्याच्या मैफलीसाठी येण्याचा आग्रह करणारा नि तिच्याबरोबर तिच्या बहिणीच्या गांवीं जाऊन त्या बहिणीलाच जाळ्यांत अडकविणारा मोहन या व्यक्ति नि त्यांमुळे निर्माण होणाऱ्या घटनांची अपरिहार्य नसलेली गर्दी यांमुळे नाटक संपूर्णतया यशस्वी झाल्याचें दिसत नाही.

विशिष्ट सामाजिक प्रश्नाच्या प्रचारासाठी म्हणून कांही नाटकें या काळांत लिहिलीं गेलीं आहेत नि प्रचारात्मक नाटकें ज्या कारणामुळे निष्प्रभ ठरण्याचा धोका असतो, त्याच कारणाने तीं डागळलेलीं आहेत. आबासाहेब आचरेकर यांच्या ' भांगेंतली तुळस ' या नाट-कांत वेश्यांच्या मुलींना प्रतिष्ठित समाजांत गृहिणी म्हणून स्थान मिळावें, या उदात्त हेतूने प्रेरित होऊन नाटककाराने अनेक प्रसंगांची व अनेक व्याख्यानांची योजना केली आहे. जोडीला वेश्येच्या मुलींचें गुप्त जन्मरहस्य नि साधना या हिंदी चित्रपटाने सुपरिचित करविलेली, अल्प काळा-साठी वेश्येस भाड्याने वधू म्हणून आणण्याची व त्यांतून निर्माण होणाऱ्या ठराविक पेचप्रसं-गांची योजनाहि करण्यांत आली आहे. विशेष असें कीं, या तरुण नायकापेक्षा त्याचा वृद्ध पिता अधिक प्रगतिपर विचारांचा आहे. यांतली वेश्याकन्या देखील आपल्या सुधारणेविषयी लांब-लचक व्याख्यानें देऊन नायकाचें मतपरिवर्तन घडवून आणतें.

" बुद्धं सरणं गच्छामि" हें आचरेकरांचेंच आणखी एक प्रचारात्मक नाटक बुद्धचरितावर किंवा बुद्ध धर्माच्या प्रचारासंबंधीहि प्रभावी नि कलापूर्ण नाटक असल्यास तें कुणालाहि, धर्म-प्रचार न मानवला, तरीहि नाटक म्हणून आवडायला हरकत नाही.प्रस्तुत नाटकांत अभाव असेल

तर नाट्याचा नि म्हणून त्यांतील प्रचारहि परिणामकारक ठरत नाही. बुद्धभिक्षूंचा वध करणारे दुष्ट नि प्रत्यक्ष वधासाठीं उगारलेलें शस्त्र फेकून त्यानी क्षणांत घेतलेलें लोटांगण, असल्या चमत्कारांनी केवळ हें नाटक भरलेलें आहे. नाटकांतील घटना ज्या कालांत घडतात तो काल कोणता, त्यांतील अस्पृश्य समाजांतील असलेला पण पैशाच्या बळावर सारें गांव आपल्यामागे वळविणारा ' भास ' हा पुरुष कितपत संभवनीय होय याचा विचार न करणेंच बरें.

कारंडे गुरुजी यांनी लिहिलेलें ' संगीत जय बौद्ध ' हें नाटकहि याच हेतूने निर्माण झालेलें असलें तरी पुष्कळच बरें आहे. संवादाचे चर्चात्मक स्वरूप, केवळ विनोदासाठीं टाकलेलें निर्बुद्ध पात्र, पात्रांच्या मनोवृत्तींशीं व वातावरणाशीं सुसंगत न वाटणाऱ्या भाषेचा नि कल्पनांचा वापर इत्यादि दोष असूनहि कांही उत्कट प्रसंगांमुळे नाटक बरें वाटतें.

ग्रामीण वातावरण चितारण्याच्या दृष्टीने, म. भा. भोसले यांचें 'लाडकी लेक', ताम्हनकरांचें ' एकसष्टी ' आणि मो. स साठे यांचें ' पुरुषोत्तम ' हीं नाटकें उल्लेखनीय ठरतील. परंतु आपल्या मनांतील विशिष्ट कल्पना किंवा ग्रामीण जीवनांत घडणाऱ्या विशिष्ट वास्तव घटना यांना कलात्मक स्वरूप मात्र या नाटकांतून यशस्वीरीत्या प्राप्त झालेलें दिसत नाहीं. ताम्हनकरांच्या नाटकांत एका कर्तव्यनिष्ठ शिक्षकाच्या मार्गातील अडचणींचे व विरोधाला न भितां आपली निष्ठा न सोडणाऱ्या शिक्षकाचें व्यक्तिमत्त्व आत्मीयतेने साकार झालेलें आढळतें; परंतु नाटकाच्या शेवटीं घडणाऱ्या सर्व अनपेक्षित नि अनुकूल घटनांनीं सारें कथानकच ढासळल्यासारखें वाटतें. मो. स. साठे यांच्या ' पुरुषोत्तम ' या नाटकांतहि अशाच एका ध्येयनिष्ठ शिक्षकाचें व त्यावर गांवांतील चेंदरकार गुंडांनी आणलेल्या आपत्तींचें चित्रण आहे. यांतील घटना एक तर अगदी भडक आहेत आणि नाटकाचा शेवट ज्या रीतीने झाला आहे तो बघितला म्हणजे त्यापूर्वीं घडणाऱ्या घटनांची अपरिहार्यता पटत नाही. खून करूनहि न्यायालयांत निर्दोष सुटणारा, दिवसाढवळ्या आपल्याविरुद्ध साक्ष देणाऱ्या निकमचा काटा काढणारा, भाऊ मास्तरांना खोलींत डांबून त्यांना विष प्यावयास सांगणारा, सारें लोकमत आपल्याला अनुकूल करून घेणारा असा भयंकर माणूस संभाजी पोलीसचें आगमन नि शाळेंतील मुलांनी लावलेली आग या वार्ता ऐकून स्वतः पिस्तूल झाडून आत्महत्या करतो हें विलक्षण वाटतें, आणि हें जर शक्य होतें तर यापूर्वीं पोलीसकडे कोणीच कां गेलें नाहीं ? या प्रश्नाचें उत्तर मिळत नाही नि त्यामुळे सारे भीषण प्रसंग कृतक वाटूं लागतात.

एका अगदी वेगळ्या वातावरणांतील म्हणून " २६ जानेवारी" या वैशिष्ट्यपूर्ण वाटणाऱ्या र. दा. दिवेकरांच्या नाटकाचाहि असाच प्रकार आहे. पोलिसखात्यांतील अनुभव, १९४२ सालच्या चळवळींत घडलेल्या अनेक घटनांचें वास्तवज्ञान यांचा सांठा पदरीं असूनहि या नाटकाला एका साधारण रहस्यकथेपलीकडे सरकतां येत नाही. अनावश्यक नि विसंगत प्रसंग नि पात्रेंहि यांत आहेतच. भाषेचा तर प्रश्नच नाही ! कुणाच्याच भाषेवर व्यक्तिमत्त्वाचा असा ठसा नाही.

' मराठ्यांचें सिंहासन ' हें मुंगशीकरांचें, मराठेशाहींतील एका उत्कट प्रसंगावर आधारलेलें नाटकहि ऐतिहासिक वातावरणनिर्मितींत आलेल्या अपयशाने व कोणत्या घटनांना

प्राधान्य द्यावें तें न उमगल्याने अगडबंब शब्दांनी युक्त अशा भाषणांच्या मालिकेसारखे मात्र वाटूं लागतें. ऐतिहासिक नाटक म्हणजे आवेशपूर्ण भाषणें, स्त्रियांचे पराक्रम, मराठी राज्यास विरोध करणाऱ्यांच्या कारस्थानांची शक्य तेथे निरर्थकता दाखविणें, एवढीच कल्पना या नाटकावरून येते. यांतील बालराजे प्रौढाप्रमाणे बोलतात, रायगडचा किल्लेदार, सूर्याजी पिसाळ मूर्खपणाने शत्रुपक्षांत पाठवावयाचें आपलें पत्र आपल्या लगीनवेड्या नि दुर्बल मेहुण्याजवळ देतो, हिंदी स्टंट चित्रपटाप्रमाणे, पुरुषी वेष घेणाऱ्या स्त्रिया त्याला फसवून धरतात नि त्याचें नाक कापतात, त्या शत्रुपक्षाच्या हातीं सांपडल्या असतांहि व मोरे नि पिसाळांनी त्यांना शत्रूच्या गोटांत असतांना बघितलें असूनहि त्या जिवंत राहून परत रायगडीं येतात, नि पिसाळाचें दुष्कृत्य उघड करतात, नाक तुटलेला त्याचा मेहुणाहि शूर बनून त्याच्या विरोधी-गटांत जातो इत्यादि घटनांनी मूळ ऐतिहासिक वातावरणास विचित्र स्वरूप येतें. त्यांतच भाषेची योजनाहि मोठी विलक्षण आहे. राजाराम, ताराबाई इत्यादि पात्रें यांत हमखास सानुप्रास बोलतात.

उदा. :— राजाराम म्हणतो :—'स्वातंत्र्यप्रेमाला प्रकर्षानं प्रवृत्त करणारं परमधाम— लढत्या लढवय्याच्या उमद्या उमेदीचं उसळतं उधान—'

ताराबाई :— पण म्हटलं, लढत्या लढवय्याच्या उमद्या उमेदीचीही उसळती उमेदवारी उगीचच कशाला ?

" सीध्या तौरतीने मगज चालवा " अशी रचनाहि येथे आढळते; किंबहुना यांतील मुसलमान पात्रें अधिक शुद्ध मराठी बोलतात नि अशुद्ध उर्दू बोलतात. मराठी राज्य-सिंहासनाचा मोह न बाळगतां संभाजी मुलास सिंहासनाचा अधिकारी मानून त्याच्या वतीने कारभार करणाऱ्या राजारामाचें उदात्त चरित यांत रंगविण्याचा प्रयत्न केला गेला आहे, परंतु वरील दोषांनी तो उठावदार वाटत नाही.

अशा रीतीने गेल्या वर्षांत प्रसिद्ध झालेल्या नाटकांपैकी शक्य तेवढ्या नाटकांचा ओझरता परामर्श मीं येथवर घेतला. या सर्व नाटकांचा साकल्याने विचार करतांना कांही गोष्टी जाणवतात त्या अशा : भाषांतरित, रूपांतरित नाटकांच्या प्रमाणांत, स्वतंत्र नि चांगल्या नाट्यकृतींचें प्रमाण कमी वाटतें. परवाङ्मयांतील उत्तमोत्तम ललित कृतींच्या अनुवादाचें महत्त्व मान्य करूनहि श्रेष्ठ स्वतंत्र नाट्यकृतींची उणीव त्यांनी भरून निघत नाही असें वाटतें. एका वर्षातील प्रमाणावरून निष्कर्ष काढणें शक्य नसलें तरी एकूण मराठींतील स्वतंत्र व उत्तम नाट्यकृतींच्या निर्मितीचें प्रमाण कमी होत आहेसें वाटतें. दुसरीकडे नाटकांची संख्या वाढत असून, यांतील पुष्कळशी निपजही झाली नसती तर बरें. या ना त्या कारणाने, कलात्मक मूल्यांच्या कसोटीस न उतरणारीं नाटकें देखील गाजलीं व गाजविलीं जातात असेंहि आढळून येतें. कांही विनोदी प्रसंग, सुटसुटीत, खुसखुशीत संवाद नि एखादें तथाकथित उदात्त तत्त्व अथवा एखादा सामाजिक प्रश्न यांचा आधार घेतला की नाटक तयार होतें अशा सवंगपणें ही नाट्यनिर्मिति वाढत आहेसें वाटतें. नाटकें निपजावींत, भरपूर निपजावींत, परंतु नाट्यनिर्मितीविषयक अथवा नाट्याच्या अभिरुचीविषयक कांही भ्रामक नि विपरीत कल्पना प्रसृत करण्याइतक्या त्या विचित्र नसाव्यात नि नाट्याभिरुचीला अनिष्ट वळण लावणाऱ्या न ठराव्यात एवढीच अपेक्षा. ● ● ●

श्री. नु. शं. कुळकर्णी

# लघुकथा

१९५९ सालांतील मराठी लघुकथेचा आढावा घेत असतांना ह्या उपक्रमामागील कांही मर्यादांचा उल्लेख करणें आवश्यक आहे. ह्या आढाव्यामागे, १९५९ ह्या वर्षभरांत जी मराठी लघुकथा लिहिली गेली, त्या सर्व कथांच्या सापेक्ष मूल्यमापनाची कल्पना अनुस्यूत असेल तर माझ्या वांट्याला आलेल्या पृष्ठसंख्येत असा आढावा घेणं सर्वथैव अशक्य आहे हें स्पष्ट केलें पाहिजे. प्रतिदिन, प्रतिमासीं विपुल प्रमाणांत मराठी कथा लिहिली जात आहे. दिवाळी अंकांची सर्व भिस्त लघुकथा ह्या वाङ्मयप्रकारावर आहे, असें म्हटल्यास तें अतिशयोक्तिपूर्ण ठरूं नये. एवढ्या विपुल प्रमाणांत निर्माण होणाऱ्या एका वर्षातील कथांचें साधें वाचन करण्यासाठीहि पुढील किमान दोन वर्षे तरी खर्ची घालावीं लागतील !

माझ्यापुरती विषयाची व्याप्ति ठरविण्याच्या दृष्टीने मी १९५९ मध्ये प्रकाशित झालेल्या कांही महत्त्वाच्या कथासंग्रहांचा आढावा घेऊन, मराठी कथेने प्रगतीच्या दृष्टीने जी वाटचाल केली आहे तिचा निर्देश करण्याचा प्रयत्न करणार आहें. ह्याच संदर्भात आणखी एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे व ती म्हणजे एका वर्षांत निर्माण होणाऱ्या कोणत्याहि वाङ्मयप्रकारावरून टीकात्मक निर्णय घेतां येत नाहीत. एक वर्ष ही मुदत ह्या दृष्टीने अगदीच निरुपयोगी आहे. एखाद्या दशकानंतर वाङ्मयाच्या प्रकृतींत थोडाफार फेरफार होतो— नव्या जाणिवा, नवे प्रयत्न होतांना आढळून येतात. एखाद्या वेळीं एवढ्याच नव्हे तर ह्याहीपेक्षा प्रदीर्घ मुदतींत वाङ्मयप्रकारांत कुठल्याच प्रकारचा बदल होत नाही. वाङ्मयप्रकारांत जेव्हा कांही नवे प्रकार येतात, वाङ्मयप्रकार जेव्हा नवें वळण घेतो तेव्हा ह्यासाठी अनेक वर्षे जावीं लागतात. दरम्यानच्या काळांत जें वाङ्मय निर्माण होत असतें तें एक तर साचेबंद स्वरूपाचें असतें किंवा फार तर तपशिलाच्या बाबतींत त्यांत कांही सुधारणा झालेल्या आढळून येतात. प्रयोगक्षम असे नवे लेखक फारच थोडे असतात. ह्या दरम्यानच्या काळांत पुष्कळसें चांगलें वाङ्मय निर्माण होतें. परंतु श्रेष्ठ वाङ्मय फारच थोड्या प्रमाणांत निर्माण होतें अथवा कित्येकदा होतहि नाही.

१९५९ हें वर्ष मराठी लघुकथेच्या दृष्टीने बरेंच महत्त्वपूर्ण वर्ष आहे यांत शंका नाही. १९४० नंतर जन्माला आलेली मराठी नवकथा आता यौवनांत बहरली आहे. तिने आपल्या विभ्रमांनी सर्वांना मोहून टाकलें आहे. तिच्यांतील सारे गुण (आणि दोषहि) आता सर्वांनाच स्वीकारार्ह झालेले आहेत. तिच्या ह्या यौवनावस्थेंत तिचा तोल जाऊं नये, तिचें पाऊल वाकडें पडूं नये ह्यासाठी नितान्त जपण्याची आवश्यकता निर्माण झालेली आहे, हें विसरतां येत नाही. मालवण येथील साहित्य संमेलनाच्या कथाशाखेच्या अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणांतून प्रा. वा. ल. कुलकर्णी ह्यांनी मराठी नवकथेच्या मर्यादांच्या संदर्भात जे प्रश्न उपस्थित केले होते त्यांचें प्रयोजन अजूनहि अबाधितच आहे. यौवनावस्था ही जशी कर्तृत्वाची निदर्शक आहे तशीच अधिक जबाबदाऱ्या पार पाडाव्या लागणारीहि हीच अवस्था आहे. स्वप्नरंजनांत धुंद होणें हा ह्या अवस्थेचा सहजधर्म असला तरी कर्तृत्वाची आणि जबाबदारीची जाणीव करून देण्याचें काम सतत होत राहिलें पाहिजे. मराठी कथेने ईडिपसप्रमाणे स्वतःच्याच

अनुक्रमणिका

प्रतिबिंबावर लुब्ध होऊन आत्मरत होण्यामध्येहि धोका आहे. ह्यासाठींहि जपण्याची आवश्यकता ह्याच वर्षांत निर्माण झाली आहे. ह्या वर्षांत निर्माण झालेल्या मराठी कथेने लेखकांना आणि वाचकांनाहि एकप्रकारें आव्हान दिलें आहे. ह्या आव्हानांचाच मी प्रामुख्याने विचार करणार आहें. ह्या दृष्टीनेच १९५९ हें वर्ष मराठी कथेच्या संदर्भांत अत्यंत महत्त्वाचें वर्ष आहे असें मीं म्हटलें आहे.

मराठी कथेच्या ह्या आव्हानांचा विचार करीत असतांना मी पहिल्याप्रथम प्रा. ना. सी. फडके ह्यांच्या ' बहार ' ह्या कथासंग्रहाचा विचार करणार आहें. 'बहार ' ह्या कथासंग्रहांतील कथा १९५९ किंवा त्याच्या आसपास निर्माण झालेल्या नाहींत. स्वस्त किंमतींत पुस्तकें पुरविण्याच्या प्रकाशकांच्या धोरणामुळे हा संग्रह निघालेला आहे. लोकप्रिय लेखकांचीं पुस्तकें स्वस्त किमतींत दिल्यानंतर तरी त्यांचा खप वाढतो किंवा नाही ह्या प्रयोगापोटीं प्रस्तुत संग्रह बाहेर पडला आहे. हा प्रयोग कितपत यशस्वी झाला आहे ह्याची कांही कल्पना नाही; परंतु ही घटना मात्र मोठी सूचक आहे. लोकप्रियता हें कांही कलामूल्य नव्हे परंतु ज्या वाचकांच्यासाठी वाङ्मय प्रसिद्धिलें जातें ते वाचक अजूनहि जुन्या कथेकडे आकर्षित होतात, नव्या कथेंतील नव्या जाणिवा अजूनहि वाचकवर्गाला आकलन होत नाहीत असाच ह्या घटनेचा अर्थ निघतो. प्रा. ना. सी. फडक्यांनी कथालेखनासंबंधींची जी खूणगाठ आपल्या मनाशीं बांधून ठेवली त्यांत वर्षानुवर्षानंतरहि त्यांनी फेरफार केला नाही. उलट आपल्याच भूमिकेचें संधि सापडेल तिथे ते समर्थन करतांना आढळून येतात. " कमींतकमी पात्रें आणि कमींतकमी प्रसंग ह्यांच्या साहाय्याने सांगितलेली गोष्ट म्हणजे लघुकथा " ह्या सुटसुटीत व्याख्येमध्ये कथेच्या ठिकाणीं असणाऱ्या जीवनदर्शनाच्या सुप्त सामर्थ्याला—एवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष जीवनदर्शनाला देखील त्यांनी अजिबात फाटा दिला आहे. " जिथें ते तिथें मी " ही त्यांची कथा वाचातांना त्यांच्या तंत्राचा वडेजाव जाणवतो. त्यांच्या कथांतील वाचनीयता अजूनहि कमी झालेली नाही-पण साऱ्या गोष्टी वाचूनहि त्यांचा मनावर कुठलाच सखोल संस्कार उमटत नाही. मनोरंजन हें सर्वच ललित वाङ्मयाचें ते व्यवच्छेदक लक्षण व प्रयोजन मानतात. मनाला क्षणभर चुटपुट लावणाऱ्या ( Melodramatic ) अतिरंजित घटना रंगवण्याकडेच त्यांचा स्वाभाविक कल आहे. अंतर्मुख करणें हें कलाकृतींचें प्रयोजन नसेलहि कदाचित्; पण श्रेष्ठ दर्जाच्या कलाकृतींच्या परिशीलनाने माणूस स्वतःला नकळत अंतर्मुख होतो. ना. सी. फडक्यांच्या केवळ कथाच नव्हे तर त्यांच्या कादंबऱ्या आणि इतर वाङ्मयहि वाचकांना बेचैन करीत नाही. जुन्या कलामूल्यांची आणि जुन्या मार्गांची ही कोंडी फोडून मराठी नवी कथा अवतरली. पण लोकप्रियता हें वाङ्मयप्रकाराच्या यशस्वितेचें गमक मानायचें झालें तर अजूनहि जुनी कथा स्पर्धा करण्याइतपत आपलें अस्तित्व जाणवून देतें हें विसरतां येत नाही. फडक्यांचा 'बहार' हा कथासंग्रह या दृष्टीने आव्हानात्मक आहे. हरिभाऊंच्या काळांतील 'गोष्ट' जरी फडके लिहीत नसले तरी त्यांच्या लघुकथांत ' गोष्टी'ला ( Story Element ) पुष्कळ प्रमाणांत प्राधान्य असते. एका वृद्ध जोडप्याच्या सुखी जीवनाचा आलेख ते " जिथें ते तिथें मी " ह्या कथेंत काढतात. वृद्ध पतीचें निधन होतें आणि त्या म्हातारीला आपला पति जिवंतच आहे-तो अजूनहि आजूबाजूला वावरत आहे असें एकसारखें वाटत राहतें. ह्या भासांनी तिचें जीवन व्यापलें जातें. ह्या सर्वच घटनांतील कारुण्य आपणांस क्षणभर जाणवतें. फडक्यांची लोकप्रियता ह्या व असल्याप्रकारच्या अनुभवांपेक्षा शृंगारिक अनुभवांत आहे. त्यांच्या कथेचा दुसरा विशेष म्हणजे तिची सरळसोट निवेदन पद्धति. तंत्राला बाधा न येऊं देतां ते मोठ्या कौशल्याने गोष्ट लिहितात-मग या निवेदनाच्या ओघांत तंत्राने आशयावर मात केली तरी त्यांना तें चालतें. फडक्यांची ही विशिष्ट शैली

अनुक्रमणिका

वाचकवर्ग आकृष्ट करते. मला वाटतें, अनुभवाच्या जातीचा व तो घेण्याच्या पद्धतींतील तपशिलाचा बदल सोडल्यास, दिवाकर कृष्णांनी कथेचा त्यांच्या काळांत जो नवा पायंडा पाडला त्या सर्वच कथांचा विशेष हाच आहे. जुन्या कथेचीं हींच सामर्थ्यस्थानें आहेत. फडक्यांच्या संग्रहाच्या निमित्ताने जुन्या कथेचें आव्हानात्मक स्वरूप न्याहाळतांना पुन्हा एकदा तिचीं हीं वैशिष्ट्यें समोर येतात.

मराठी नवकथा अवतरली आणि जुनी साचेबंद कथा कोलमडून पडली असें जरी आपण म्हणत असलों तरी तें तितकेसें बरोबर नाही. जुनी कथा आजहि लिहिली जात आहे व तिचा असा एक विशिष्ट वाचकवर्गहि आहे. फडक्यांच्यासारख्या लेखकांचें वाङ्मय हें जणू आपल्या नव्या भावंडांना वाकुल्या दाखविण्यासाठीच निर्माण झालेलें असतें. जुन्या-नव्याचा झगडा हा भावाभावांतील क्षणिक झगड्यासारखा असावा पण तो नेहमीच सवती-सवतींतील भांडणासारखा असतो. जुन्याने नव्याला मार्गदर्शन करून त्याच्या विकासाला हातभार लावावा—नव्यांतील चांगलेपण आत्मसात् करून स्वतःला किंचित् मुरड घालून घ्यावी. पण वाङ्मयामध्ये ही आदर्शावस्था क्वचितच आढळून येते. आपल्या जुन्याच निष्ठांना चिकटून बसणें, नव्या जाणिवांचा केवळ अनुल्लेखच नव्हे तर साधे सापडेल तिथे त्यांचा अवमान करणें, आपल्या जुन्याच सिद्धांताच्या घासून गेलेल्या तबकड्या लावणें, हाच प्रकार सर्वत्र दृष्टोत्पत्तीस येतो.

आणि म्हणूनच,ह्या पार्श्वभूमीवर गंगाधर गाडगिळांच्या 'स्वप्नभूमि' ह्या कथा संग्रहाची कामगिरी विशेषत्वाने जाणवते. नवकथेच्या सर्व सामर्थ्यांची प्रचीति घडविणारा हा संग्रह ह्याच वर्षी प्रकाशित होण्यामध्ये एक वेगळेंच औचित्य आहे.

गंगाधर गाडगीळ, अरविंद गोखले, पु. भा. भावे आणि व्यंकटेश माडगूळकर ह्या सामर्थ्यवान् लेखकांच्या पिढीने मराठी नवकथेला स्थैर्य प्राप्त करून दिलें. दिवाकर कृष्णांच्या कथेचा थांबलेला ओघ, फडक्यांनी कथेला आणलेला साचेबंदपणा—ह्या कोंडींतून मराठी कथेला ह्या लेखकांनी केवळ मुक्तच केलें असें नाही तर तिच्या ठिकाणीं असणाऱ्या अनेक सामर्थ्यांचा प्रत्यय घडवून नेत्रोद्दीपक अशी कामगिरी केली आहे. हे सर्वच लेखक निरनिराळ्या प्रकृतिधर्मांचे आहेत आणि ते तसे आहेत म्हणूनच त्यांची कथाहि अगदी भिन्न भिन्न प्रकृतीची आहे. गेल्या दहा-पंधरा वर्षांत ज्या प्रकारची लघुकथा ह्या लेखकांनी लिहिली त्या कथेला, खरें म्हणजे तोड नाही. ह्या सर्वच लेखकांनी मराठी कथेचें एक वेगळें परिमाण दर्शविलें असलें तरी ह्या सर्वांत गाडगिळांची कामगिरी थोड्याशा अधिक प्रमाणांत आहे. गाडगिळांचें वैशिष्ट्य त्यांच्या अनुभव घेण्याच्या पद्धतींत तर आहेच पण त्यांचे जीवनानुभव विविध थरांचे, विविध पातळींचे सखोल असे असतात. त्यांच्या जीवनदर्शनामध्ये केवळ विस्तार किंवा विपुल पात्रसंख्या रंगविणें एवढाच हेतु नसतो—जीवनाच्या विविध पातळ्यांचें सूक्ष्मातिसूक्ष्म दर्शन गाडगीळ घडवतात. माणसांच्या भावना ह्या सनातन आहेत—त्यांचीं सुखदुःखें सनातन आहेत—माणसाला हजारो वर्षांची परंपरा आहे—पण हें सारें ज्ञात असूनहि माणूस हा अनाकलनीय आहे—माणसाच्या ठिकाणीं असलेल्या ह्या सुप्तासुप्त जाणिवांचे, ह्या संदर्भांत त्याच्या भाव-भावनांचें—आणि एकंदर जीवनाचेंच गाडगीळ जेव्हा चित्रण करतात तेव्हा त्यांच्या कलाकृतींतून केवढा तरी मोठा आशय गवसल्यासारखा वाटतो. जीवनाची एक वेगळीच भेदक जाणीव गाडगीळ करून देतात. कुठल्याहि तत्त्वज्ञानाचा मुखवटा न घालतां गाडगिळांचें हें जीवनचित्रण चाललेलें आहे. जीवनाचा अर्थ समजून घेण्याचा हाच खराखुरा मार्ग आहे. तत्त्वज्ञानाचे चष्मे वापरून जीवनाचा अर्थ शोधतांना डोळ्यावरील चष्म्यांच्या काचांचा जो रंग

असतो त्याच रंगाचें जीवन दिसायला लागतें–आणि हें खरेंखुरें जीवन नसतेंच. श्रेष्ठ दर्जाच्या कलाकृति जीवनाचा अर्थ शोधतांना दिसतात आणि त्यांतून तत्त्वज्ञान जन्म घेतें.

' स्वप्नभूमि ' हा गाडगिळांचा एक अत्यंत उत्कृष्ट कथासंग्रह आहे. यांतील सर्वच कथांतून गाडगिळांचीं म्हणून जीं वैशिष्ट्यें आहेत, तीं वैशिष्ट्यें प्रकट झालेलीं आहेत. ' स्वप्न-भूमि ' ह्या कथेंत काव्यात्म वातावरणांत रमलेल्या–वास्तव, दरिद्री जीवनापासून पळ काढ-णाऱ्या सुहासिनीच्या भीषण शोकात्मिकेचें दर्शन घडतें. नाटकांत भूमिका वठवतांना कृत्रिम जीवनालाच खरें जीवन समजून कवटाळूं बघणारी ही स्वप्नाळू तरुणी, शारीर भावनेने मोहित झालेल्या एका ऐश्वर्यसंपन्न तरुणाला आपलें सर्वस्व समर्पित करते–क्षणिक भावनेला प्रेम समजण्याची ती एक मोठीच चूक करते–आणि ह्या सर्व प्रकारामागची फसवणूक जेव्हा तिच्या ध्यानांत येते तेव्हा ही भाबडी तरुणी समुद्राकडे धाव घेते. सुहासिनीची शोकात्मिका ही तिच्या आदर्शांची शोकात्मिका आहे. जीवन आणि जीवनादर्श यांच्या रस्सीखेचींत तिचा बिचारीचा बळी पडतो आणि भोवतालच्या जीवनांत त्याचा कुठे मागमूसहि उरत नाही–जीवन म्हणजे तरी काय आणि त्यांतील आदर्श म्हणजे तरी काय हे असले प्रश्न मनांत निर्माण होतात. 'विषकन्या' ही देखील एक अशीच कथा. या कथेंतील गुलाब ही स्वप्नाळू वृत्तीचीच आहे-आणि यांतूनच तिचें दुःख निर्माण झालेलें आहे. ह्या वृत्तीमुळे तिचें वैवाहिक जीवन पार उद्‌ध्वस्त झालेलें आहे, पण ती ह्या वृत्तीला सोडायला तयार नाही. माणसामधील सहज प्रवृत्ति (Instincts) किती सखोल असूं शकतात–किती प्रभावी असतात, त्याचें हें उदाहरण आहे. जीवन हें परिवर्तनीय आहे हा आमचा धोशा मात्र सतत चालू आहे.

एका लेखकाचे स्वभावविशेष रंगवणारी ' आत्मा असलेला मनुष्य ' ही देखील त्यांची एक वैशिष्ट्यपूर्ण कथा. कलानिर्मितीच्या मागील प्रेरणांचा मागोवा घेणारी ' झपूर्झा गडे झपूर्झा ' ही गाडगिळांची आणखी एक असामान्य कथा. प्रकट आणि अप्रकट मनाचे सारे पदर उलगडून दाखविणारी ही कथा आहे. वृत्तींचें ( moods ) चित्रण करणारी ' वृष्टि ' ही कथाहि ह्याच संग्रहांत आहे. अनुभवांच्या निरनिराळ्या पातळ्यांचें दर्शन घड-विणाऱ्या विविध कथा ह्या संग्रहांत समाविष्ट करण्यांत आल्या आहेत. विविध प्रकारचें व्यक्ति-चित्रण आहे. गाडगिळांच्या शैलींतील काव्यात्मता, अनुभवाच्या निरनिराळ्या झरोक्यांतून दर्शन घडविण्याचें गाडगिळांचें सामर्थ्य–सूचकतेला कुठेहि बाधा न येऊं देतां केलेलें हें सर्व चित्रण, या सर्वांचा प्रत्यय ' स्वप्नभूमि ' हा कथासंग्रह वाचतांना येतो. फडक्यांच्या संग्रहाच्या रूपाने जसे मराठी जुन्या कथेचें आव्हानात्मक स्वरूप प्रकट झालेले आहे– त्याचप्रमाणें गाडगिळांच्या ह्या संग्रहाच्या रूपाने मराठी नव–कथेचें आव्हानहि प्रकट झालेलें आहे. मराठी नव–कथेची सर्व वैशिष्ट्यें आणि सामर्थ्यस्थानें ' स्वप्नभूमि ' मध्ये एकवटलेलीं आहेत. कालच्या कथेंतील कलाहीनता आणि कृत्रिमपणा आणि आजच्या कथेंतील कलात्मकता आणि अकृत्रिम-पणा, जीवनाच्या सखोल आशयापासून पळवाट काढण्याची कालच्या कथेची वृत्ति आणि आशयाच्या पाऱ्याला मुठींत घट्ट कवटाळू बघण्याची आजच्या कथेची वृत्ति–या दोहोंतील द्वंद्व ह्या दोन संग्रहांच्या रूपाने आपणांस एकसमयावच्छेदेकरून बघायला मिळतें. गाडगिळांच्या कथासंग्रहांत नवकथेच्या म्हणून ज्या मर्यादांचा निर्देश टीकाकार करतात त्या मर्यादा अस्ति-त्वांत आहेत ही गोष्ट खरी आहे. परंतु गाडगिळांची प्रयोगक्षम वृत्ति, अनुभवांत खोलवर शिरण्याचे त्यांचे प्रयत्न–जीवनाचा अर्थ गवसल्याच्या जाणिवेनें तृप्तीचा ढेकर कुठेच उमटलेला नाही ही वस्तुस्थिति, ह्या सर्व गोष्टी विचारांत घेतल्यानंतर मराठी नवकथेच्या मर्यादांचा पुनर्विचार होणें आवश्यक आहे, हें जाणवल्यावाचून राहत नाही. मर्यादा ह्या व्यक्तिसापेक्ष असूं

शकतील; गाडगिळांच्या कथांच्या ठिकाणीं प्रकट होणारे नवनवोन्मेष बघितले म्हणजे—गाडगीळ अजूनहि मर्यादांच्या अतीत आहेत, असें वाटतें. गाडगिळांचा आजचा फॉर्म लक्षांत घेतां—मराठी नवकथेचीं आणखी कांहीं शिखरें ते दाखवतील असा विश्वास दृढावतो. मराठी नवकथेच्या आव्हानाचें स्वरूप, माझ्या अल्पमतीप्रमाणें, हें कांहींसें असें आहे.

मराठी कथेच्या आव्हानाचें तिसरें टोक म्हणून मी ज्या कथासंग्रहाचा निर्देश करणार आहें तो कथासंग्रह म्हणजे जी. ए. कुलकर्णी ह्यांचा ' निळासावळा ' हा संग्रह. नवकथेच्या ऐन भरांत जी लेखक मंडळी पुढे आली आहेत त्यांतील जी.ए.कुलकर्णी हे एक प्रमुख लेखक आहेत. १९५५ मध्ये त्यांची ' गुंतवळ ' ही कथा प्रसिद्ध झाली आणि तिने आपली एक निराळीच चमक दाखविली. जी. ए. कुलकर्ण्यांच्या कथेने नवकथेंतील सारीं वैशिष्टयें तर आत्मसात् केलींच, परंतु तिचें म्हणून स्वतःचें असें एक वेगळेंपणहि तेव्हाच जाणवून दिलें. मुदवाड खेड्याजवळ बांधल्या जाणाऱ्या धरणावरील विविध माणसांच्या भावविश्वाची गुंतवळ-त्यांच्या आशा-आकांक्षा, त्यांच्या व्यथा, ह्यांचें दर्शन ' गुंतवळ ' मध्ये त्यांनी घडविलें. त्यांच्या अनुभवांचा Span एवढा विस्तृत होता की कथेच्या लांबी रुंदीची चौकट निखळून पडली. एकाच एका अनुभवाच्या स्वरूपाची न्याहाळणी करण्यापेक्षा त्यांची कथा एकाच वेळीं अनेक अनुभवांची पाहणी करूं लागली-त्यांचे परस्पर संबंध ध्यानांत घेऊं लागली. जी. ए. कुलकर्ण्यांच्या एका मागोमाग एक कथा प्रसिद्ध होऊं लागल्या आणि प्रत्येक कथा त्यांच्याविषयींच्या अपेक्षा वाढवूं लागली. त्यांच्या कथेने गाडगिळांची काव्यात्मता आणि सूचकता आत्मसात् केली—एकाच वेळीं अनेक अनुभव व्यक्त करण्याची ( Thomas Mann ची आठवण करून देणारी ) पद्धति प्रस्थापित केली. विविध थरांतील वेगवेगळ्या व्यक्तींचें चित्रण केलें आणि पात्रांचें जीवनदर्शन घडवीत असतांनाच ज्या प्रदेशांतील तीं पात्रें आहेत तो प्रदेशहि त्यांनी सजीव केला. प्रादेशिक चित्रणाचा त्यामागे कुठेच हव्यास नव्हता. कर्नाटक आणि महाराष्ट्र यांच्या सरमिसळीमुळे- सीमाप्रदेशांतील जें एक निराळें जीवन असतें, जो एक निराळा प्रदेश दृष्टोत्पत्तीस पडतो तो प्रदेश जी. ए. कुलकर्णी ह्यांच्या कथांतून चित्रित झालेला आहे. माणूस ज्या वातावरणांत राहतो, त्या वातावरणाचे सखोल संस्कार त्याच्या जीवनांत भिनलेले असतात-त्याचा स्वभाव घडविण्यास तें वातावरणहि पुष्कळ अंशाने कारणीभूत होत असतें. कथेची लांबी वाढविण्यासाठी जी. ए. कुलकर्णी वातावरणाचें चित्रण करीत नाहीत, तर जीवन-दर्शनाचा एक अपरिहार्य भाग म्हणूनच तें वातावरण त्यांच्या कथांतून अवतरतें. ह्याच संग्रहांतील ' चंद्रावळ ' ही कथा या दृष्टीने अभ्यसनीय आहे. जी. ए. कुलकर्ण्यांच्या बहुतेक कथांतून ( Tragic element ) आढळून येतो. जीवनांतील विविध दुःखांचें स्वरूप त्यांच्या कथांतून चित्रित झालेलें आहे. जीवनांतील दुःखांच्या विविध जाणिवा हा जणू त्यांच्या कथांचा स्थायीभाव आहे. ह्या दुःखांमुळे जीवनाला आलेली अवकळा आणि भकासपणा आणि ह्या दुःखांचें स्वरूप समजून घेण्याची धडपड, ही जी. ए. कुलकर्णी ह्यांच्या प्रत्येक कथेंतून जाणवते. ' मौज ' मधून गेल्या दिवाळी अंकांतील कथांचा आढावा घेतांना श्री. वर्टेर ह्यांनी जी. ए. कुलकर्णी ह्यांच्या ' सत्यकथेंत ' प्रसिद्ध झालेल्या ' शेलॉट ' ह्या कथेच्या लांबीसंबंधी नापसंतीचा सूर काढला आहे. लांबीमुळे कथा जर कंटाळवाणी बनत असली तर तो खरोखरच दोष आहे. परंतु अनुभवांचे विविध धागे उलगडीत जातांना कथेची लांबी जर अपरिहार्यपणें वाढत गेली तर तो दोष कसा मानतां येईल? उत्तम गवई ज्याप्रमाणे एकच एक ओळ, घोळून घोळून म्हणतो आणि आपल्या स्वरालापांनी श्रोत्यांना मंत्रमुग्ध करितो तेव्हा गवयाची लांबण हा दोष ठरत नाही, तद्वतच अनुभवाचें स्वरूप उलगडीत जातांना विवेचन जर लांबत गेलें तर तेंहि सदोष

मानण्यांत येऊं नये. जी. ए. कुलकर्ण्यांच्या ह्या अगोदरच्या 'सत्यकथा' दिवाळी अंकांतून प्रसिद्ध झालेल्या 'बांगड्या' ह्या असामान्य कथेची आठवण झाल्यावाचून राहत नाही.

ह्याच संग्रहांतील 'सांगाडा,' 'मुखवटा' ह्याहि अशाच आगळ्या कथा आहेत. मानवी दुःख हाच ह्याहि कथांचा केंद्रबिंदु आहे. जीवनांतील दुःखाचें स्वरूप अद्यापि त्यांना उलगडलेलें नाही आणि म्हणून जीवनाचा अर्थहि उलगडलेला नाही; पण ह्या शोधनांतच जी. ए. कुलकर्णी असामान्य दर्जाच्या tragic (शोकात्म) कथा देऊं शकतात हें त्यांनी सिद्ध केलेलें आहे. त्यांच्या ह्या अनुभव–चित्रणाला लघुकथेची चौकट अपुरी पडते असें वाटतें. विविध वाङ्मयप्रकार त्यांनी अजून हाताळलेले नाहीत– पण ते स्वतःच्या अशा form च्या शोधांत आहेत, हें जाणवतें. 'निळासावळा' ही त्यांच्या आत्मशोधाचीच एक खूण आहे. मराठी नवकथेच्या सामर्थ्याच्या पाऊलवाटा त्यांच्या ह्या संग्रहांत आहेत. त्यांचा हा कथासंग्रह म्हणूनच मला आव्हानात्मक वाटतो. कालखंडाच्या सातत्याच्या दृष्टीने वस्तुतः ह्या कथासंग्रहाचा विचार सर्वांत शेवटीं व्हायला पाहिजे, परंतु माझें हें सारेंच विवेचन मराठी कथेचा ऐतिहासिक विकास शोधण्याच्या वृत्तीचें नाही. १९५९ सालांतील मराठी कथेच्या तिहेरी आव्हानात्मक स्वरूपाचें विवेचन येथवर केलें आहे. हे तीन कथासंग्रह प्रातिनिधिक स्वरूपाचे आहेत.

× × ×

ह्यानंतरचा ह्या वर्षांतील लक्षांत घेण्याजोगा कथासंग्रह म्हणजे अरविंद गोखल्यांचा 'अनामिका' हा होय. 'अनामिका' मधील गोखल्यांची कथा ही त्यांच्या नेहमीच्या कथेहून निराळी आहे. वेश्याजीवनाचा प्रयत्नपूर्वक प्रत्यय घडविण्याचा ह्या कथांचा हेतु आहे. मराठी कथा ही बव्हंशी मध्यमवर्गापुरती मर्यादित झालेली आहे. ह्या कोंडींतून निराळ्या वाटा शोधण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न गोखले ह्यांनी केला आहे. हा एक आगळा कथासंग्रह आहे यांत वाद नाही. परंतु ह्या संग्रहांतील वेश्याजीवनाचे अनुभव हे (शिळे) stale आहेत– कलात्मकतेपेक्षा इथे कारागिरी अधिक प्रमाणांत जाणवते. या कथांतला 'मी' म्हणजे स्वतः गोखलेच आहेत व वेश्याजीवन समजून घेण्याची त्यांची सतत धडपड आहे. ही कलाहीन जाणीव त्यांच्या प्रत्येक कथेंतून जाणवते. गोखल्यांचे हे अनुभव कलात्मक पातळीवर गेलेलेच नाहीत. सहानुभूतीपूर्ण असा एक मध्यमवर्गीय लेखक वेश्याजीवनाचा जेव्हा विचार करतो तेव्हा त्या जीवनांतील सारें कारुण्य त्याच्या मनाचा कब्जा घेतें. गोखल्यांच्या ह्या अनामिका सहानुभूतीला आवाहन करतात हें खरें असलें तरी गोखल्यांचे हे अनुभव तसा कुठलाच संस्कार करीत नाहीत. वेश्येचें मनोगत आपणांस समजत नाही; ती जीवनाकडे कोणत्या दृष्टीने बघते हेंहि समजत नाही. प्रत्येक ठिकाणीं आपणांस आढळून येते तें गोखल्यांचें (म्हणणें) Interpretation. ह्या सर्व वेश्या सहानुभूतीला पात्र ठराव्या असा जाणीवपूर्वक प्रयत्न गोखले करतात. गोखल्यांना ह्या जीवनासंबंधी कुतूहल आहे, जिज्ञासा आहे, पण दहा–पांच वेश्यागृहांना वारंवार भेटी दिल्यामुळे त्या जीवनाचें संपूर्ण आकलन होईल ही समजूतच मुळी भ्रामक आहे. Cuprine ची Yama वाचतांना किंवा सआदत हसन मंटो ह्या उर्दू लेखकाच्या कथा वाचतांना ही कलाहीन जाणीव आपणांस होत नाही. वेश्याजीवनाचें अत्यंत भेदक दर्शन हे लेखक सामर्थ्यशालीपणे घडवितात. एका वेगळ्या जीवनाचें दर्शन घडविण्याचा गोखल्यांचा प्रयत्न हा अत्यंत प्रामाणिक आहे यांत शंका नाही, परंतु हा प्रयत्न फसलेला आहे ही गोष्ट खरी आहे. गोखल्यांच्या ह्या अनामिका वेगळ्या धाटणीच्या आहेत, वेगळ्या स्वभावांच्या आहेत. कित्येकजणी त्यांच्या इच्छेविरुद्ध ह्या कुंटणखान्यांत ढकलल्या गेल्या आहेत. ह्या जीवनां-

तून बाहेर पडण्याचाहि कित्येकजणींचा प्रयत्न आहे. हळव्या अशा मनःस्थितींतून भकास जीवनाचें दर्शन घडविण्याचा प्रयत्न गोखले करतात--स्वतःच्या मनावरील संस्कारांचीं झापडें तशींच कायम ठेवून ते ह्या जीवनाचा अर्थ लावण्याचा प्रयत्न करतात. त्यांच्या कथा वाचल्यानंतर प्रत्यय येतो तो त्यांच्या हळव्या वृत्तीचा. वेश्यांच्याविषयी जी सहानुभूति निर्माण होते, तीहि नेहमीचीच. जीवनानुभवाचा विस्तार वाढतो--खोली मात्र फारशी वाढत नाही.

या संग्रहांतील प्रत्येक कथा तशी परिणामकारक आहे. पण ही परिणामकारकता मूळचीच त्या कथेच्या ठिकाणीं आहे. कलाकृति ही एक स्वतंत्र निर्मिति असते असें आपण मानतों. गोखल्यांच्या ह्या कथांतील निर्मितीचा भागच कारागिरीनें व्यापलेला आहे. गोखल्यांच्या अनुभवांना बोचक अशा स्वरूपाच्या मर्यादा पडलेल्या दिसतात. ह्या मर्यादाहि अपरिहार्य आहेत.वेश्याजीवनाचें स्वरूप खरोखरच मोठें गुंतागुंतीचें आहे.वेश्याजीवनाचा प्रश्न हा समाजशास्त्राच्या कक्षेंतील प्रश्न आहे, आणि ह्या प्रश्नाच्या अनेक बाजू आहेत. वेश्यांना Social necessity (सामाजिक आवश्यकता) समजणारा जसा एक विचार-प्रवाह आहे,तसाच वेश्या हा मानवजातीवरील कलंक आहे असाहि एक विचार-प्रवाह आहे. कांही अनुभवांची जातच अशी असते की, त्यांचा संदर्भविरहित विचार करतांच येत नाही. गोखल्यांनी ह्या सर्व अनुभवांची पाहणी कोणत्याच विशिष्ट विचारसरणींतून केलेली नाही-नेहमीचाच middle class humanitarian ( मध्यम वर्गाचा भूतदयावादी ) दृष्टिकोन त्यांनी स्वीकारला आहे. ह्या वेश्यांच्या जागीं दुसरीं पात्रें असतीं तरी कथांच्या परिणामांत फारसा फरक पडला नसता असें वाटतें. प्रत्येक कथेंतील अनुभव घेण्याची तीच ती पद्धत आहे. प्रत्येक कथेंत लेखक मुद्दामहून वेश्यांच्याकडे जातो--त्यांच्याशीं ओळख वाढविण्याचा प्रयत्न करतो, त्यांना समजून घेण्याचा प्रयत्न करतो. प्रत्येक वेश्येला एक इतिहास असतो आणि तो इतिहास समजून घेतांना कथेलाहि आकार येत जातो.

सिंदबादच्या सफरींमध्ये जसा एक क्रम आहे--सफरीवर जायचें, कांही अनुभव घ्यायचे, पैसे मिळवायचे आणि घरीं परत यायचे. कांही दिवसानंतर पुन्हा दुसऱ्या सफरीवर निघायचें. असल्याच ठराविक पायऱ्यांनी गोखले ह्या अनुभवाकडे धाव घेतांना दिसतात. ही पद्धतच मोठी यांत्रिक वाटते. श्रेष्ठ दर्जाच्या कलाकृति निर्माण होण्यास हा प्रकार कसा घातुक आहे, हें परत एकदा सिद्ध होतें.

मराठी नवकथेने एका वेगळ्या प्रांतांत झेप घेण्याचा प्रयत्न केला पण तो प्रयत्न सपशेल फसला आहे, असेंच हा संग्रह वाचून वाटतें. हें भेसूर जीवन रंगवण्याची गोखल्यांची मुळी प्रकृतीच नाही.

अर्थात् ह्या सर्व कथाकडे एक प्रयोग म्हणून बघायचें ठरविलें तर मात्र वरील मुद्दे विचारांत घ्यायचें कारण नाही. मात्र गोखल्यांनी हे मोह टाळावे असें वाटतें.

ह्या वर्षीचा आणखी एक चमत्कार म्हणजे पु. भा. भाव्यांची गैरहजेरी. संग्रह तर राहोच पण दिवाळी अंकांतूनहि त्यांच्या कथा आढळल्या नाहीत. भावे अतिशय सामान्य कथा लिहितात आणि कांही एवढ्या असामान्य कथा लिहितात की, मति थक्क होऊन जावी. मराठी नवकथेवर भाव्यांचा रोष आहे--नवकथाकारांच्या मालिकेंत त्यांना गोवणें कितपत रुचेल ह्याची शंकाच आहे--पण भाव्यांची एक स्वतंत्र कथा आहे. तिची शैली निराळी आहे. तिच्या अनुभवांचें स्वरूप निराळें आहे. त्यांच्या कथा वाचकांना थक्क करून सोडतात, बेचैन करतात. भाव्यांची कथा वाचायची ती एवढ्याचसाठी. त्यांचें ह्या वर्षीचें मौन यामुळेच जाणवतें.

मराठीमध्ये वेगळ्या स्वरूपाची–खरीखुरी ग्रामीण कथा लिहिणाऱ्या व्यंकटेश माडगूळकरांचा कांही व्यक्तिरेखांचा व स्थलचित्रांचा ' घरदार ' हा संग्रह ह्या वर्षी प्रकाशित झाला आहे. मराठी कथेच्या विविध प्रकारांना पूर्णता येण्याच्या दृष्टीने ह्या संग्रहाचें निराळें असें महत्त्व आहे. ' घरदार ' मधील घर, हें स्वतः माडगूळकरांचेंच घर आहे. त्याचप्रमाणे ज्या स्थळांचें त्यांनी चित्रण केलें आहे तीं स्थळेंहि त्यांच्या गावांतील व कांही त्यांच्या मालकीचीं आहेत. त्या स्थळांच्या ठिकाणीं असलेल्या व्यक्तिमत्त्वाचें ते आपणांस दर्शन घडवितात. व्यंकटेश माडगूळकरांच्या ह्या व्यक्तिरेखांची व स्थळचित्रांची यापूर्वींच आपणांस त्यांच्या व थोरल्या माडगूळकरांच्या लेखनांतून ओळख झालेली आहे. ती संदर्भाच्या रूपाने, वर्णनाच्या ओघांत झालेली आहे तिचाच तपशील येथे आहे. Pre-Supposition ( पूर्वसमज ) सहितच आपण हें सारें वाचतों. Pre-Supposition मुळे कलाकृतींच्या रसग्रहणांत एक प्रकारचा दोष निर्माण होतो. माणदेशांतील इतर अनेक व्यक्तींचें माडगूळकरांनी केलेलें चित्रण आणि हें चित्रण यांत तसा कांहीच फरक नाही. हीं सारीं माणसें आपल्या कुटुंबांतलीं आहेत, म्हणून त्यांचें आणि त्यांच्याबरोबर स्वतःचेंहि त्यांनी कुठेच उदात्तीकरण केलेलें नाही. खरें तर यांतील सर्व सुखदुःखांच्या प्रसंगांत स्वतः तेहि भागीदार आहेत पण फाजील हळवेपणा त्यांनी कुठेच येऊं दिला नाही. ह्या सर्वच व्यक्तींच्याकडे व प्रसंगांच्याकडे ते कलात्मक अलिप्तता राखूनच बघतात–त्यांतला वैयक्तिकतेचा भाग गळून पडतो-आणि तिच्या विशुद्ध स्वरूपांतच ती कलाकृति प्रकट होते. त्यांच्या ह्या व्यक्तींची–बिटाकाका, तात्या, दादा, आई ह्या सर्वांचींच जीवनें दुःखांच्या भारांनी वाकलेलीं आहेत. सड्याफटिंग वृत्तीचे तात्या, संसार आणि मूल ह्यांना अपूर्वाई मानणारे बिटाकाका, आजार आणि दारिद्र्य यांनी खंगलेले दादा, त्यांचा अबोल, शांत स्वभाव आणि सोशिक वृत्ति, मामलेदारीण बाईच्या तोंडांत चपराक देणारी स्वाभिमानी आई-ह्या सर्वांचेंच चित्रण माडगूळकरांनी अतिशय कलात्मक अलिप्ततेने केलें आहे. ह्या सर्वच व्यक्तींचें चित्रण मोठें कारुण्यपूर्ण आहे. हें चित्र रेखाटतांना माडगूळकर आपण स्वतः ह्याच कुटुंबांतले आहोंत हें विसरून, एका सच्च्या कलावंताची भूमिका घेतात. ह्या सर्व व्यक्ती माडगूळकरांच्या कुटुंबांतील नाहीत असें जरी क्षणभर गृहीत धरले तरी विशेष फरक पडत नाही. त्यांच्या ह्या अलिप्ततेमुळे त्यांचे जीवनानुभव हे खरोखरच सार्वत्रिक होतात. कलावंताला आवश्यक असलेली ही अलिप्तता माडगूळकरांच्या ठिकाणीं आहे. माडगूळकरांचें हेंच सामर्थ्य आहे.

ह्या संग्रहांतील गावाकडील कांही स्थळांच्या, ' शाळा ' ' पार ' इ० ठिकाणीं असलेल्या व्यक्तिमत्त्वाचें चित्रणहि कलापूर्ण आहे, परंतु वर्णनाच्या ओघांत ह्या सर्वांची आपणांस ह्यापूर्वींच माहिती झालेली असल्यामुळे आणखी तपशील पुरविण्यापलीकडे ह्यांचा फारसा उपयोग होत नाही.माडगूळकर ह्या स्थळांचें चित्रण करण्याच्या पूर्वीच, वाचकांच्या मनापुढे तें चित्र उभें राहत जातें. आपण मनाशीं कांही आडाखे बांधतों आणि ते जुळतात किंवा नाही ह्या जाणिवेने वाचन करीत जातो. ह्या चित्रणांत एकप्रकारची अपरिहार्यता जाणवत नाही.

माडगूळकरांनी नव्या प्रकारची ग्रामीण कथा लिहिली आणि आपल्या असामान्य कलागुणांची जाणीव करून दिली. माडगूळकरांचें लेखन कांहीसें एकसुरी होत चाललें आहे की काय अशा प्रकारची शंका येते. ह्या सर्वच व्यक्तिरेखांत आणि एकंदर जीवनानुभवांत तोच तोपणा येत चालला आहे हेंहि बोचकपणें जाणवतें. त्यांच्या असामान्य कलागुणांना Perspective ची जोड मिळालेली नाही, हेंहि जाणवायला लागते. Thomas Hardy चें लेखन वाचीत असतांना त्या साऱ्या विवेचनाच्या मागे Hardy चा एक जीवनविषयक दृष्टिकोन

आपणांस जाणवतो. माडगूळकरांच्या ठिकाणीं हा जीवनविषयक दृष्टिकोन अद्यापर्यंत पृथगात्मकतेने जाणवत नाही. त्यांच्या जीवनानुभवांना जीवनविषयक चिंतनाची जोड मिळणें अत्यावश्यक आहे; नाहीतर त्यांची असामान्य कथा आहे तिथेच थांबेल की काय अशी सतत भीति वाटते. माडगूळकरांनी अंतर्मुख होऊन ह्या सर्व प्रश्नांचा विचार करण्याची गरज त्यांच्या ह्या संग्रहाने निर्माण केली आहे. असें कांही झालें तरच माडगूळकरांच्या लेखनाला एक निराळा घाट येणार आहे आणि मराठी ग्रामीण कथा आजच्यापेक्षाहि सामर्थ्यवान् होणार आहे.

ग्रामीण कथेच्या संदर्भांतच शंकर पाटील आणि उद्धव ज. शेळके ह्या दोन लेखकांचा निर्देश करणें आवश्यक आहे. उद्यांच्या ग्रामीण कथेचीं हीं दोन आशास्थानें आहेत. माडगूळकरांचा वारसा घेऊन लेखन करणाऱ्या ह्या दोन लेखकांच्या ठिकाणीं फार मोठीं सामर्थ्यें आहेत. शंकर पाटलांचा ' वळीव ' आणि उद्धव शेळक्यांचा ' शिळाण ' ह्या त्यांच्या संग्रहांनी त्यांच्यासंबंधीच्या अपेक्षा उंचावल्या आहेत. बोलीविषयक तपशील वगळले तर त्यांचें स्वतःचें असें वैशिष्ट्य अजून प्रकट व्हावयाचें आहे. अनुभव घेण्याच्या पद्धतीपासून तें निवेदनापर्यंत त्यांची कथा सध्यातरी माडगूळकरांच्या कथेच्या जातीचीच आहे. प्रगतीच्या दृष्टीने ते एक एक टप्पा गाठत आहेत हें त्यांचें आजचें लेखन दर्शवितें.

नवकथाकारांच्या मालिकेंतील आणखी एक प्रमुख लेखक म्हणजे शांताराम. शांतारामांचा ' जमिनीवरचीं माणसं ' हा कथासंग्रह ह्या वर्षी प्रसिद्ध झाला आहे. जीवनाची दुर्लक्षिलेली, उपेक्षिलेली अशी बाजू शांताराम सामर्थ्याने रंगवितात. ' जमिनीवरचीं माणसं ' ह्या त्यांच्या संग्रहांतील पहिल्याच कथेंत निराळ्या स्वभावाच्या व्यक्ती आपणांस भेटतात. उथळपणा आणि गांभीर्य ह्या दोन गोष्टीभोवती हेलकावणारी स्नेहलता–प्रेमविवाह होऊनहि आपल्या पतीला ताब्यांत ठेवण्यास असमर्थ ठरते. तिचा नवरा हा चंचलवृत्तीचा नसतांनाहि सौ. सुब्रह्मण्यम्‌कडे आकर्षित होतो. दोन विवाहित व्यक्तींमध्ये आकर्षण निर्माण होतें. ही दोघेहि आपल्या संसारांत दुःखी असतात आणि म्हणूनच परस्परांच्या निकट येतात. स्नेहलतेचे भावविश्व उद्‌ध्वस्त होण्याच्या बेतांत येतें आणि मग शेवटीं आपल्या सौभाग्यासाठीं सौ. सुब्रह्मण्यम्‌कडे अगतिक होऊन ती पदर पसरते. कल्पनेच्या साम्राज्यांत वावरणाऱ्या स्नेहलतेला शेवटीं आपले पाय जमिनीवर टेकवूनच जीवन जगावें लागतें. असाच कल्पनेच्या विश्वांत वावरणारा आणि जीवनांत नसलेली दुःखें निर्माण करणारा सहस्रबुद्धे ह्यांनी ' ब्रह्मदेवाच्या अक्षता'मध्ये चित्रिलेला आहे. शांतारामांच्या माणसांचीं हीं दुःखें तशीं फारशीं सखोल नाहीत. ह्या साऱ्या सामान्य माणसांच्याच व्यथा आहेत. शांतारामांच्या कथेची एक स्वतंत्र पद्धति आहे. ह्या कथासंग्रहांतहि हीं वैशिष्ट्यें आढळून येतात. मात्र निराळीं अशीं सामर्थ्यें आढळत नाहीत, आणि म्हणूनच शांतारामांच्या ह्या कथासंग्रहाचें तसें वेगळेंपण फारसें जाणवत नाही.

सातत्याने लेखन करणारे आणि कांही कथांनी आपला स्वतंत्र ठसा उमटवणारे अच्युत बर्वे आणि श्री. ज. जोशी ह्यांचे अनुक्रमें ' चांदण्यांचा सुगंध ' आणि ' सुलभा ' हे दोन कथासंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. अच्युत बर्व्यांची कथा सांप्रदायिक नाही व हेंच त्यांचें निराळेंपण आहे. आजच्या नवकथेने अनुभव घेणाच्या पद्धतींत जी एक क्रांति केली आहे, तिचा परिणाम बर्व्यांच्यावर सुद्धा जाणवतो. या संग्रहांतील बहुतेक कथा प्रथम पुरुषांत लिहिल्या आहेत. ' चांदण्यांचा सुगंध ' ह्या कथेंत नायकाला प्रवासांत भेटलेली व त्याच्यावर अनुरक्त झालेली एक विवाहित स्त्री पौरुषविहीन नवऱ्याला कंटाळून शेवटीं शरीरसुखासाठी देहाचा बाजार

मांडते व ह्या सर्व प्रकाराला तो नायकच जबाबदार आहे असा त्याच्यावर ठपका ठेवते. ' मधाचं बोट ' मध्ये एका माणसाला नोकरी लावून देण्याचें आश्वासन देणारा व तें आश्वासन न पाळूं शकणारा असा एक माणूस त्यांनी रंगविला आहे. ' सोन्याचा पिंपळ ' मध्ये वाईट पायगुणासाठी कुप्रसिद्ध बनलेले अण्णा, आपल्या एकुलत्या एका मुलाचे-बापूचें-लग्न मोठ्या मुष्किलीने करून देतात. लोकापवादाला ते स्वतःच घाबरतात आणि बापूचें लग्न झाल्यादिवशीं गृहत्याग करतात. बर्व्यांच्या ह्या व इतर कथा वाचतांना त्यांना लोकविलक्षण अनुभवांचें वेड आहे असें जाणवतें. ह्या लोकविलक्षण अनुभवांतील कारुण्य ते कलात्मकतेने टिपतात. ह्यांतच बर्व्यांचें वैशिष्ट्य आहे. गेलीं अनेक वर्षे बर्व्यांचें लेखन चाललें आहे, पण त्यांची कथा तिला तिचा मार्ग सापडूनहि थांबल्यासारखी वाटते. ' सुलभा ' आणि ' राक्षस ' ह्या कथांनी श्री. ज. जोशांनी आपल्या सामर्थ्याविषयी अपेक्षा निर्माण केल्या. कांहीतरी निराळें लिहिण्याची धडपड त्यांच्या ठिकाणीं दिसून आली. त्यांच्यासंबंधीच्या अपेक्षा उंचावणारा ' सुलभा ' हा कथासंग्रह आहे. एका विशिष्ट वर्तुळामध्ये सापडलेली सुलभा, साऱ्या सुखसोयी अस्तित्वांत असतांनाहि जीवनाचा तिला कंटाळा येतो. सर्वच वातावरणाचा तिला विलक्षण उबग येतो. भोवतालच्या जीवनांत मात्र तिला कुठेच विसंवाद आढळत नाही. सर्वांचा जीवनक्रम ह्याच अवस्थेंत चाललेला तिला दिसून येतो आणि तरीहि कुठेतरी चुकत असल्याची जाणीव तिचा पिच्छा सोडीत नाही. सुलभाची ही वेगळी जाणीव ही खरोखरच मोठी मोलाची आहे.

व्यावहारिक संबंधामुळे एकेकाळचा जिवलग मित्र राम परिस्थितीमुळे राक्षसासारखा वाटतो. ' राक्षस ' ह्या कथेतील जीवनाचित्रणांत व्यवहार आणि कर्तव्यबुद्धि या दोहोंनी छेदलेल्या जीवनाचें मोठें मार्मिक दर्शन श्री. ज. जोशी घडवितात. ह्या संग्रहांतील जवळ जवळ सर्वच कथा तशा निराळ्या जातीच्या आहेत. श्री. ज. जोशांना त्यांचें स्वतःचें असें अनुभव विश्व गवसल्याच्या खुणा ह्या कथांतून व्यक्त होतात आणि म्हणूनच हा संग्रह त्यांच्याविषयीच्या अपेक्षा वाढवितो.

' काळोखाचीं पिसें ' हा एक उत्तम दर्जाचा कथासंग्रह प्रकाशित झाल्यानंतर सदानंद रेग्यांचा ' चांदणें ' हा संग्रह ह्या वर्षी प्रकाशित झाला आहे. काव्यात्म शैली आणि दुःखपूर्ण जीवनानुभव व्यक्त करणें हीं रेग्यांचीं वैशिष्ट्यें आहेत. मात्र ' चांदणें ' ह्या त्यांच्या कथासंग्रहांत चमत्कृतिपूर्ण अनुभवांचेच आपणांस दर्शन घडतें. रेग्यांच्यासंबंधी आपल्या अपेक्षा ह्या संग्रहांत पूर्ण होत नाहीत. सदानंद रेग्यांच्या बाबतींत असें कां व्हावें हा प्रश्न उपस्थित होतो. पंधरा वर्षांहून अधिक काळापासून सदानंद रेगे लेखन करीत आहेत. त्यांनी कित्येक श्रेष्ठ दर्जाच्या कथा लिहिल्या आहेत; पण असें असूनहि रेग्यांची कथा थांबल्यासारखी वाटते. रेग्यांच्या ठिकाणीं फार मोठें सामर्थ्य आहे. त्यांच्यासारखा सामर्थ्यवान् माणूस अजूनहि मोहांना बळी पडतो ह्याचें सखेदाश्चर्य वाटतें.

विपुल प्रमाणांत परंतु विशिष्ट दर्जा न ढळूं देतां लेखन करणाऱ्या अं. शं. अग्निहोत्रींचे दोन कथासंग्रह ' अंजला ' आणि ' वृंदा आणि इतर कथा ' ह्या वर्षी प्रकाशित झाले आहेत. माणूस ह्या टोपण नांवाने 'मौज' साप्ताहिकांतून नियमितपणे लेखन करणारे अग्निहोत्री, यांच्या कथेचें क्षेत्र मध्यमवर्ग हेंच आहे. मध्यमवर्गीतील ढासळलेलीं कुटुंबें, त्यांचें सुखदुःख, आशा-आकांक्षा ह्या सर्वांचें चित्रण अग्निहोत्री करितात. एवढ्या विपुल प्रमाणांत लेखन करणारा दुसरा कुणी कथालेखक मराठींत आहे असें वाटत नाही. कथालेखनाचें प्रमाण विपुल असल्यामुळेच असेल कदाचित्. अग्निहोत्रींचे कथानुभव नुसतेच पसरट वाटतात– सखोल वाटत नाहीत. घटनांतील कारुण्य हेरण्याचें, ते कलात्मक पद्धतीने सांगण्याचें कसब त्यांच्या

ठिकाणीं आहे. ह्यामुळे त्यांच्या कथेची विशिष्ट अशी पद्धति आणि प्रकार हा आपोआपच तयार झाला आहे.

'शिडी' 'घर' 'आबा' ह्यांसारख्या कथांतून कारुण्यपूर्ण प्रसंगांचें त्यांनी चित्रण केलेलें आहे.ह्या कारुण्याची जात सुद्धा फारशी उत्कट स्वरूपाची नसते- तर विशिष्ट घटनांच्या संदर्भातच तें कारुण्य वाचकांना जाणवतें. ज्या घटना किंवा जीवनानुभवांचें अग्निहोत्री चित्रण करितात ते अनुभवच मुळी सर्वसामान्य स्वरूपाचे असतात आणि पर्यायाने त्या त्या जीवनानुभवांतील कारुण्यहि सामान्य प्रकारचेंच असतें.

अर्थात् हा अग्निहोत्रींच्या कथालेखनांतील दोष नव्हे तर ती त्यांची मर्यादा आहे. चांगल्या दर्जाचें कथालेखन करणाऱ्या लेखकांत अग्निहोत्री यांचें एक विशिष्ट स्थान त्यांनी निर्माण केलें आहे. ह्याच गोष्टीची साक्ष पटविणारे हे दोन कथासंग्रह आहेत.

मराठी विनोदी कथांतील सर्व जुन्या-नव्या लेखकांचे संग्रह ह्या वर्षी प्रकाशित झालेले आहेत. प्रा चिं. वि. जोशी यांचा 'आरसा,' बोकिलांचा 'आमची आयुर्धे: आमचें राज्य' हा स्वयंपाकीण बाईच्या जीवनावर आधारलेल्या गोष्टींचा संग्रह; आचार्य अत्रे यांच्या 'हास्य-कथा', उमाकान्त ठोमरे ह्यांचा 'कानफाट्या'. ह्या जुन्या-नव्या कथासंग्रहांतील कथांचें स्वरूप मनोरंजन करण्याचें आहे. 'आरसा' ह्या कथासंग्रहाच्या विवेचक प्रस्तावनेमध्ये 'विनोदा'-संबंधी कांही मतें चिं. वि. जोशी ह्यांनी मांडलीं आहेत. आचार्य अत्र्यांच्या हास्यकथांचें स्वरूप चुटकेवजा आहे, तर ठोमऱ्यांनी कांही परकीय चांगल्या विनोदी कथा अनुवादिल्या आहेत.

---

नव्या पिढींतील अल्पावधींतच लोकप्रिय झालेल्या द. मा. मिरासदारांचा ' ताजवा ' हा संग्रहहि ह्याच वर्षात प्रसिद्ध झाला आहे. मिरासदारांच्या किरसेनजा कथा ह्यांत संग्रहित झालेल्या आहेत. ' खालिफा-ई-बगदाद,' ' दळण ' ह्या चांगल्या कथा या संग्रहांत समाविष्ट झाल्या आहेत. मिरासदारांचें लेखन विपुल प्रमाणांत होत आहे- आणि कदाचित् ह्यामुळेच असेल-त्यांची कथा आवर्तात सापडल्यासारखी वाटते. निराळ्या धाटणीची ' विरंगुळा ' ही एक उत्कृष्ट कथा त्यांनी ' सत्यकथा ' दिवाळी अंकांत लिहिली आहे.

मला स्वतःला वाटणाऱ्या प्रमुख कथासंग्रहांचें विवेचन मीं येथपर्यंत केलें आहे. ह्या व्यतिरिक्तहि कितीतरी चांगल्या प्रकारची दर्जेदार कथा दिवाळी अंकांतून व मासिकांतून प्रकाशित झालेली आहे.

पहिल्या प्रथमच संग्रहरूपाने प्रकाशित झालेला द. भि. कुळकर्णी ह्यांचा ' रेक्वीयम ' हा संग्रह, रा. शं. दातारांचा ' पागोळ्या ' हा संग्रह यंदाच बाहेर पडला आहे. द. भि. कुळकर्ण्यांच्या बक्षिसास पात्र ठरलेल्या कांही कथा रेक्वीयममध्ये संग्रहित झाल्या आहेत. भावार्त वातावरणाचें चित्रण हाच त्यांचा ह्या संग्रहांतील स्थायीभाव आहे. क्षयाने आजारी असलेल्या एका तरुणीच्या भूतकाळांतील कांही सोनेरी क्षणांचें चित्रण 'भावविश्व' ह्या कथेंत वाचावयाला मिळते. द. भि. कुळकर्णी ह्यांची काव्यात्म शैली हाहि एक त्यांचा विशेष. ' पागोळ्या ' मधल्या कथा चांगल्या आहेत पण त्यांत वैशिष्टयपूर्ण असें कांही नाही.

योगिनी जोगळेकर ह्यांचा ' प्राची ' हा संग्रह व शिरीष पै ह्यांचा ' मयूरपंख ' हा कथासंग्रह सर्वच संप्रदायांपासून अलिप्त राहून आपल्याला जाणवलेल्या अनुभवांचें प्रामाणिक चित्रण ह्या दोन्ही कथासंग्रहांत आहे. ह्या विवेचनांत विचारांत न घेण्यांत आलेले कितीतरी चांगले कथासंग्रह व कथा ह्या वर्षात प्रकाशित झालेल्या आहेत.

माझ्या वांट्याला आलेल्या पृष्ठसंख्येपेक्षा हें विवेचन लांबलेलें आहे. लेखकांच्या नांवांचा अनुक्रम देऊन नुसती नोंद करण्यांत कांहीच हशील नाही. दिवाळी अंकांतील कथांचा विचार करायचा झाला तर तो एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे. ह्यासाठीच मी लेखाच्या प्रारंभीं विवेचनाच्या सोयीच्या दृष्टीने मर्यादा ठरवली होती.

१९५९ सालांतील मराठी कथेचे तीन प्रमुख प्रवाह आढळून येतात. ह्या तीन प्रवाहांचें आव्हान हेंच ह्या वर्षातील कथेचें वैशिष्टय आहे. जेव्हा कुठलाहि वाङ्मयप्रकार आव्हानात्मक स्वरूपाचा असतो तेव्हा त्याच्या ठिकाणीं प्रगतीचीं बीजें अपरिहार्यपणे असतात. आव्हान हेंच त्या वाङ्मयप्रकाराच्या जिवंतपणाचें लक्षण आहे. मराठी कथेच्या उज्ज्वल भवितव्याची हीच एक मोठी खूण आहे. ● ● ●

प्रा. सुरेश म. डोळके, एम्. ए.

# संशोधनात्मक ग्रंथ

इ. स. १९५९ सालांत प्रकाशित झालेल्या मराठी संशोधनात्मक ग्रंथांचें समालोचन करण्याचें प्रस्तुत लेखांत योजलें आहे.

इ. स. १९५९ सालीं प्रकाशित झालेल्या मराठी संशोधनात्मक ग्रंथांत कै. विद्वद्रत्न डॉ. केशव लक्ष्मण ऊर्फ भाऊजी दप्तरी यांच्या **उपनिषदर्थव्याख्या** ( पूर्वार्ध )[1] या ग्रंथाला अग्रमान द्यावा लागेल. असे मूलगामी ग्रंथ मराठींत क्वचितच प्रसिद्ध होतात.

इ. स. १९५७ मध्ये डॉ. दप्तरींचा ' औपनिषदिक जीवनसौख्य ( उपनिषदांचा वस्तुनिष्ठ व बुद्धिप्रत्ययक अर्थ ) ' हा मूल्यवान् व उपनिषदांकडे पाहण्याच्या दृष्टींत क्रांतिकारक प्रवर्तन करणारा ग्रंथ प्रसिद्ध झाला. वस्तुत: डॉ. दप्तरी यांनी अनेक वर्षे परिश्रम करून, त्यांना मूळ व प्रमाणभूत वाटणाऱ्या प्रत्येक उपनिषदांतल्या प्रत्येक पदावर व वाक्यावर आधी भाष्य लिहून काढलें. त्यानंतर त्यांनी ' ज्ञानकर्मसमुच्चय ' हेंच उपनिषदांचें प्रतिपाद्य आहे, असा अभिनव सिद्धान्त प्रतिपादन करणारा उपनिषदांचा उपसंहार लिहून काढला. उपनिषदांच्या अधिष्ठानावर, सर्व जगाच्या कल्याणाकरिता

' ब्रह्माद्वैतं स्वापरूपं जीवो ब्रह्मैव फुल्लितम् ।
सर्वात्मस्वत आत्मानम् पश्यन्कर्म सदा कुरु ॥ '

अशी मंगल प्रार्थनाहि भाऊजींनी त्या ग्रंथांत केली आहे.

पण, योगायोगाची गोष्ट अशी की, भाऊजींनी सर्वांत शेवटीं लिहिलेल्या उपनिषदांच्या उपसंहारालाच ' औपनिषदिक जीवनसौख्य ' या नांवाने प्रकाशांत येण्याचा अग्रमान मिळाला व त्यानंतर त्यांनी आधी लिहिलेल्या उपनिषदांवरील भाष्याला ' उपनिषदर्थव्याख्या ' या नांवाने प्रकाशित होण्याची संधि मिळत आहे. प्रस्तुत ग्रंथ हा त्या भाष्याचाच पूर्वार्ध.

डॉ. दप्तरी यांच्या मतानुसार ईश, केन, कठ, मुंडक, प्रश्न, तैत्तिरीय, मांडूक्य, कौषीतकी, ऐतरेय, छांदोग्य व बृहदारण्यक हीं अकरा उपनिषदें वेदान्त म्हणजे वेदांचा अखेरचा भाग असून हींच सर्व उपनिषदांत मूळ, जुनीं, प्रमाणभूत व खरीं उपनिषदें होत. सध्या एकशेंआठ अधिक एकाहत्तर उपनिषदें उपलब्ध आहेत. पण, त्यांपैकी वरील अकरा सोडलीं तर बाकीचीं सर्व उपनिषदें भाऊजींना प्रामाण्याच्या दृष्टीने निरुपयोगी अतएव त्याज्य वाटतात. प्रस्तुत ग्रंथांत त्यांपैकी नऊ उपनिषदांच्या अर्थव्याख्या आहेत.

उपनिषद्-भाष्य लिहिणारे पूर्वाचार्य व डॉ. दप्तरी यांच्या उपनिषदांकडे पाहण्याच्या दृष्टींत मुळापासूनच मतभेद आहेत. वेद व उपनिषदें हीं ईश्वरानिर्मित आहेत; त्यामुळे तीं मानवी बुद्धीस पटोत वा न पटोत, प्रमाण मानलींच पाहिजेत, अशा श्रद्धेने ब्रह्मसूत्रकार व्यास व शंकरादि भाष्यकार उपनिषदांच्या विवरणास प्रवृत्त झाले. वेद हे अपौरुषेय म्हणजे ईश्वरनिर्मित असल्यामुळे वेदांतील प्रत्येक शब्द हा सत्य मानलाच पाहिजे, तो असत्य राहूंच शकत नाही, हा

---

१. प्रकाशक : दि. व. पंडित, कार्यवाह, दप्तरी ग्रंथप्रकाशन समिति, महाल, नागपूर २. पृष्ठें ४९६, मूल्य–साडेदहा रुपये.

अनुक्रमणिका

शंकराचार्यांच्या विचारपद्धतींतील मूलसिद्धान्त होता. त्यामुळें सर्व उपनिषदांचा अर्थ एकच आहे, त्यांमध्ये मतभेद किंवा विरोध कुठेंच नाहीत, अशी पूर्वाचार्यांची धारणा होती. विभिन्न उपनिषदांत परस्परविरोधी वचनें आढळलीं तर पदरचे शब्द घालून त्या उपनिषद्वचनांची 'व्यवस्था' लावण्यांतच त्यांचें पुष्कळसें बुद्धिवैभव खर्च झालें.

पूर्वाचार्यांची ही भूमिका व उपनिषदांचा अर्थ लावण्याची त्यांची ही रीति मुळांतच चुकलेली आहे, असें भाऊजींचें स्पष्ट मत होतें. वेद हे अपौरुषेय म्हणजे ईश्वरनिर्मित आहेत ही भूमिका भाऊजींना मुळांतच मान्य नाही. बुद्धीला न पटणाऱ्या ईश्वरप्रेरित ग्रंथाची कल्पनाच भाऊजींना सहन होत नसे. वेदांच्या अपौरुषेयत्वाच्या वादांत भाऊजींनी सनातन्यांशीं अटीतटीने झुंज घेतली व वेद हीं मानवाचीं बुद्धिकार्येंच आहेत हें अनेक प्रमाणांनी सिद्ध करून दाखविलें. यासंबंधी ते म्हणतात, "अपौरुषेयत्ववाद म्हणजे वेद मनुष्याने केले नाहीत, ते ईश्वराने केले किंवा ईश्वर किंवा मनुष्य यांपैकी कोणीच केले नसून अनादीच आहेत हा वाद. हा वाद बुद्धीस पटूं शकत नाही व खोटा आहे....कोणाहि समंजस मनुष्यास वेद मनुष्यकृतच आहे हें पटवून देण्याची गरज नाही" [ औ. जी., पृ. १५२ ].

उपनिषदांत मतभेद आहेत. पण ते मतभेद मिटविण्याकरिता पदरचे शब्द घालून मूळ वाक्यांचे अर्थ फिरविणें चूक आहे. मूळ शब्दांचे योग्य अर्थ करून किंवा योग्य पदच्छेद करून उपनिषदांचा समन्वय होत असेल तरच करावा, नाहीतर करूं नये असें भाऊजींचें मत होतें. जिथे मुळांतील शब्दांचे अनेक अर्थ होत असतील, तिथे बुद्धीस पटेल तोच अर्थ घ्यावा अशी भाऊजींची विचारसरणी आहे.

पूर्वाचार्यांच्या मतानुसारहि उपनिषदांमध्ये मतभेद वा विरोध नाहीत असें नाही. पण, त्या मतभेदांना किंवा विरोधांना ते 'आभास' मानीत असत. 'वस्तुतः' त्यांत विसंगति असणें शक्य नाही अशीच त्यांची धारणा होती. डॉ. दप्तरींनी मात्र बुद्धि हीच सर्वश्रेष्ठ कसोटी मानली आहे. कोणतेंहि शास्त्र हें बुद्धिव्यापारापासूनच प्रवर्तित होत असतें. बुद्धिप्रामाण्याशिवाय इतर सर्व प्रामाण्यें भाऊजी त्याज्य मानीत असत. "जगताहून व अर्थात् भक्ताहून भिन्न व भक्ताची इच्छा पुरविण्याकरिता आपल्याच जगाचें नियमन करणाऱ्या नियमांचा भंग करणारा असा ईश्वर कोणाहि बुद्धिमान् मनुष्यास मान्य होणार नाही व आम्हांसहि मान्य नाही" असें भाऊजींनी स्पष्ट बजाविलें आहे [ 'धर्मविवादस्वरूप,' पृ. २५१ ].

बुद्धिवादी व वस्तुनिष्ठ विचारसरणी हीच भाऊजींची उपनिषदांकडे पाहण्याची एकमेव कसोटी आहे. या कसोटीवर उपनिषदांचें परीक्षण करीत असतां शंकराचार्यांनी जिथे जिथे समन्वयवादी अर्थ केले, तिथे तिथे शंकराचार्य चुकले आहेत असें भाऊजींनी निर्भीडपणाने सांगितलें आहे ( पृ. १०, २४, २८, ३५ इ० ) आणि आश्चर्याची गोष्ट अशी की, या एकमेव कसोटीवर उपनिषदांचें परीक्षण करूनहि, किंबहुना शंकराचार्य, कुमारिलभट्ट, शबरस्वामी इत्यादि पूर्वाचार्यांनी दृढमूल केलेलें उपनिषदांचें अध्यात्मनिष्ठ अधिष्ठान छिन्नविच्छिन्न करूनहि, उपनिषदें हीं मानवाला उच्चतम आनंद प्राप्त करून देण्यासाठी व कर्तव्योन्मुख करण्यासाठींच निर्माण झालेलीं आहेत असा मोठा श्रेयस्कर व कर्तव्यप्रेरक संदेश त्यांनी दिला आहे. ते म्हणतात, "पुरुषार्थसिद्धि वासनाक्षयानेच होते आणि वासनाक्षय सर्वभूतहितार्थ मरेपर्यंत कर्म करण्यापासूनच होऊं शकतो हेंच उपनिषदांचें सार आहे" [ औ. जी., पृ. १६० ].

पूर्वाचार्यांनी जगाच्या उत्पत्ति-स्थिति-लयाला कारणीभूत होणारें ब्रह्म हा उपनिषदांचा विषय मानला होता. भाऊजी आनंदप्राप्तीला साधनीभूत होणारें ब्रह्म हा उपनिषदांचा विषय आहे असें मानतात. पूर्वाचार्यांनी वेदान्त हें अध्यात्मशास्त्र [ Metaphysics ] व जगदुत्पत्तिशास्त्र

[ Cosmology ] आहे असें मानून उपनिषदांचा परलोकपर अर्थ केला होता. डॉ. दप्तरी यांनी उपनिषदांचा विषय कर्तव्याकर्तव्यशास्त्र [ Ethics ] हाच आहे असें प्रतिपादन करून उपनिषदांचा इहलोकनिष्ठ आशय उलगडून दाखविला आहे. जीवाला आत्यंतिक आनंदाची प्राप्ति कशी होईल हाच त्यांच्या मतें उपनिषदांचा एकमेव विषय आहे.

जीवाचें परमसुखरूप हित सांगणें हा उपनिषदांचा विषय आहे हें पूर्वाचार्यांनाहि मान्य होतें. पण, या सुखाची त्यांची कल्पना अध्यात्मनिष्ठ होती. आत्यंतिक सत्याचें ज्ञान झाल्यावरच जीवाला परमसुख प्राप्त होतें ही पूर्वाचार्यांची विचारसरणी दप्तरींना मान्य नाही. अज्ञेय प्रांतांतील आत्यंतिक सत्य कोणतें याविषयीची जिज्ञासा ही, पूर्वाचार्य मानतात त्याप्रमाणे, उपनिषदांची प्रेरणा नसून, जीवाला इहलोकींच आनंदाची प्राप्ति कशी होईल याची चिंता हीच त्यांची प्रेरणा आहे असें भाऊजींच्या उपनिषद्विषयक विचारांचें अधिष्ठान आहे. जीवावस्थेंतच आनंदाचा अनुभव घेतां येतो, म्हणून जीवित कायम ठेवण्याकरिता नेहमी कर्म करावें. 'कुर्वन्नेवेह कर्माणि जिजीविषेच्छतं समाः' या 'ईशावास्योपनिषदां'त याज्ञवल्क्याने उद्घोषित केलेल्या वचनानुसार वागल्यानेच भारतीयांचें कल्याण होईल अशी भाऊजींची निष्ठा होती.

या आनंदाचें स्वरूपहि डॉ. दप्तरी यांनी विशद केलें आहे. जागेपणीं इच्छेचा अभाव झाला की आनंद होतो. " जाग्रतींत वासनाभाव होतांच भावरूपी आनंद प्रकट होतो, म्हणून कोणत्याहि रीतीने उत्पन्न झालेला जाग्रतींतील वासनाभाव हेंच श्रेष्ठानंदाचें स्वरूप आहे [ औ. जी., पृ. ४७ ] असें भाऊजी म्हणतात. यानुसार, इच्छेचा अभाव जागेपणीं करणें हेंच आनंदाचें सर्वोत्कृष्ट साधन ठरतें. अत्युच्च आनंदाच्या वेळीं देखील कोणतीहि इच्छा उत्पन्न झाली की, तत्क्षणींच मनुष्य त्या आनंदापासून घसरतो.

जाग्रतींत कुणीच कर्मरहित राहूं शकत नाही आणि कर्म हें तर वासनेशिवाय होऊं शकत नाही; मग जाग्रतावस्थेंत वासनाक्षय कसा होईल ?— याहि प्रश्नाचें उत्तर डॉ. दप्तरी यांनी दिलें आहे. वासना [ Wish किंवा Intention ] व प्रेरणा ( Volition ) यांत त्यांनी फरक केला असून वासनेशिवाय कर्म होऊं शकतें असें ते म्हणतात. अद्वैतबुद्धीने सर्व भूतांच्या हितार्थ कर्म करणें हेंच वासनारहित कर्म होय. अद्वैतानुभवांत रंगलेली जाग्रति हीच तुर्यावस्था किंवा जीवात्म्याची आनंदमय उच्चतम अवस्था होय. या ज्ञानमय अवस्थेसच सर्वभूतहितकारक कर्माची म्हणजे सत्कर्माची जोड दिली, की 'ज्ञानकर्मसमुच्चय' सिद्ध होतो. ज्ञान व कर्म यांचा समुच्चय हाच, डॉ. दप्तरी यांच्या मतानुसार, उपनिषदांचा मुख्य आदेश आहे.

ईश, केन, कठ, मुंडक, प्रश्न, तैत्तिरीय, मांडूक्य, कौषीतकी व ऐतरेय अशा नऊ उपनिषदांचें कै. डॉ. दप्तरी यांनी केलेलें पदशः व वाक्यशः भाषांतर प्रस्तुत ग्रंथांत प्रकाशित झालें आहे. हा अर्थ करतांना डॉ. दप्तरींनी कित्येक ठिकाणीं शंकराचार्यांचे अर्थ खोडून काढले आहेत (पृ० १०, २४, २८, ३०, ३५). कांही ठिकाणीं मुळांतील शब्दांचे वेगळे अर्थ सुचविले आहेत [ अमृत = आनंद ( ११ ), अग्नि = कर्म ( १४ ), प्राण = श्वास ( २० ), आत्मा = शरीर ( ३१ ), अध्यात्म = शरीरांतील ( ३१ ), आधिदैवत = शरीराबाहेरील जगांतील ( ३१ ), लोक = अवस्था ( ३३ ), प्रतिष्ठा = उपनिषद् जाणण्याचा परिणाम ( ३५ ), मृत्यु = दुःख ( ४८ ) इ० ], तर कित्येक ठिकाणीं पदच्छेदहि वेगळेच केले आहेत ( ५ ). बौद्धिक प्रत्यय व वस्तुनिष्ठा यांच्या अधिष्ठानामुळेच भाऊजींना तसें करावें लागलें, व तसें करतांना त्यांनी कुणाचीहि भीडमुर्वत बाळगली नाही.

बुद्धिनिष्ठ व मानवतावादी दृष्टिकोणांतून उपनिषदांचा अर्थ करणारा आजपर्यंतचा हा पहिलाच प्रयत्न आहे. आजवर उपनिषदांवर लिहिणारे सर्वच भाष्यकार आध्यात्मिकतेच्या व परलोकनिष्ठेच्या रिंगणांतच फिरत होते. भाऊजींनी मात्र प्रस्तुत ग्रंथ लिहून या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा मार्ग पहिल्यांदा दाखविला व औपनिषदिक तत्त्वज्ञानाला एक अभूतपूर्व अधिष्ठान प्राप्त करून दिलें. भारतीय विचारविश्वांत नवें वैचारिक आंदोलन प्रवर्तित करण्याचें सामर्थ्य प्रस्तुत ग्रंथांत आहे यांत शंका नाही.

**श्रीगुरुगोरक्षनाथ–चरित्र आणि परंपरा : नाथसंप्रदायाचा इतिहास**[२]

हा इ. स. १९५९ सालीं प्रकाशित झालेला आणखी एक महत्त्वाचा संशोधनात्मक ग्रंथ. पुण्याचे विद्वान् अभ्यासक श्री. रामचंद्र चिंतामण ढेरे यांनी अत्यंत परिश्रमाने व प्रतिकूल परिस्थितींतहि अभ्यासाचें वेड राखून प्रस्तुत ग्रंथ लिहिला आहे.

भारतीय संस्कृतीच्या इतिहासांत मध्ययुगीन भारतीय साधनेला वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. ब्रह्मात्मैक्यभाव, समदृष्टीने विश्वाकडे पाहण्याची भावना, दीनदलितांच्या आत्मिक उत्थानाची कळकळ, आत्मानुभूतीचें विवेकनिष्ठ प्रामाण्य, स्थिरचराला व्यापून उरणारी आत्मीयता, भक्तीने परमात्म्याची परिसीमा गाठणारी अद्वैतदृष्टि, जनमानसांत अनुबंध निर्माण करणाऱ्या लोकभाषांचा वापर हे या मध्ययुगीन भारतीय साधनेचे विशेष म्हणून सांगतां येतील. या सर्व विशेषांचें प्रवर्तन अखिल भारतीय पातळीवरून प्रथम श्रीगुरु गोरक्षनाथ यांनी केलें, असा श्री. ढेरे यांचा प्रस्तुत ग्रंथांत सिद्धान्त आहे.

गोरक्षनाथाला हें प्रवर्तन कां करावें लागलें?– नाथसंप्रदायाच्या उगमापूर्वी भारतीय साधनेला अत्यंत विकृत स्वरूप प्राप्त झालें होतें. बौद्ध, शाक्त, कापालिक इत्यादि पंथांचा सर्व भर तंत्रसाधनेवर होता. तंत्रसाधना हेंच आध्यात्मिक जीवनाचें सर्वस्व अशी त्यांची भावना होती. शिवाराधनेच्या नांवाखाली तंत्रमार्गांतली सारी घृणास्पदता समाजांत उजळ माथ्याने मिरवीत होती. आत्मोन्नतीचा लवलेशहि नसलेल्या, शरीरसुखावरच सर्व भर देणाऱ्या या तंत्रसाधना प्रामुख्याने ' वामाचारी ' बनल्या होत्या. त्यांच्या साधनेकरिता स्त्री हें परमावश्यक साधन होतें. मद्यमांसादि पंचमकारांचाहि वापर त्यांत मनसोक्त चालू होता. श्रीशैल हें या तंत्रसाधनांचें केंद्र बनलें होतें. श्रीशैलावर योगिनींचे इतके मेळावे होते की, त्या भागाला ' स्त्रीराज्य ' असें म्हणत असत. या काळांतील साधनेचें दुसरें वैशिष्ट्य असें की, वरील सर्व साधनमार्गांत वेदविरोधी प्रवृत्तींचा प्रकर्ष झाला होता. वैदिक परंपरेंतील लहानसहान गोष्टीं-विरुद्धहि या काळांतील तंत्रसाधनांनी बंड पुकारलें व प्रतिक्रिया म्हणून अध्यात्मविरोधी अशा बाह्य साधनांचा प्रकर्ष घडविला. गोरक्षनाथाने या तंत्रसाधनांतली स्त्रीपरायणता, त्यांचें बाह्या-वडंबर व त्यांतल्या वेदविरोधी प्रवृत्ति यांचा बीमोड करून योगप्रधान, शिवयुक्त व आत्मानु-भूतीला प्रमाण मानणारा नाथसंप्रदाय प्रवर्तित केला. ज्ञानेश्वरांनी गोरक्षाचें वर्णन ' माहेशा-न्वयसंभूत ', ' योगाब्जिनीसरोवर ' आणि ' विषयविध्वंसैकवीर ' या विशेषणांनी केलें आहे. त्यांच्या प्रकाशांत गोरक्षनाथांच्या जीवनकार्याचें स्वरूप अजमावतां येतें.

नाथसंप्रदायाचे आदिसिद्ध मत्स्येन्द्रनाथ व गोरक्षनाथ हे उत्तरेंतले; त्यामुळे नाथसंप्र-दायाचा उगम उत्तरेलाच झाला असें अनेक संशोधकांनी लिहून ठेवलें आहे. डॉ० मोहनसिंग,

२. प्रकाशक : अ. ल. गाडगीळ ( वोरा अँड कंपनी, पब्लिशर्स प्रा. लि. करिता ) ३, राउंड बिल्डिंग, काळबादेवी रस्ता, मुंबई २. पृष्ठें २४४, मूल्य–साडेपांच रुपये.

प्रो० त्रिग्ज्, डॉ० द्विवेदी, डॉ० मलिक प्रभृति संशोधकांनी उत्तरप्रदेश, नेपाळ, आसाम, पंजाब या प्रदेशांना नाथसंप्रदायाच्या उदयभूमीचा मान बहाल केला आहे. सरदार मिरीकर यांनी मात्र नाथसंप्रदाय महाराष्ट्रांतीलच असा सिद्धान्त पहिल्यांदा मांडला व श्री० ढेरे यांनी अनेक पुरावे देऊन त्या सिद्धान्ताचा पाठपुरावा केला. हें सिद्ध करतांना श्री. ढेरे यांनी, पूर्वसूरींप्रमाणेच, 'कदलीवन,' नामक ठिकाणावर विशेष जोर दिला आहे व हें 'कदलीवन' म्हणजे दक्षिणेंतील श्रीशैलाचा परिसरच होय असें प्रतिपादन केलें आहे. श्री० ढेरे यांचें हें संशोधन मूलगामी असून नाथसंप्रदायाची जन्मभूमि त्यांच्या या संशोधनाने निश्चित झाली आहे, असें म्हणावयास हरकत नाही. 'कदलीबना'चा शोध घेण्यासाठी आता इतर प्रांतांत जावयास नको. एकनाथांनी भावार्थ रामायणांत किंवा मुक्तेश्वराने भावार्थ रामायणाच्या उत्तर-कांडांत उल्लेखिलेल्या दक्षिणेंतील 'कर्दळीवनां'तच त्याचा सुगावा लागू शकतो. मानससरोवरांत उगम पावलेल्या नद्यांनी जसा सर्व उत्तरप्रदेश व्यापला, तसाच दक्षिणेंत श्रीशैलावरील 'कदलीबनां'त उदय पावलेला नाथसंप्रदाय लवकरच अखिल भारतांत पसरला.

गोरक्षनाथांचा कालनिर्णय हाहि संशोधकांसमोर असलेला एक जटिल प्रश्न आहे. गोरक्षनाथाच्या कालनिर्णयाचा काटा आठव्या शतकापासून तों चवदाव्या शतकापर्यंत मागेपुढे फिरतो आहे. श्री. ढेरे यांनी अनेक पुराव्यांच्या, विशेषतः 'तंत्रालोक' व 'लीळाचरित्र' या ग्रंथांच्या आधारें इ. स. १०५० ते ११५० हा गोरक्षनाथांचा काल निश्चित केला आहे.

'महाराष्ट्रांतील नाथसंप्रदाय' या प्रकरणांत श्री. ढेरे यांनी महाराष्ट्रांत नाथसंप्रदायाची कशी अविच्छिन्न परंपरा सुरू आहे याचें विवेचन केलें आहे. मुकुंदराज हे महाराष्ट्रांतील नाथसंप्रदायाचे पहिले वाङ्मयपुरुष असें म्हणावें लागेल. मुकुंदराजांचा 'विवेकसिंधु' हा महाराष्ट्रांतील नाथ-सांप्रदायिक ग्रंथांची गंगोत्री आहे.

'आदिगुरु श्रीआदिनाथु । तेथौनि श्रीहरिनाथु
तयाचा शिष्ये श्रीरघुनाथु । जो गुणसिंधु ॥' [वि. सिं., उत्त० ११-३३]

या ओवींत मुकुंदराजांनी आपली गुरुपरंपरा दिली आहे. आदिनाथ-हरिनाथ-रघुनाथ या नांवांवरून मुकुंदराज हे नाथपरंपरेंतले असावे असें दिसतें. ज्ञानदेवांनीहि ज्ञानेश्वरींत आपली गुरुपरंपरा आदिनाथ-मच्छिंद्रनाथ, गोरखनाथ-गैनीनाथ-निवृत्तिनाथ अशी दिली आहे. ज्ञानदेवांनी दिलेल्या परंपरेंत हरिनाथ-रघुनाथ यांचीं नांवें नाहीत व मुकुंदराजांनी दिलेल्या परंपरेंत मच्छिंद्रनाथ-गोरखनाथ यांचीं नांवें नाहीत. या परंपरांचा मेळ कसा घालावयाचा ?—

नाथसंप्रदाय व महानुभावपंथ यांचाहि श्री. ढेरे यांनी सविस्तर विचार केला आहे. "चक्रधरांच्या रक्तांत नाथसंप्रदायाचें सत्त्व वाहत आहे—त्यांच्या आंतरिक जीवनाचें पोषण नाथसंप्रदायाने केलें आहे—त्यांच्या आचार-विचारांच्या कक्षा नाथ-प्रभावाने निश्चित झालेल्या आहेत आणि त्यांच्या महान् व्यक्तिमत्त्वाची जडणघडण नाथपंथाच्या प्रेरणांनी झालेली आहे" असें श्री. ढेरे म्हणतात (पृ. १९५). नाथसंप्रदाय व महानुभावपंथ यांच्यांत कांही साम्यें आढळतात हें मलाहि मान्य आहे. चांगा वटेश्वराच्या 'तत्त्वसार' या ग्रंथांत 'गुंडम राऊळ', 'नागार्जुन', 'घोडाचुळे' इत्यादि महानुभावपंथांत आढळणारीं कांहीं नांवेंहि दिसतात. पण, महानुभावपंथ व नाथसंप्रदाय यांच्यांत परस्परानुबंध आहे असें निश्चित विधान करण्यापूर्वी पुढील प्रश्नांचीं उत्तरें दिलीं पाहिजेत—

(१) नाथसंप्रदायाचें तत्त्वज्ञान हें 'अद्वयानंदवैभव' गाणारें आहे. गोरक्षनाथांनी शिव आणि शक्ति यांची अभिन्नता मानली आहे. नाथसंप्रदाय जर अद्वैतावर अधिष्ठित आहे, तर त्याच संप्रदायाचा अनुबंधी असलेला महानुभावपंथ हा पूर्ण द्वैती कसा ?

(२) गोरक्षनाथाने ' सिद्धसिद्धान्तपद्धतीं ' तील

ब्रह्मांडवर्ति यत्किञ्चित्तत्पिण्डेऽप्यास्ति सर्वथा
इति निश्चय एवात्र पिण्डसंवित्तिरुच्यते ॥ [ ३-२ ]

या श्लोकांत ' पिंडीं तेंच ब्रह्मांडीं ' हा सिद्धान्त मांडला आहे. महानुभावपंथ हा जीवाला सर्वार्थांनी ईश्वरत्व कधीच प्राप्त होऊं शकत नाही असें मानतो. दोन तत्त्वज्ञानांतला हा मूलभूत फरक लक्षांत घेतला पाहिजे.

(३) वेदविरोधित्वाचें पाखंड मोडून काढणें हा जर औपनिषदिक ऋषींचा वारसा समृद्ध करणाऱ्या नाथसंप्रदायाचा एक महनीय विशेष आहे, तर त्याच संप्रदायाचा अनुबंधी असलेला महानुभावपंथ हा वेदविरोधी कसा ?

(४) जैन पंथ व नाथसंप्रदाय हे सर्वस्वीं विभिन्न आहेत. जैनांनी गाठलेला तंत्र-साधनात्मक योगप्रकर्ष मोडून काढणें हाहि नाथसंप्रदायाच्या प्रवर्तनामागे गोरक्षनाथांचा एक उद्देश होता. महानुभावपंथावर सर्वांत अधिक प्रभाव कुणाचा असेल, तर तो जैन पंथाचा. तसा तो नाथसंप्रदायाचा कां असूं नये ?

(५) नाथसंप्रदायांत भक्तीला स्थान नाही. महानुभावपंथाने भक्ति व ज्ञान हीं ईश्वरप्राप्तीचीं साधनें म्हणून सांगितलीं आहेत व त्यांतहि भक्तीवर विशेष जोर [ ' ज्ञानापसि प्रेम उत्तम ', वि० मा० ३० ] दिला आहे. ' प्रेमसंचारमात्रें वीकार वीकल्पु स्वभावो तीन्ही उछे-दूनि जाति ' ( उद्धरण, १५ ) या सूत्रांत परमेश्वरप्राप्तीच्या इतर कोणत्याहि साधनांपेक्षा प्रेम-साधनच सर्वश्रेष्ठ असल्याचा चक्रधरांचा अभिप्राय अभिव्यक्त झाला आहे. उलट, गोरक्षनाथांनी मात्र सर्व भर ज्ञानावर दिलेला आहे. नाथसंप्रदाय व महानुभावपंथ हे जर परस्परानुबंधी आहेत, तर त्यांच्यांत हा फरक कसा पडला ?

(६) महानुभाव तत्त्वज्ञानावर माध्व-मताची जशी छाप पडलेली दिसते तशी नाथ-संप्रदायाची छाप पडलेली कां दिसत नाही ? पूर्ण द्वैत व भक्ति हीं महानुभाव तत्त्वज्ञानाचीं व्यवच्छेदक लक्षणें माध्वतत्त्वज्ञानांतहि व्यवच्छेदकच आहेत. नाथसंप्रदाय व महानुभावपंथ यांच्या परस्परसंबंधाबद्दल असें म्हणतां येईल का ?

(७) महानुभावपंथसंस्थापक श्रीचक्रधर यांनी नाथपंथाबद्दल व नाथपंथीय जोग्यां-बद्दल तिरस्काराचे व अनुदार उद्गार कां काढले आहेत ? त्या उद्गारांतून त्यांची नाथसंप्रदाया-विषयी कोणती दृष्टि अभिव्यक्त होते ?

हरिबास व सोंगोबास यांच्या 'अन्वयस्थळां' त नाथपंथापासून निर्माण झालेल्या शाखांच्या उगमाची एक रहस्यमय कथा आहे. त्यावरून नाथसंप्रदाय व त्यापासून निर्माण झालेल्या शाखोपशाखा यांच्याबद्दल महानुभाव पंथाला तिरस्कारच वाटत होता असें दिसतें. नाथसंप्रदाय व महानुभावपंथ यांच्या परस्परानुबंधाच्या संदर्भांत या तिरस्काराची उपपत्ति कशी लावावयाची ?

(८) ' नाथसंप्रदायाची थोरी । प्रगट केली ज्ञानेश्वरी ' हें जसें ज्ञानेश्वरीच्या बाबतींत म्हणतां येतें, तसें तें महानुभावपंथाच्या एका तरी ग्रंथाच्या बाबतींत म्हणतां येईल का ?

असो; श्री. ढेरे यांचा ग्रंथ वाचून ' नाथसंप्रदाय व महानुभावपंथ ' यांविषयीं ज्या शंका मनांत उद्भवल्या त्यांपैकी कांही वर सूत्ररूपाने मांडलेल्या आहेत.

" चांगदेवाचा पूर्वजीवनांत महानुभाव संप्रदायाशीं कांही संबंध आहे काय ? " ( पृ. १६३ ) व " द्वारावतीकर चांगदेव राउळांचा ' रावळ ' या नाथसंप्रदायाच्या एका प्रमुख शाखेशीं संपर्क येणें संभवनीय आहे " ( पृ. १९१ ) हे श्री. ढेरे यांचे यासंबंधी मांडलेले विचार चिंतनीय आहेत.

श्री. ढेरे यांनी प्रस्तुत ग्रंथांत नाथसंप्रदायाचीं विभिन्न नांवें, त्याच्या प्रमुख शाखोपशाखा, त्याचे सिद्धान्त, सांप्रदायिक वेष, प्राचीन नाथसिद्ध व त्यांचे ग्रंथ, महानुभाव, लिंगायत, वारकरी, दत्त, आनंद, चैतन्य व समर्थ या संप्रदायांशीं असलेला नाथसंप्रदायाचा अनुबंध इत्यादिकांचें सविस्तर व सोपपत्तिक विवेचन केलें आहे. ऐतिहासिक दृष्टीने नाथसंप्रदायाचें सांगोपांग विवेचन करणारा ग्रंथ मराठींत आजवर उपलब्ध नव्हता, श्री. ढेरे यांच्या प्रस्तुत ग्रंथाने ती उणीव अंशतः भरून काढली आहे.

इ. स. १९५९ सालीं प्रकाशित झालेल्या संशोधनात्मक ग्रंथांत **शेख महंमदबाबा श्रीगोंदेकरकृत ' योगसंग्राम '**[३] या ग्रंथाचाहि अंतर्भाव केला पाहिजे. पुण्याचे प्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. वासुदेव सीताराम बेंद्रे यांनी प्रस्तुत ग्रंथाचें संपादन केलें आहे.

ग्रंथाच्या सुरुवातीला असलेल्या ' शेख महंमदबाबा श्रीगोंदेकर ' या प्रकरणांत श्री. बेंद्रे यांनी उपलब्ध साधनांच्या आधाराने महंमदबाबांच्या चारित्र्याची जुळवाजुळव केली आहे. या साधनांत अस्सल ऐतिहासिक प्रामाण्य असलेले दोन पुरावेहि आहेत. एक मालोजी राजे भोसले व त्यांचे दिवाण बाळाजी कोन्हेर यांचा चकनामा व दुसरा जनकोजी शिंदे यांनी राजश्री एकनाथ सदाशिवजी कमाविसदार यांना ता. २० डिसेंबर १८३६ रोजीं लिहिलेलें पत्र. 'योगसंग्रामां'तल्या

> ॐ नमोजी श्रीसद्‌गुरु चांद बोधले । त्यांनी जानोपंता अंगिकारिलें ।
> जानोबाने एका उपदेशिलें । दास्यत्वगुणें ॥
> सत् चांद बोधल्याचे कुळीं शेख । महंमदांनी चाचिले विवेक ।
> ते विवंचनेला संत प्राश्निक । आशिर्वाद देती ॥
> [ यो. सं. १५–१,४ ]

या ओव्यांत शेख महंमदांनी आपल्या गुरूचें नांव सांगितलें आहे. गुरूला नमन करतांना शेख महंमद

> आतां माझें नमन जी सद्‌गुरु । करावा पतितांचा अंगिकारु ।
> तुम्हीं महा वरिष्ठ दिगंबरु । दीन तारक दुजे ॥
> [ यो. सं. १–२७ ]

असें म्हणतात. या दोनहि उल्लेखांवरून दत्तदिगंबर हें चांद बोधल्यांचें पारमार्थिक नांव होतें असें प्रमेय श्री. बेंद्रे यांनी मांडलें आहे. तें सिद्ध करतांना एकनाथ व शिवरामस्वामी कल्याणी यांच्याहि वचनांचा आधार श्री. बेंद्रे यांनी घेतला आहे. ' दत्तदिगंबर ' किंवा ' दत्तयोगिराज ' हे जनार्दनपंतांचे गुरु असतील. पण, ते म्हणजेच चांद बोधले हें कशावरून ?

एकनाथशिष्य मुकुंदराजाचा एक अभंग श्री. बेंद्रे यांनी प्रास्ताविक लेखांत उद्‌धृत केला आहे ( पृ. १६ ). त्यांतल्या ' वंशावळी कथे ' वरून रामनाथ हा मुकुंदराजांचा शिष्य असावा असें दिसतें. या मुकुंदराजाचा आद्यकवि मुकुंदराजांशीं कांहीहि संबंध नाही. आद्यकवि मुकुंदराजांनी आपली गुरुपरंपरा वेगळी सांगितली आहे, व त्यांचा काळहि फार जुना आहे.

श्री.बेंद्रे यांनी उद्‌धृत केलेल्या अभंगांत मुकुंदराजाचा शिष्य म्हणून रामनाथाचा जसा उल्लेख आहे, तसा केशवाचा नाही. मग, ' याच मुकुंदराजाचा रामनाथाखेरीज आणखी एक केशव नांवाचा शिष्य होता ' ( पृ. ३२ ) असें श्री. बेंद्रे कशाच्या आधारावर म्हणतात, कुणाला

३. प्रकाशक : **जयंत भट**, पी. पी. एच्. बुकस्टॉल, मुंबई ४. पृष्ठें ५० + २४२ मूल्य–सहा रुपये.

ठाऊक ! याहीपुढे जाऊन, आत्मारामबुवा रामदासी यांनी 'दासविश्रामधामां'त ज्या केशवाचा उल्लेख केला, तो केशव म्हणजे मुकुंदराजाचा शिष्य व रामनाथाचा गुरुबंधु असलेला केशवच होय असेंहि श्री. बेंद्रे यांनी म्हटलें आहे.

या केशवाचें एक पद श्री. बेंद्रे यांनी उद्धृत केलें आहे. मलाहि 'केशवा'चीं कांही पदें उपलब्ध झालीं आहेत. त्यांपैकी एक पुढे देतों—

"मस्तकीं हस्तक ठेवूनिया वनमाळी दाखविला ।
संशय सकळहि जाळुनिपरि त्वा हरिरस चाखविला ॥
श्रीगुरुरायाहो स्वामी सद्‌गुरु राया हो ।
श्रवणे मनने अद्वय भजने हरिली माया हो ॥ १ ॥
अक्षय गतिने सम्यक स्थितिने अपार लेवविले
गुरु त्वा अपार लेवविले ।
विवर्त अघभव सारुनि पाहतां जिवविण जीवविले
श्रीगुरु० ॥ २ ॥
मंगल वदना मंगल सदना गतिविण पावविले
गुरु त्वा गतिविण पावविले ॥
केशव म्हणे मंज केशव दाउनि संमपदि नांदविले ॥
श्रीगुरु० ॥ ३ ॥ ".

'योगसंग्राम' हें परासाधनमार्गावरील एक रूपक आहे. शेख महंमदांनी 'योगसंग्रामां'त अनेकदेवतावादाचें खंडन केलें आहे.

शिवाचे हृदयीं विष्णु व्यापून । विष्णु ध्यातसे शिवालागुन
ऐसे असे दोहींचें सन्निधान । तें चंचळ भक्तास न कळे ॥
[ यो. सं. १२–३३ ]

असें शेख महंमद म्हणतात. ईश्वरास नांवें सहस्र पण ईश्वर मात्र एकच आहे. अनेक देवतांपेक्षा एका परमेश्वराचीच भावभक्ति करणें श्रेष्ठ असें शेख महंमदाचें अद्वैतनिष्ठ तत्त्वज्ञान आहे. 'योगसंग्राम' म्हणजे जिवाशिवाच्या किंवा शिवशक्तीच्या भांडणाचें रूपक. या संग्रामांत सद्‌गुरु हाच खरा मार्गदर्शक असतो, मनुष्यजन्मीं सद्‌गुरुसंगानेच मुक्ति मिळते.

सद्‌गुरुसंगें लाधलें निज गुज निकट । तेणे चारी मुक्ति दिसती हलुवट ।
चरणीं वागे येऊन वैकुंठ । रिद्धि सिद्धी दास्यत्व करिती ॥
[ यो. सं. १५–८६ ]

अशी शेख महंमदांची निष्ठा होती.

वाङ्मयीन दृष्टीनेहि प्रस्तुत ग्रंथाचें मूल्य फार मोठें आहे. आपल्याला सरस्वतीचें वरदान आहे व तिच्या आज्ञेवरूनच आपण लेखनाला 'प्रवर्तलों' असें शेख महंमद म्हणतात [ यो. सं. १७–४८ ].

भाड्याचें घोडें मनुष्यें करुनी । भ्रताराशी भेटावया चालली राणी ।
हेतु गुंतला पतीचें अनुसंधानीं । भाडेकऱ्या घोड्याची चाड नाहीं ॥
जेव्हा जाऊनी भेटली भ्रतारास । विसरली भाडेकऱ्या घोड्यास ।
तैसा स्वयें साधु भोग अलंकारास । अभोक्तेपणें असे ॥
[ यो. सं. ६–५२,५३ ]

अनुक्रमणिका

अशा सुंदर उपमा

> जळांत असता जळचर । न मानिती जळाचा आधार ।
> तळमळती बाहेर पडल्यावर । तैसे जन अंतकाळीं ॥
> रविबिंबाने वागे चराचर । नाही आराणुक न करी नमस्कार ।
> अस्तमान जल्याउपर । भांबावती वेडे ॥ [ १५-११३,११४ ]

असे दृष्टान्त, दृष्टान्तगर्भ उपमांच्या मालिका [ १४, ६१-६५ ], मनोहर व हृदयंगम रूपकें अशीं कितीतरी सुंदर व कलापूर्ण स्थळें प्रस्तुत ग्रंथांत आहेत.

प्रसंगवर्णनांत व रूपकांत तर शेख महंमदांचा हातखंडा आहे. प्रसंग १७ व १८ हीं तर विस्तृत आध्यात्मिक रूपकांचीं भावपूर्ण उदाहरणें होत. त्यांची भावप्रतीति येण्याकरिता रसिकांनी तीं मुळांतूनच वाचलीं पाहिजेत.

हितोपिती ( ८-९१ ), शिणवारुनी ( ८-३८ ), घरवारी ( ८-४९ ), पसाऱ्या ( ८-९५ ), कुटका ( १२-१०२ ), तमाम ( १७-४३ ), त्राहाटिले ( १७-९९ ), हरासू ( १७-२०५ ), पोहा ( १८-१२६ ), धांवणें काढणें ( १७-१६७ ), रिकेबी करणें ( १७-१२२ ), आंकणा घालणें (१७-२१०), असे शेख महंमदांनी योजिलेले शब्द व वाक्प्रचारहि लक्षणीय आहेत.

श्री. बेंद्रे यांनी प्रस्तुत ग्रंथ प्रसिद्ध करून साहित्यगुणांनी परिपूर्ण असलेला एक योग-ग्रंथ पाठशुद्ध स्वरूपांत रसिकांस उपलब्ध करून दिला आहे यांत शंका नाही.

मराठींतील प्रसिद्ध संशोधक श्री. अनंत काकबा प्रियोळकर यांनी संपादित केलेल्या **मुक्तेश्वरकृत महाभारताच्या आदिपर्वाचा चवथा (व शेवटचा) खंडहि**[४] इ. स. १९५९ या सालीं प्रकाशित झालेला आहे.

श्री. प्रियोळकरांनी 'मुक्तेश्वराच्या काव्याचें समालोचन व रसग्रहण आदिपर्वाच्या शेवटच्या खंडांत किंवा एका स्वतंत्र ग्रंथामध्ये करण्याचा विचार आहे' असें आश्वासन पहिल्या खंडांत दिलें होतें (पृ. ३०). म्हणून अनेक अभ्यासकांची दृष्टि प्रियोळकरांनी संपादिलेल्या या चवथ्या खंडाकडे लागून राहिली होती. पण, त्यांनी स्वतःच्या आश्वासनाने निर्माण केलेली अभ्यासकांची अपेक्षा या खंडांत पूर्ण केली नाही. 'मुक्तेश्वराच्या सभा, वन, विराट या पर्वांच्या संशोधित प्रती तयार करण्याची आमच्या कांही विद्यार्थिमित्रांची मनीषा आहे. त्या प्रती तयार झाल्यावर मुक्तेश्वरी वाङ्मयावर एक समालोचनपर स्वतंत्र ग्रंथ आम्ही प्रसिद्ध करूं इच्छितों.' असें नवीन आश्वासन श्री. प्रियोळकरांनी या खंडांत दिलें असल्यामुळे रसिकांना आपली अपेक्षा आणखी किती दिवस तशीच ठेवावी लागणार, कुणास ठाऊक! श्री. प्रियोळकरांसारख्या साक्षेपी व चिकित्सक संशोधकांनी मुक्तेश्वरासारख्या, त्यांच्या अनेक

४. प्रकाशक : डायरेक्टर, मराठी संशोधन मंडळ, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई नं. २. पृष्ठें १४ + ८२५ ते १०७२; मूल्य-पांच रुपये.

वर्षे अभ्यासविषय झालेल्या कविवर्यावर व त्याच्या वाङ्मयावर लिहिलेला ग्रंथ मुक्तेश्वर-वाङ्मयांत वैशिष्ट्यपूर्ण ठरेल यांत शंका नाही. श्री. प्रियोळकरांनी तो लवकर लिहावा मात्र. मुक्तेश्वराच्या सभा, वन, विराट (व सौप्तिक) या पर्वांच्या संशोधित प्रती तयार होण्याची वाट न पाहतां श्री. प्रियोळकरांनी हा ग्रंथ लवकर लिहून अभ्यासकांच्या अपेक्षा पूर्ण कराव्या अशी मी त्यांना विनंती करतों.

मुक्तेश्वराबद्दल लिहितांना श्री. प्रियोळकरांनी (१) 'मुद्गल' हें मुक्तेश्वराचें आडनांव नसून त्याचें मूळ नांव होतें. मुक्तेश्वर हें आपल्या आराध्यदेवतेचें नांव महाभारत रचतांना त्याने धारण केलें होतें. त्यापूर्वी तो आपली कविता 'चिंतामणिसुत मुद्गल' या नांवाने लिहीत होता; व (२) 'लीलाविश्वंभर' हें मुक्तेश्वराच्या मातापितरांचें नांव नसून तो त्रिमूर्तिरूप दत्तात्रेयाचा निर्देश आहे असे दोन मुद्दे मांडले आहेत. कै. प्रा. दत्तात्रय सीताराम पंगु यांनी प्रियोळकरांच्या प्रमेयांवर मूलभूत आक्षेपहि घेतले होते.

मुक्तेश्वर जो मी अवधूत । माझेनि नामें मुद्रांकित
कथा विस्तारीं भारत । महाराष्ट्रपदबंधीं ॥

या आदिपर्वातल्या (४४) ओवीवरून 'मुक्तेश्वर हें आपल्या आराध्यदेवतेचें नांव त्याने भारतरचनेच्या वेळीं धारण केलें होतें' असें प्रियोळकर म्हणतात, तर त्याच ओवी-वरून 'मुक्तेश्वर' हें मुक्तेश्वराचें जन्मनांव होतें असें प्रा. पंगु प्रतिपादन करतात. लीलाविश्वंभर हा मुक्तेश्वराच्या माता-पित्यांचा उल्लेख आहे असें प्रतिपादन करतांना प्रा. पंगु यांनी एकनाथांच्या व मुक्तेश्वरांच्या वंशजांकडील वंशावळींत असलेल्या 'चिंतामणि ऊर्फ विश्वंभरबोवा' या मुक्तेश्वराच्या वडिलांच्या नामोल्लेखाचा हवाला दिला असून, एकनाथांच्या वंशजांकडील वंशावळ मुक्तेश्वराच्या समाधिकाळापासून ८०-८५ वर्षांइतकी तरी जुनी असल्याचा संभव व्यक्त केला आहे. श्री. प्रियोळकर आपल्या ग्रंथांत अशा सर्व आक्षेपांचा विचार करतील अशी आशा आहे.

श्री. प्रियोळकर यांनी प्रसिद्ध केलेल्या प्रस्तुत आदिपर्वाचें महत्त्व पाठचिकित्सेच्या दृष्टीने अनन्य आहे. डॉ० सुखठणकर यांच्या नेतृत्वाखाली भांडारकर-प्राच्यविद्यासंशोधन मंदिरातर्फे प्रसिद्ध झालेल्या संस्कृत महाभारतानंतर प्रियोळकरांच्या प्रस्तुत मुक्तेश्वरी भारताचाच उल्लेख करावा लागेल. मराठीला भूषणभूत व्हावा असाच प्रियोळकरांचा हा प्रयत्न आहे.

पंचवीस वर्षांपूर्वी प्रियोळकरांनी रघुनाथपंडितांच्या 'दमयंती-स्वयंवरा'ची पाठशुद्ध संहिता प्रसिद्ध केली होती. प्रस्तुत ग्रंथाच्या चारहि खंडांत दोन छापील व अकरा हस्तलिखित प्रतींच्या आधाराने श्री. प्रियोळकरांनी मुक्तेश्वराच्या आदिपर्वाची प्राचीनतम संहिता निश्चित करण्याचा प्रयत्न केला आहे. हें काम फार जिकिरीचें पण प्राचीन वाङ्मयाच्या शास्त्रशुद्ध अभ्यासाच्या व ग्रंथकारकालीन स्थिति-गतींच्या सूक्ष्म अनुमानांच्या दृष्टीने फार मोलाचें असतें. तें अत्यंत निष्ठेने व परिश्रमाने पार पाडून श्री. प्रियोळकर यांनी प्राचीन मराठीची व विशेषत: मुक्तेश्वर-वाङ्मयाची महनीय सेवा केली आहे व नवीन संशोधकांसमोर पाठशुद्ध संपादन-पद्धतीचा एक आदर्श ठेवला आहे, यांत शंका नाही. ● ● ●

प्रा. व. दि. कुलकर्णी, एम्. ए.

# टीकावाङ्मय

यंदाचें टीकावाङ्मय विविधतेने नटलेलें आहे. अभ्यासाच्या सोयीसाठी त्याचे पाच भाग केले आहेत. ( १ ) नवसाहित्यावरील टीका. ( २ ) कांही समीक्षणें व समालोचनें. ( ३ ) साहित्य-शास्त्रीय नवविचार. ( ४ ) साहित्याचीं कांही नवीं दालनें. ( ५ ) मराठीचा जयघोष.

यादवकालापासून ते आजच्या क्षणापर्यंत मराठी वाङ्मयांत जे विशेष वाङ्मयीन प्रकार आणि टीकामूल्यें दिसून आलीं त्यांचें मोठ्या समजूतदारपणें या वर्षीं पुनर्मूल्यमापन करण्यांत आलें आहे. नवे-जुने यांच्या वादांतील कटुता बहुंशाने नष्ट झाली असून आपापल्या संप्रदायाचें किंवा नवनिर्मितीचें बलाबल जो तो मोकळेपणाने मान्य करीत चालला आहे. मराठी-वाङ्मयाच्या विकासाला ही भूमिका अतिशय साहाय्यकारक आहे. आज भाषिक राजकारण संपलें असलें तरी 'मराठी' ची प्रतिष्ठा अजून नीट ध्यानीं आलेली दिसत नाही. त्यामुळे तिच्या निष्ठापूर्वक पुरस्काराची आवश्यकताहि यंदाच्या टीका-वाङ्मयाने ओळखली आहे. जुने इतस्ततः विखुरलेले आणि उपेक्षितांप्रमाणे पडलेले कांही लेखहि संग्रहरूपाने पुढे आले आहेत, तर खास अंक काढून वाङ्मयीन मूल्यमापनाचें जबाबदारीचें व महत्त्वाचें कार्य कांही नियतकालिकांनी उरकून समयोचितता दाखविली आहे. चित्रपट-नभोवाणी-साहित्याने आपल्या अस्मितेची उपेक्षा होऊं नये अशी प्रेमळ तक्रार केली आहे. वर्धिष्णु अशा मराठी-वाङ्मयाची टीकाहि वर्धिष्णु होत चालली आहे. हें दृश्य मोठें समाधानकारक आहे.

## ( १ ) नवसाहित्याचें मूल्यमापन – पुनर्मूल्यमापन

### प्रा. श्री. के. क्षीरसागर

नवसाहित्यावर प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्याइतका मर्मभेदक हल्ला दुसऱ्या कोणत्याहि टीकाकाराने केलेला नाही. त्यांची ही भूमिका केवळ आजची नाही तर, प्रारंभापासूनची आहे. ही भूमिका केवळ विरोधकाची नाही तर निषेधकाची, धिक्कार करणाऱ्याची आहे. वास्तविक प्रा. क्षीरसागर हे जातिवंत रसिक आहेत आणि मर्मवेधी टीकाकार आहेत. तांबे, गडकरी, माधव ज्यूलियन यांच्या काव्यांतील अवीट गोडी त्यांनी मनमुराद चाखली आहे. लोकहितवादी, डॉ. श्री. व्यं. केतकर व बॅ. सावरकर यांच्या लेखनांतील जातिवंत कळवळा, द्रष्टेपण आणि प्रखर प्रतिभाविलास यांचे ते पूजक आहेत; नव्हे पुरस्कर्ते आहेत. याचमुळे आपले आपणच स्वतःला 'मराठी भाषेचे शिवाजी' म्हणवून घेणाऱ्या विष्णुशास्त्र्यांच्या लेखनांत त्यांना नकलीपणा, उसनें देशप्रेम आणि लटकें पांडित्य आढळून आलें. थोर थोर व्यक्तींच्या व्यक्तिमत्त्वाची 'सुवर्णतुला' अचूकपणे, काटेकोरपणे करणारे ते कुशल तुलाकार आहेत. असें असतांना आजच्या साहित्यांत त्यांना कांहीहि स्वागतार्ह वाटूं नये याचें सकृद्दर्शनीं आश्चर्य वाटतें. पण प्रा. श्री. के. क्षीरसागर हे

पूर्णांशाने सौंदर्यवादी ( Romantic ) आहेत. प्रेम, श्रद्धा, भक्ति, आदर, लज्जा, भीड या सद्गुणांवर त्यांची पराकाष्ठेची निष्ठा आहे. आपली सारी कुशाग्रबुद्धि या उदात्त-कोमल भावनांच्या जपणुकीसाठी ते राबवितांना दिसतात. मूळचें मधुसेवन करणारें ( Lotos-eater ) त्यांचें मन आज शूर राजपूत शिलेदारी करीत आहे. याचमुळे नीत्शेच्या 'समर्थ पुरुषा' चीहि प्रा. क्षीरसागर पूजा करतांना दिसतात. या हृदयधर्मांतूनच त्यांच्या साहित्यविषयक सर्व श्रद्धा आणि कल्पना यांचा जन्म झाला आहे. साहित्यकलेचें स्वातंत्र्य त्यांना मान्य असलें तरी जीवनावेगळी ही मासोळी जगूं शकत नाहीं हेंच त्यांना पुन्हा पुन्हा सांगावयाचें आहे. आपल्या अध्यक्षीय भाषणांत ते म्हणतात,* "औचित्यकल्पना आणि सौंदर्यकल्पना केवळ कलेच्याच मुळाशीं असतात असें नव्हे, तर नीतीच्याहि मुळाशीं असतात. ज्या समाजाच्या औचित्यकल्पना ढांसळल्या, ज्याचा सौंदर्यावरचा विश्वास उडाला, तो समाज नीति, एकता, प्रेम, स्वाभिमान यांनाहि पारखा झाल्याशिवाय राहत नाही. मानवी हृदयांत वास्तव्य करणारें सौंदर्यप्रेम हें केवळ वासनातर्पणहि नव्हे की रिकामपणची करामतहि नव्हे. मानवी संस्कृतीची वाढच मुळी सौंदर्यप्रेमांतून झाली आहे. मनुष्याच्या राहणीचा दर्जा उच्चतर होण्याला आर्थिक सुबत्ता ही केवळ सामग्री पुरविते; पण उच्चतर सांस्कृतिक पातळीची ओढ मूळ आपल्या सौंदर्य-प्रेमांत उगम पावते. स्त्री-पुरुषांच्या अंतःकरणांत वास्तव्य करणाऱ्या सौंदर्य-प्रेमांत शरीरविलासांचाच केवळ उगम आहे असें नव्हे; केवळ कलांचाच उगम आहे असेंहि नव्हे; तर दाक्षिण्य, विनय, शिष्टाचार, धार्मिक विधि, सामाजिक समारंभ यांचाहि उगम आपल्या जन्मजात सौंदर्यप्रेमांतच आहे. आपल्या भारतीय संस्कृतींतील म्हणजेच राहणींतील शुभाशुभांची आणि मांगल्याची कल्पना म्हणजे दैनंदिन आहारनिद्रादि क्रियांनाच सुंदर बनविण्याची धडपड आहे. शुभत्वाच्या आणि मांगल्याच्या कल्पनेंत आकर्षकता, उचितता आणि अर्थपूर्णता यांचें चमत्कारिक पण अपूर्व मिश्रण आहे. †**संसारासंबंधीची ही सुंदर, सार्थ आणि मंगल कल्पना म्हणजे श्रेष्ठ वाङ्मयाचा एकीकडून आधार होय, तर दुसरीकडून हेतु होय.** संसारासंबंधीच्या मांगल्यकल्पनेमुळे आपण ललितवाङ्मय लिहावयाला प्रवृत्त होतों, तर उलट ललितोदात्त वाङ्मयप्रकारांनी जीवनाला अधिकाधिक मांगल्य येत जातें......संसार-कल्पना आणि शुभत्वकल्पना या आपल्या संस्कृतींतील प्राणभूत कल्पना आहेत. †**मुळांत सुंदर आणि असुंदर, मंगल आणि बीभत्स यांचें मिश्रण असलेल्या मानवी जीवनाचा स्वीकार मांगल्याच्या वेदीवरून करणें हाच या दोन्ही कल्पनांचा उद्देश आहे.** किंबहुना ज्याला शुभत्वाची चाड असेल तोच संस्कारवान् अथवा द्विज होय; ज्याला शुभाशुभ कांहीच नाही तो शूद्र होय."

इतका दीर्घ उतारा उद्धृत करण्याचें कारण स्पष्ट आहे. साहित्य म्हणजे काय, साहित्याचा आधार कोणता, साहित्याचें प्रयोजन कोणतें, त्याच्या आविष्काराच्या पद्धति कोणत्या, जीवन आणि साहित्य यांचे परस्पराश्रयी-परस्परपूरक अविभाज्य संबंध कोणते व कसे यासंबंधींचीं प्रा. क्षीरसागरांचीं सर्व मतें या उताऱ्यांत स्पष्टपणें प्रकट झालीं आहेत. यांत 'वास्तवा' कडे डोळेझांक केलेली नाही, पण मर्त्य वास्तवांतून अमर्त्य जीवनतत्त्वांकडे जाण्याचा आग्रह आहे. याचमुळे आजचें साहित्य जें आदर्श-निरपेक्ष वास्तवाचें, अनुमानित अतिवास्तवाचें, मंगलामंगलाची मनींमानसीं चिंता न वहातां चित्रण करीत सुटतें— तें साहित्य प्रा. श्री. के.

* मिरज साहित्य सम्मेलन, १९५९, अध्यक्षीय भाषण, पृ० ९.
† जाड टाईप माझा.

क्षीरसागर यांना विकृत, कामपूजक, हताश आणि वैतागी वाटतें. या वाङ्मयांत 'प्रेम' या सर्वमान्य गुणाची वा मूल्याची धिंड काढली जात आहे; हळुवारपणा, संयम आणि औचित्य यांचा तिटकारा केला जात आहे; उत्तानपणा, निलरपणा, उद्धटपणा, संकोचशून्यता या सर्व दुर्गुणांना शौर्याचें आणि बंडखोरीचें पद दिलें जात आहे; जीवनांतील सौंदर्य, अर्थ व औचित्य यासंबंधींची अश्रद्धा प्रकट केली जात आहे; या अश्रद्धेचा विषाद न वाटतां तिच्याबद्दल एक प्रकारचा अमंगल उत्साह वाटत आहे; मूल्यनाशाच्या म्हणजेच बीभत्सतेच्या चित्रणांत हळहळ वाटत नसून 'श्रुतं श्रोतव्यम्' म्हणून कृतकृत्यता व्यक्त करणाऱ्या कामातं दुष्यंताची तृप्ति दिसून येत आहे; एक स्वयंभू, उनाड आणि चैनी निराशावाद येथे वळ करून राहिला आहे; थोडक्यांत *आजच्या वाङ्मयीन संप्रदायांत '**सौंदर्याचा अभाव आहे असें नव्हे, तर सौंदर्याच्या आकांक्षेचाच अभाव आहे; जुगुप्सा ही या संप्रदायाची प्रेरणा आहे, तर औचित्यभंग हें त्याचें सवंग आणि ग्राम्य असें तंत्र आहे**' असें प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचें निश्चयपूर्वक मत झालेलें आहे.

### प्रा. गंगाधर गाडगीळ

खरें पाहतां आजच्या मराठी नवसाहित्यामागील मूळ प्रेरणा व तिच्या-संबंधींचें तत्त्वज्ञान तत्त्वतः कलेचें स्वरूप अधिक शुद्ध, समर्थ आणि विकासक्षम बनविणारें आहे, याबाबत †प्रा. गंगाधर गाडगीळ यांचीं मतें पुन्हा एकदा पाहण्यासारखीं आहेत. ते म्हणतात, "नवकथा म्हणजे कांही जुन्या कथेच्या शेजारीं काढलेलें एक छोटेसें वर्तुळ नव्हे. नवकथा हें एक मोठें वर्तुळ आहे. जुन्या कथेचें वर्तुळ हा या मोठ्या वर्तुळाचा लहानसा भाग आहे. जुन्या कथेचें वर्तुळ लहान होतें, इतकेंच नव्हे तर, चुकीच्या मध्यबिंदूच्या-भोवती तें आखलेलें होतें. साहित्य आणि लघुकथा याविषयींच्या चुकीच्या कल्पनांवर जुनी कथा आधारलेली होती. याउलट नवकथा ही कथा आणि साहित्य याविषयींच्या अधिक शुद्ध आणि व्यापक कल्पनांवर आधारलेली आहे." आणि हें सिद्ध करण्यासाठी कथानक, नाट्यपूर्ण घटना, व्यक्तिचित्रें, काव्यात्मकता आणि तत्त्वचिंतन या जुन्या कथेंत प्रामुख्याने व महत्त्वपूर्णतेने दिसून येणाऱ्या गोष्टींचा नवकथेने अव्हेर न करतां त्या अधिक व्यापक आणि लवचिक कशा बनविल्या आहेत हें प्रा. गाडगीळ यांनी दाखवून दिलें आहे.

तत्त्वतः हें कोणीहि अमान्य करणार नाही. पण तत्त्व जेव्हा व्यवहारांत उतरतें तेव्हाच त्याची श्रेष्ठता व शक्ति मान्य होते. आजचा वाङ्मयीन व्यवहार आजच्या वाङ्मयीन तत्त्वज्ञाना-इतका विशाल, व्यापक, मूलगामी व भेदक नाही, हें दृष्टिगोचर सत्य आहे. आजच्या तात्त्विक प्रतिज्ञेचें जर आजच्या साहित्याला पालन करावयाचें असेल तर त्याला अनेक मुखांनी, अनेक वाटांनी जीवनाकडे धाव घ्यावी लागेल. आजचा साहित्याचा तपशीलच असा आहे की तें एकांगी वाटावें.‡

### श्री. वि. स. खांडेकर

"दुर्बल, विफल, पराजित मनुष्य हाच आपला मानदंड तें मानीत आहे.... चिरंतन मनुष्य चित्रित करतांना मनुष्यांतल्या सनातन सौंदर्याचें, सामर्थ्याचें आणि साधुत्वाचें विस्मरण त्याला होत आहे.... एका डोळ्याने आपल्यामध्ये संपूर्ण विश्व पाहणारा, तर दुसऱ्या डोळ्याने

* जाड टाईप माझा.

† 'मनोहर', रौप्य-महोत्सव-विशेषांक, ऑक्टोबर १९५९ मधील 'नवकथा—स्वरूप व आक्षेप' हा लेख.

‡ मिरज साहित्य सम्मेलन १९५९, स्वागताध्यक्षांचें भाषण, पृ० १९-२०.

या विश्वसागरांतला एक चंचल तरंग म्हणून स्वतःकडे बघणारा मानव हा **चिरंतन मनुष्य** आहे.तोच ललित-साहित्याचा केन्द्रबिंदु आहे....या चिरंतन मानवाच्या उत्कट अनुभूतींतून... जें संगीत बाहेर पडेल तेंच **अमर साहित्य** होईल.'' याची जाणीवच आजच्या साहित्यिकांना नसल्याने त्यांचीं वैफल्याचीं चित्रें हीं केवळ एकांगी आणि दुबळीं होतात, एवढेंच नाही तर तीं शोकांतिकेची उंची गाठूं शकत नाहींत असें श्री. वि. स. खांडेकर मोठ्या खेदाने म्हणतात.*

ही अपेक्षा कलावंताची दृष्टि, कलेचे विषय आणि अभिव्यक्तीच्या पद्धति यांवर नसते निर्बंध लादीत नाही, उलट कलावंताची दृष्टि अनंतासह एकाग्र बनविते; तिला योग्य ती त्रिमिति, चतुर्मिति प्राप्त करून देते. हा नीतिवाद किंवा आदर्शवाद नाही. कलेचें स्वातंत्र्य पूर्णपणें मान्य केल्यानंतर ती विशिष्ट क्षेत्रांतील सौंदर्यच तेवढें कां पाहते ! जीवनाचा सर्व-समावेशक आलोक या स्वतंत्र कलेने कां घेऊं नये हाच खरा येथे सवाल आहे. 'केवळ आदर्शांचें चित्रण करायचें बंधन घालून घेतल्यामुळे,आपल्या बहुतेक जुन्या वाङ्मयांत जसा एकांगी-पणा आला, तसाच दुसऱ्या प्रकारचा एकांगीपणा या नव्या वास्तवाने निर्माण केला आहे' असें म्हणणारे श्री. वि. स. खांडेकर यांची दृष्टि खचित एकांगी नाही. 'कला स्वतंत्र आहे' याचा 'सर्वदृष्टया बेछूटपणा' असा विपरीत अर्थ केला गेल्याने मूळ तत्त्वालाच गिळून टाकणारा तपशील—आणि तोहि केवळ मनोविश्लेषणाच्या आणि त्यांतहि विकृतवासनांच्या प्रदर्शनांत—इतका माजला की थोर थोर सहृदय टीकाकारांनाहि नवसाहित्यावर टीकास्त्र सोडावें लागलें, आणि प्रा. क्षीरसागर यांच्या लेखणीला तर अग्नीच्या जिभा फुटल्या.

**प्रा. रा. श्री. जोग**

प्रा. रा. श्री. जोग हे या टीकाकारांपैकी एक ज्येष्ठ टीकाकार होत. त्यांच्या दृष्टीचा समतोल सहसा सुटत नाही आणि लेखणीचा संयम ढळत नाही. त्यांनाहि † मुख्यार्थाची वकिली पत्करून त्याची कैफियत मांडावी लागली. नवसाहित्यांतील केवळ माऱ्याच्या जागा हेरून त्यांनी त्यावर केलेला हा हल्ला नाही. सरळ समोर उभें राहून केलेलें हें धर्मयुद्ध आहे. त्यांच्या व्याख्यानांतील कांही वचनें खाली देत आहें.

'नव-वाङ्मयांतील दुर्बोधता ही जशी आता स्थिरपद झाली आहे, तशी तीबद्दलची तक्रारहि कायम झाली आहे....तेव्हा नववाङ्मयनिर्मिति करणारांनी प्रस्तुत आक्षेपाचें अस्तित्वच नाही अशा झोकांत यापुढे तरी राहूं नये' (पृ० ४) ...'साधारणपणें सुबोध लिहिणारे कवीहि आपल्या कवितेंत थोडीशी दुर्बोधता आणण्याचा प्रयत्न करूं लागलेले दिसतात' (पृ० ५) ... 'कांहीजणांना नवकाव्य व नववाङ्मयांतील दुर्बोधतेचें अस्तित्व मान्य होतें, परंतु त्यामुळे येणारा दोष पदरांत घ्यावयाची मात्र तयारी नसते' (पृ. ५)...'' दुर्बोधता हें 'भूषणं, न तु

* ही तक्रार फार जुनी आहे. पुरोगामी साहित्यासंबंधी बोलतांना आचार्य जावडेकर यांनी ती केली आहे. तिला अजून कलेने कृतीने उत्तर दिलेलें नाही. डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे यांचीहि तक्रार हीच आहे. फार काय शेक्स्पियरसारखा महाकवीहि सर्वार्थाने जीवनाचा भाष्यकार आहे असें आपल्या प्रत्ययास येत नाही अशी त्यांची विद्युद्धक्का देणारी तक्रार आहे. 'राज-विद्या' या त्यांच्या निबंधसंग्रहांतील 'साहित्यांतील आत्माविष्कार' आणि 'शेक्स्पियर-जीवनाचा भाष्यकार' हे निबंध पाहावेत.

† मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ६१ व्या वार्षिकोत्सव-प्रसंगींचें अध्यक्षीय भाषण— 'मुख्यार्थाची कैफियत अथवा दुर्बोधतेची मीमांसा'—प्रा. रा. श्री. जोग.

दूषणम् ' अशी भूमिका कांहीजण घेतात" ( पृ. ५ ). ' प्रसादपूर्ण म्हणजे पारदर्शी असें कुत्सापूर्वक म्हणून इरेस पडलों तर अशीं पारदर्शी काव्यें आपणहि लिहून दाखवूं असेंहि आव्हानपूर्वक म्हटलें गेलें आहे ' ( पृ. ६ ). ' जें सुबोध तें उथळ, जें दुर्बोध तें गहन ' हें नवें समीकरण बनलें आहे ' ( पृ. ७ ) ... या वचनांवरून प्रसादगुणास किती वाईट दिवस आले आहेत तें स्पष्ट होतें, तसेंच दुर्बोधतेचें तत्त्वज्ञान कसें बनलें आहे हेंहि ध्यानीं येतें.

"काव्यांतील आशयापेक्षा त्यांतील प्रतिमानांनाच विशेष महत्त्व असल्यासारखें वागणें, आशयाची अभिव्यक्ति नीटपणें होण्यास आवश्यक असणाऱ्या परिश्रमांना तुच्छ लेखून त्यांचा कारागिरी या नांवाने अधिक्षेप करणें, अर्थविसंगति असली तरी भावसंगति असली म्हणजे झालें असें म्हणून, खरोखरच्या विसंगतीस मान्यता देणें व संगति ही कृत्रिम आणि विसंगति ही स्वाभाविक ह्या सिद्धान्ताच्या जोरावर तिचें समर्थन करणें; आत्मनिष्ठेचा कांही चमत्कारिक अर्थ करून जसें भासेल तसेंच व्यक्त करण्याचा अट्टाहास धरणें, ह्या गोष्टींनी दुर्बोधता जेवढी पोसली गेली आहे, तेवढी ती कवीच्या अंगच्या दोषांमुळेहि आलेली नाही " ( पृ. ६ ). या गोष्टीचें तत्त्वज्ञान झाल्यामुळे खरें भय निर्माण झालें आहे. म्हणूनच प्रा. रा. श्री. जोग 'दुर्बोधतेची मीमांसा ' करण्यास सिद्ध झाले. ' आजचें कवितारूप बालक हें अपुऱ्या दिवसांचेंच जन्मास येतें; हें अपरिहार्य आहे काय ? कवींच्या प्रतिभेचीं गर्भाशयें हीं अशीं अधू झालेलीं असतात काय ? अशी कोणती निकड आहे की अशी अर्वाकची निर्मिति झालीच पाहिजे ? ' ( पृ. १० ). " काव्यनिर्मितींत कवीच्या दृष्टिकोणांत इतरेजनांमध्ये आढळून न येणारा असा तिरकसपणा ( oblique ) असतो. पण हें नवें नाही. यालाच 'वक्रोक्ति' असें म्हणतात; ती विदग्ध जनांच्या बोलण्याची तऱ्हा होय; पण काव्याचा आत्मा ती नव्हे. ... वक्रोक्तीची मर्यादा विदग्ध वाचकालाहि लेखन दुर्बोध होऊं नये येथपर्यंतच मानावी लागेल"... (पृ. १२). ...' लक्ष्यार्थ हा एक तऱ्हेचा वक्रार्थच. आज गौणी लक्षणा, सारोपा लक्षणा सोडून साध्यवसाना लक्षणेचाच म्हणजेच रूपकातिशयोक्तीचाच वापर फार...त्यामुळे कविता एखाद्या* कोड्यासारखी वाटते '...( पृ. १४ ). ' लक्षणेचा आणखी एक प्रकार ( Transferred Epithet ) होय'....शिवाय एका इंद्रियाने ग्राह्य अशा धर्माचा आरोप दुसऱ्या इंद्रियाने ग्राह्य अशा वस्तूवर करण्याची प्रथा याची तींत भर....उदा०–वर्णाचीं गंधवादळें–लालजांभळी इ० ( पृ. १५-१७ ). उफराटे शब्दप्रयोग. उदा०नाही वाऱ्याचें पान इवलेंहि गतीला (पृ. १७ ). संकीर्ण लक्षणा किंवा प्रतिमानसंकर ( पृ. १८-१९ वरील संपूर्ण विवेचन मुळांतूनच वाचावें ). अर्थचमत्कृति वर्णानुप्रासावर अवलंबून ठेवण्याची हे प्रवृत्ति ( पृ. २० ), विरोधाचा अकारण वापर ( पृ. १९ ), गेयतेचें उच्चाटन ( पृ. २३ ), शीर्षक न देण्याची प्रथा ( पृ. २४ ), या सर्व क्लृप्ति योजून केलेलें काव्य म्हणजे शब्दांची किमया टरून अर्थाला त्यांच्यामागून जुळेल तसें धडपडत, अंग खरचटत, विव्हळत जाण्याची पाळी आली आहे असें प्रा.रा.श्री. जोग यांचें प्रतिपादन आहे.†

---

* '( सुबोधतेची अपेक्षा धुडकावल्यामुळे ) काव्य हें एक ( बक्षीस नसलेलें ) शब्दकोडें होणें अपरिहार्य होतें'–कुसुमाग्रज. 'आजकालची कविता'– ' मनोहर ' रौप्यमहोत्सव विशेषांक, ऑक्टोबर १९५९.

† या सर्वाला श्री. ग. दि. माडगूळकर ' हेंगाडी कथनपद्धति ' असें म्हणतात; व हें सारें कवित्व ' आप लिखे और खुदा बाचे ' या जातीचें आहे असें सांगून ' साहित्यकारांची ही एक पिढीच्या पिढी भलत्या रस्त्याला लागली ' असा त्यावर त्यांचा शेरा आहे. 'ग्रामीण

एकसंध प्रतिपादनाची पद्धति टाळून रचनाकौशल्याचा दोष स्वीकारूनहि मूळ विधानें अलग अलग रीतीने पण क्रमवार मांडलीं तीं एवढ्याचसाठी की प्रा.रा. श्री. जोग यांचें मूळ व्याख्यान इतकें शास्त्रीय पद्धतीने मांडलें गेलें आहे की, त्याच्या अर्थास कोठे धक्का बसूं नये. या व्याख्यानांत केवळ नवकाव्याची आविष्कारपद्धति व शैली यांचाच परामर्श घेतल्यासारखें प्रथमदर्शनीं वाटतें; पण ' आशय व अभिव्यक्ति भिन्न असतात ' या न्यायाने ही टीका अंतरंगालाहि लागू आहे. आजची काव्याची आविष्कारपद्धति अपरिहार्य आहे हें शास्त्रशुद्ध पद्धतीने व सोदाहरण सिद्ध तरी केलें पाहिजे किंवा हे दोष मुकाट्याने मान्य तरी केले पाहिजेत अशी आता परिस्थिति निर्माण झाली आहे. शिवाय रचनापद्धतींत, शैलींत जें अगदी वेगळें व अपूर्व वाटत होतें व म्हणून अफाट चमत्कृति साधल्याचा आनंद होत होता तें सारें जुनेंच आहे, नव्हे, जुनें पण काव्यार्थाच्या वहनास फारसें साहाय्यभूत न होणारें असेंच होतें हेंहि आता उघडकीस आलेलें आहे. यामुळे " आशय आणि त्यांचीं प्रतिमानें, मुख्यार्थ व तो सजविण्यासाठी आणलेला लक्ष्यार्थ यांपैकी काय अधिक महत्त्वाचें ह्याविषयी कवि आणि वाचक ह्यांच्या मनांत सध्या जमीनअस्मानाचें अंतर पडल्यासारखें दिसत आहे. आज आशय बिचारा प्रतिमानांच्या गर्दींत एका विंगमधून येऊन त्यांच्या आडूनच दुसऱ्या विंगमध्ये अंतर्धान पावतो. ही व्यंजनेची विडंबना आहे .... यजमानाच्या घरीं पाहुण्यांनीच धुडगूस घालावा, त्याप्रमाणे मुख्यार्थाच्या घरीं प्रतिमानांनीच धमाल उडवून दिली आहे. प्रतिमानें हीं मुख्य आशयाची शोभा वृद्धिंगत करण्याऐवजीं त्यांच्या चमत्कृतीखाली आशयच बिचारा अवघडल्यासारखा वावरत असतो .... " असें सांगून प्रा. रा. श्री. जोग म्हणतात, " भय वाटतें तें दुर्बोधतेपेक्षाहि चमत्कृतीचें; कारण आजच्या कवितेचें लक्ष कविता रसपूर्ण करण्याऐवजी ती चमत्कृतिपूर्ण कशी होईल इकडेच असतें. हें टाळावयाचें असेल तर सूक्ष्म विचारांपेक्षा जरा स्थूल परंतु उत्कट भावनेला जागा द्यावयाला पाहिजे."

प्रा. रा. श्री. जोग यांच्या प्रतिपादनांतील बारीक-सारीक तपशिलासंबंधी मतभेद व्यक्त करतां येईल, पण त्यांतील मुख्य विधानासंबंधी दुमत होऊं नये, होणार नाही असें वाटतें.

### आणखी कांही मतें

नवसाहित्याच्या या अंतर्बाह्य विच्छेदनाचा अर्थ असा नव्हे की, नवसाहित्यांत स्वागतार्ह असें कांहीच नाही. श्री. वि. स. खांडेकर, प्रा. रा. श्री. जोग* यांच्या मनांत अधिक्षेपबुद्धि नाही. † ' नवकवितेचे तावूत थंड झाले आहेत ' असें म्हणणाऱ्या श्री. ग. दि. माडगूळकरांनीसुद्धा नवकवींनी जी अबोध, त्रुटित व भांबावलेली कविता केली त्याबद्दल त्यांना अपराधी मानलेलें नाही; त्यांना ' माथेफिरू पोर ' म्हटलें, पण दोष त्या 'बापड्यांना' न देतां ' विस्कटलेल्या परिस्थितीला ' दिला आहे. ह्या विस्कटलेल्या परिस्थितीची जाणीव श्री. वि. स. खांडेकर यांनाहि आहे. त्यांनी तर नवसाहित्यिकांची सुदीर्घ नामावली देऊन

---

शालींत दणकावून दिलेलें तसें एक भाषण ' म्हणून हें भाषण वाचण्यासारखें आहे—अध्यक्षीय भाषण, म. वा. परिषद्, बडोदें, अधिवेशन २३ वें, डिसेंबर १९५९.

* प्रा. श्री. के. क्षीरसागर यांना मात्र नवसाहित्यांत कांहीच स्वागतार्ह वाटत नसावें असें दिसतें. नवसाहित्याकडे गुप्त समाजरोगाचें दृश्य लक्षण म्हणून ते पाहतात. असें कां याचें लेखारंभीं केलेलें विवेचन पाहावें.

† म. वा. परिषद्, बडोदें, १९५९, अध्यक्षीय भाषण.

त्यांचा समुच्चयानें गौरव केला आहे. ते म्हणतात,* " यांपैकी कित्येकांच्या लेखनांत प्रतिभेचा श्रेष्ठ प्रतीचा विलास आहे; वास्तवाचें सूक्ष्म स्वरूप आहे; जीवनाचें भेदक व वेधक दर्शन घेण्याचा कांहींनी यशस्वी प्रयत्न केला आहे. या साहित्यकारांत भैफलीची धुंदी निर्माण करणारे शैलीकार आहेत; डोंगरांत लेणें खोदावें त्याप्रमाणे विशाल अनुभूतींतून सुंदर लघुकथा निर्माण करणारे कलावंत आहेत; ढगांच्या पायघड्यांवरून मिरवीत जाणाऱ्या विमानाप्रमाणे ज्यांची कल्पकता स्वैरसंचार करूं शकते असे समर्थ लेखक आहेत. ' क्ष ' किरणांनी शरीरांतला दोष क्षणार्धांत दाखवावा, त्याप्रमाणे जीवनांतल्या सूक्ष्म विसंगतीवर अचूक बोट ठेवणारे विचारवंत आहेत–" असें असूनहि ललित साहित्याचा आजचा वाचक थोडाफार असमाधानी कां आहे याच तळमळीने नवसाहित्याची त्यांनी फेरतपासणी केली आहे असें वाटतें. नवसाहित्यनिर्मितीमागील प्रेरणा मुळांत पूर्वीच्या प्रेरणांपेक्षा कशा अधिक शुद्ध, सकस, व्यापक व लवचिक आहेत तें † प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या टीकालेखांतून व ‡ प्रा. गाडगीळ यांच्या प्रत्युत्तरात्मक निवेदनांतून दिसून येतें.

## प्रा. दि. के. बेडेकर

"नवसाहित्यांत टिकाऊ असें कांही नाहीच असें नाही. आजच्या साहित्यांतील सारेंच सरस-नीरस, वाङ्कळ-हिणकस साहित्य आपणांस उपलब्ध असतें त्यामुळे त्याच्यावर थोडा जोराचा हल्ला होतो. जुन्यांतील जें टिकाऊ ठरलें तेवढेंच आपल्या नजरेसमोर येतें. कालांतरानें नवीनाच्या बाबतींतहि असेंच होईल आणि हा टीकेंतील तिखटपणा लोपून जाईल. पेंडसे, गोखले, व्यंकटेश माडगूळकर, गाडगीळ, भावे प्रभृति आजच्या यशस्वी लेखकांच्या यशाचें कारण त्यांनी §**आपापल्या परीनें व कलानें** खऱ्याखुऱ्या मानवी मनाचें चित्र आपल्यापुढे ठेवलें आहे. अशा कांही लेखकांच्या कथा वाचतांना आपल्या भोंवतालच्या वावरणाऱ्या माणसांचें मन जास्त कळल्याचा अनुभव येतो.......मानवी अनुभवांना प्रत्यक्ष करण्याचें हें सामर्थ्य कथा-कादंबऱ्यांप्रमाणे कांही कवितांतून, चरित्रांतून व प्रवासवर्णनांतूनहि आज आढळतें. आजच्या मराठी साहित्यांत ही प्रवृत्ति प्रबळ होत आहे हें खरें, पण अजून पाश्चात्य वाङ्मयाचें सामर्थ्य आपल्या वाङ्मयांत आलेलें नाही. तें येण्यासाठी ' मानवी प्रत्यक्षा'ला डावलण्याचें टाळलें पाहिजे, बरीच वस्तुनिष्ठ दृष्टि व आकलनशक्ति अंगीं असावयास हवी" × हे प्रा. दि. के. बेडेकर यांचे विचार अनुभवप्रमाण आहेत. " साहित्यानें जर आजच्या 'मानवी प्रत्यक्षा'ला प्रामाणिक व उत्कट तऱ्हेने चित्रित केलें, भ्रम व प्रेषितपणाचा आव टाकून दिला आणि वादांचीं अवडंबरें बाजूला सारलीं, तर अशा साहित्यांतून आमचें मनोरंजनहि होईल व आमच्या जगण्यांतला अर्थ पाहणेंहि आम्हाला थोडें सोपें जाईल."+ ही एवढीच

* मिरज साहित्यसम्मेलन, १९५९, स्वागताध्यक्षीय भाषण.

† प्रा. वा. ल. कुलकर्णी—'वाङ्मयीन दृष्टि आणि दृष्टिकोण' पृ.६१, पृ. ११८ ते १२७.

‡ 'मनोहर' रौप्यमहोत्सव अंक, ऑक्टो. १९५९.

§ जाड टाईप माझा.

× ' आजच्या साहित्यिकांकडून माझ्या अपेक्षा '–प्रा. दि. के. बेडेकर–' मनोहर ' रौप्य-महोत्सव अंक, ऑक्टोबर १९५९.

+ " व्यंकटेश माडगूळकरांनी लिहिलेल्या कथा खऱ्या अर्थाने ग्रामीण आहेत; पण त्यांतील ग्रामजन पंचवीस वर्षांच्या पूर्वीचे आहेत. आता खेडीं पार बदललीं आहेत.

अपेक्षा त्यांनी साहित्याकडून केली आहे. पण ही अपेक्षा पूर्ण करण्यासाठी 'मानवी मनांतील सुष्ट व दुष्ट प्रवृत्ति, उघड व सुप्त प्रेरणा आणि जीवनाच्या अनेकविध व्यापारांतील खरीखुरी गुंतागुंत यांच्यावर सारखी नजर खिळविली पाहिजे !' नवसाहित्यावर विरोधी टीका करणाऱ्यांनी हाच विचार प्रकृतिभेदाप्रमाणे कडू-गोड शब्दांत, तीव्र-सौम्य आवाजांत मांडलेला आहे.

**श्री. धों. वि. देशपांडे**

वादाची रणधुमाळी आता बरीच संपली आहे. जें नवें तें सारेंच गोमटें व जुनें तें खोटें ही प्रवृत्ति आता उरलेली दिसत नाही. 'या संप्रदायांतहि धान्याबरोबर तूस आढळतें, त्यासंबंधी न बोललेलें बरें' ही भूमिका घेऊन मगच श्री. धों. वि. देशपांडे* 'नवकाव्याची ओळख' करून देतात. विचार किंवा भावना यांतील लय-संगति साधण्याचा प्रयत्न, तिची परिवर्तनाक्षम अचूक रचना, शब्दांच्या आशयानुषंगी अनिवार्यतेकडे पुरविलेलें लक्ष, अभिव्यक्तीच्या नवपद्धति हीं नवकवितेचीं व्यवच्छेदक लक्षणें त्यांनी उदाहरणें देऊन स्पष्ट केलीं आहेत; तिचें सौंदर्य व सामर्थ्यहि व्यक्त केलें आहे. पण त्याचबरोबर 'आमच्या अनुभूति नव्या आहेत, म्हणून आमचें काव्य नवें आहे' हा नवकवींचा दावा खोटा कसा आहे हेंहि त्यांनी दाखविलें आहे. या भ्रामक समजुतींतूनच नवकाव्यांतील विकृति जन्म पावते असें त्यांनी आपलें मत मांडलें आहे. तसेंच 'अभिव्यक्तीच्या नवनव्या पद्धति ज्या वेळीं भावमूल असतात, त्या वेळीं त्यांच्याबद्दल फारशी ओरड होत नाही.पण कांहीं वेळां हे नवे संकेत व अलंकार बौद्धिक प्रक्रियेचीं कसरतींचीं अपत्यें असतात. या वेळीं त्यांची कुचेष्टा होते; कारण त्यांत केवळ प्रदर्शनलिप्सा असते. ही लिप्सा नवकवितेंत जागोजागीं सुप्त प्रमाणांत विखुरलेली आहे'...हेंहि श्री. देशपांडे यांनी स्पष्टपणें नमूद केलें आहे; 'आम्ही आंतर्दर्शी आहोंत हा नवकवींचा दावा नसल्याचें'हि ते लिहितात.

**श्री. विजय तेंडुलकर**

आता नवनाट्यासंबंधी "केवळ नाट्यरचना, संवाद, व्यक्तिरेखन, तांत्रिक उपकरणांचा वापर यांतल्या अत्याधुनिकतेवर आजचें नाटक 'नवा प्रयोग' ठरत नाही, तर या साऱ्या अंगांतून तें व्यक्त करतें तो आशय कितपत वेगळा, सखोल आणि अस्सल आहे त्यावर 'नवा प्रयोग' म्हणून त्याची योग्यता जोखली गेली पाहिजे..."असा † श्री. विजय तेंडुलकर यांचा 'नवप्रयोगासंबंधीचा अभिप्राय आहे. नवा आशय म्हणजे काय यासंबंधी ते लिहितात, "जीवन आणि त्याचा आशय या इतक्या विराट् आणि वाहत्या गोष्टी आहेत की त्यांचे माणसागणिक आणि निमिषागणिक प्रत्यय वेगवेगळे आणि नवनवीन. हे प्रत्यय अधिक मूलगामी स्वरूपांत आणि स्पष्टपणें पाहण्यासाठी, टिपण्यासाठी व व्यक्त करण्यासाठी अशा अनेकानेक प्रत्ययांतूनच कलावंत घडवितात त्या पद्धतीहि विविध, नवनवीन. मूळ प्रत्यय आणि तो ग्रहण करून मांडण्याची पद्धत अशा मेळांतून नवा, वेगळा आशय प्रकट होत असतो." आपल्या मताच्या

---

स्वातंत्र्योत्तर काळांतलें खेडें कुणीहि रेखाटलेलें दिसत नाही. पेंडसे यांचे अफाट वापू ,सपाट बापू जुने आहेत. दांडेकरांची पडघवली ऐतिहासिक आहे."–ग. दि. माडगूळकर, म. वा. परिषद्, बडोदें.

या मताचा वरील संदर्भांत विचार व्हावा.

* 'मनोहर' रौप्य-महोत्सव अंक, ऑक्टोबर १९५९–'नवकाव्याची ओळख'

† किता– 'मराठी रंगभूमीचीं नवीं लेणीं.'

पुष्ट्यर्थ ते सांगतात की ' वेड्याचें घर उन्हांत ' या नाटकांतल्या प्रकाश-योजनेच्या कसरती हा नवाप्रयोग नव्हे तर तऱ्हेवाईक मध्यवर्ती व्यक्तिरेखेच्या मनोविश्लेषणाचा त्यांतला अयशस्वी प्रयत्न हा नवा प्रयोग." श्री.तेंडुलकरांची ही दृष्टि निस्संशय नवनाट्याच्या विकासाला साहाय्यकारी ठरेल. नवनाट्याची वाढ नवकाव्य आणि नवकथा यांच्याइतकी बेसुमार झालेली नाही. कारण येथे प्रत्यक्ष प्रेक्षकांशीं प्रसंग आहे. मात्र नवनाट्याला आताच कोठे बाळसें येत असतांना त्यांतील नीरसतेचें, दुर्बोधतेचें खापर बहुंशीं प्रेक्षकांच्या माथीं मारण्याची 'नवकवी'-प्रमाणे घाई करूं नये असें वाटतें.

* " साहित्यांतल्या नव्या प्रवृत्ति मराठी वाङ्मयाच्या आता हाडींमासीं खिळल्या आहेत; त्या दृढमूल झाल्या आहेत. त्यांच्याहून सामर्थ्यवान् आणि व्यापक अशा नव्या प्रवृत्ति साहित्यांत जोंपर्यंत निर्माण होत नाहीत तोंपर्यंत त्यांना कसलाच धोका राहिलेला नाही, " या प्रा. गंगाधर गाडगीळ यांच्या विधानांत जबर आत्मविश्वास असला तरी आत्मसंतुष्टता नसावी असें वाटतें.†

## ( २ ) साहित्य-समीक्षेची नवी दृष्टि व नवीं परीक्षणें

### प्रा. रा. श्री. जोग यांची ' वाङ्मयीन अभिरुचि '

पुणें विद्यापीठाच्या विद्यमाने जी पहिली कै. न. चिं. केळकर-स्मारक-व्याख्यानमाला प्रा. रा. श्री. जोग यांनी गुंफिली ती पुस्तकरूपाने प्रकाशित झाली आहे. प्रा. जोग अर्वाचीन मराठी साहित्यावर ज्या अधिकाराने, साक्षेपाने, समतोलवृत्तीने आणि कांटेकोरपणें बोलूं शकतात, तितक्याच अधिकाराने, साक्षेपाने, समतोलवृत्तीने आणि कांटेकोरपणें प्राचीन मराठी साहित्यावरहि बोलूं शकतात. त्यांचें सहृदयत्व आणि समीक्षाबल कालमर्यादित नाही. मराठी साहित्याचें ते केवळ अवेक्षण करीत नाहीत तर ' पर्यवेक्षण-परीक्षण ' करतात. संस्कृत काव्यशास्त्राला अभिनव रूप देऊन त्या प्रकाशांत ते साहित्याचें अंतर्बाह्य रसग्रहण आणि मूल्यमापन करतात. त्यांची वाङ्मयीन दृष्टि जितकी सूक्ष्म तितकीच विशाल आहे; त्यांची वाङ्मयीन टीका निर्भय आहे पण उद्धट नाही; कारण ' औचित्य ' आणि 'दाक्षिण्य' हे त्यांचे स्थायीभाव आहेत. प्रा. रा. श्री. जोग ' प्रतिक्षेमेन्द्र ' वाटतात. ज्ञानेश्वर-कालापासून ते केळकर-कालापर्यंत वाङ्मयाभिरुचींतून केलेलें मराठी वाङ्मयाचें परीक्षण त्यांची स्वतःची थोर अभिरुचि व्यक्त करणारें आहे. सदभिरुचिसंपन्न वाङ्मयीन टीकेचा हा एक स्वतंत्र नमुना मोठा स्पृहणीय आहे.

---

* " हे आजचे लघुकथाकार इंग्रज कथाकारांबरोबर पैज जिंकतील किंवा रशियन कथाकारांशीं होड खेळतील अशी पैज मी मारीत नाही; पण 'काणेकर-जिब्रान-महाकवित्व' ही मराठी मायेंतील ( = वाङ्मयांतील ) सुरस आणि चमत्कारिक कथा आणि तिचें तात्पर्य आठवलें की तशी पैज मारणेंहि शक्य आहे, असा विश्वास वाटतो ! "—प्रा. स. गं. मालशे–' आवडनिवड, ' पृ. ६०.

† प्रा. गाडगीळ यांचें वरील विधान, प्रा. दि. के. बेडेकर यांचीं मागे निर्दिष्ट केलेलीं मतें व प्रा. मालशे यांचें हें मत परस्परांशीं तोलून पाहावें. ' मराठी नवकथेच्या मर्यादा,' ' मराठी कादंबरी : काल आणि आज ' या प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या दोन लेखांचा परामर्श गेल्या वर्षीच्या ' टीका-समालोचनांत ' घेण्यांत आला होताच.

"मराठी वाचकवर्गाने प्रत्यक्षपणें प्रकट केलेल्या अभिप्राय-वाङ्मयाचा अभाव असल्याने आणि वाङ्मयसेवकांनीहि प्रकट केलेले विचार अल्प आणि फारसे उपयुक्त नसल्याने, मराठी लेखक हेच मराठी समाजाचे प्रतिनिधि समजून व त्यांचें वाङ्मय त्यांच्या अभिरुचीचें गमक समजूनच मराठी वाङ्मयाभिरुचीचा विचार करणें शक्य आहे ..." असा विचार मांडून प्रा. जोग पुढे म्हणतात, "अभिरुचीचा खरा आविष्कार ललितवाङ्मयांत होतो; प्रतिभा असली किंवा संतत्व असलें म्हणजे अभिरुचि असतेच असें नाही. कोणत्याहि गोष्टीस झालेली स्वाभाविक विचारपूर्वक प्रतिक्रिया हें अभिरुचीचें मूल स्वरूप आहे. अभिरुचीच्या विकासांत संस्कारांचा फार मोठा भाग आहे. औचित्यविवेक हा अभिरुचीचें प्रधान निदर्शक होय." औचित्यविवेकाच्या अनेकविध रूपांचें स्पष्टीकरण करून त्याअन्वयें प्रा. रा. श्री. जोग मराठी वाङ्मयाचें अवलोकन करूं लागतात. यादवकालांतील गद्य आणि पद्य यांमधील अभिरुचिभेद दाखवून नरेंद्राचें 'रुक्मिणी-स्वयंवर' पण त्याहूनहि 'ज्ञानेश्वरांचें काव्य' म्हणजे अभिरुचीचा एक उत्कृष्ट आदर्श असा त्यांनी आपला अभिप्राय व्यक्त केला आहे. अभंग-वाङ्मयांतील अभिरुचिभेद विशद करीत आणि एकनाथांच्या तात्विक, आख्यानात्मक आणि भारुडादि लोककाव्यांचा परामर्श घेत प्रा. जोग शिवकालांत उतरतात. रामदासांचें कवित्व सरळ आणि नेटकें असलें तरी तें धीट-पाठ, भाषेशीं दांडगाई करणारें आहे. तसेंच तुकाराम संत असला तरी त्याच्या दंभपरिस्फोटात्मक अभंगांत दिसून येणारी शिवीगाळ त्याची रांगडी अभिरुचि व्यक्त करणारी आहे, असा त्यांचा स्पष्ट निर्वाळा आहे. मुक्तेश्वराची प्रतिभा व रसवन्ती कितीहि प्रशंसनीय असली तरी त्याचा अहंकार आणि संयमाभाव प्रा. जोग यांना अभिरुचिदृष्ट्या खटकतो. यांहीपेक्षा पंडित-काव्यांत त्यांना अभिरुचिदृष्ट्या अधिक अधोगति झाल्याचें आढळून येते. हे कवि क्षीण प्रतिभेचे व सुमार अभिरुचीचे होते. भक्तीच्या अधिष्ठानावर अश्लीलाला मान्यता देऊन, विनोदाच्या नांवाखाली 'आचरटपणा' करून आणि वृत्तवैचित्र्याच्या भ्रामक कल्पनेने कृत्रिमतेला कवटाळून बसलेले—म्हणून अभिरुचिहीन दिसतात. (मात्र यांत मोरोपंत फारसे बसत नाहीत.) शाहिरी कविता म्हणजे अभिरुचीचा अपकर्ष असें प्रा. जोग यांचें मत आहे; कारण धर्माकडून लौकिक जीवनाकडे वळलेल्या ह्या कवींनीं स्त्रीमनाचें एकांगी आणि विकृत दर्शन घडविलें आहे. अर्वाचीन कालांत लोकहितवादींच्या रांगड्या फटकळपणापुढे अभिजात अभिरुचीच्या दृष्टीने कृष्णशास्त्री वरच्या प्रतीचे वाटतात; कोल्हटकरांची चमत्कृति-प्रियता आणि कृत्रिमाचें प्रेम कनिष्ठ प्रतीचेंच. शि. म. परांजपे यांच्यानंतर केळकर-कालांत वाङ्मयाभिरुचीला प्रौढ आणि संस्कृत वळण मिळालें.

अभिरुचिभेदाचा येथे दाखविलेला धावता पट मूळ ग्रंथांत मंदगति छायाचित्र-ग्राहकानें घेतलेला आढळून येईल. यादवकालांत ज्ञानेश्वरांच्या काव्यांत उच्चांकाला पोहोंचलेली अभिरुचि सारखी घसरत पेशवाईच्या अखेरीला नीचांकाला उतरलेली दिसते; हीच अभिरुचि पुन्हा एका शतकांत त्या प्रारंभकाळीं प्रकटलेल्या उच्चांकाकडे आरोहण करतांना दृष्टिगोचर होते. असा हा अभिरुचीचा आलेख आहे.

अभिरुचीची व्याख्या देऊन, तिचीं लक्षणें सांगून नंतर निगमन-पद्धतीने केलेलें हें मराठी वाङ्मयाचें मूल्यमापन बिनचूक आहे यांत शंका नाही. पण अभिरुचिदृष्ट्या श्रेष्ठ न ठरणारे रामदास, तुकाराम, लोकहितवादी व तत्सम वाङ्मयसेवक आणि कनिष्ठ ठरलेले शाहीर-कवि वाङ्मय-सौंदर्याच्या दृष्टीने सरस आणि परिणामकारक अगोदरच ठरले आहेत. त्या त्या कालांतील वाङ्मयामागील प्रेरणा, वाङ्मयीन प्रयोजन, त्याच्या अभिव्यक्तीच्या पद्धति, त्या त्या कलावंताच्या प्रतिभेचा आलोक हें सारें वाङ्मयीन टीकेंत ध्यावें लागेल. '-वाङ्मयीन

अभिरुचि ' ही या अनेक दृष्टींतील एक श्रेष्ठ दृष्टि ठरेल; ती स्वतंत्र, एकमेव व अनन्यपरतंत्र असें स्वयंपूर्ण वाङ्मयीन टीकेचें मूल्य मात्र ठरणार नाही, हें या संदर्भात आवर्जून सांगावेंसें वाटतें. प्रा. रा. श्री. जोग यांचा तसा आग्रह नसावा.

### *टीकाकार शेजवलकर

इतिहास, राजकारण, समाजरचना, साहित्यशास्त्र यांचा गाढ अभ्यास असणारा एखादा विद्वान् रसिक जेव्हा आपल्या चौफेर नजरेने आणि अंतर्भेदी दृष्टीने वाङ्मयाकडे पाहतो, तें हातांत घेऊन त्याचें ' वजन ' करूं लागतो तेव्हा ती टीका आशय-अभिव्यक्तींतील एकरूपता किंवा अंतर्गत सुसंगति-विसंगति यांच्या चटसाऱ्या लक्ष्मणरेषा ओलांडून त्या वाङ्मयाच्या उद्गमबिंदूपर्यंत म्हणजेच वाङ्मयनिर्मात्याचें मन व त्याच्यावर संस्कार करणारें कालमन यांजपर्यंत पोहोचते; ही टीका खोल, तळापर्यंत मागे जाऊं शकते म्हणूनच भविष्यकथनहि करूं शकते. ही टीका आकलन, रसग्रहण यांच्या हवेशीर किनाऱ्यावरून ' मूल्यमापनाच्या ' खोल पाण्यांत उतरते. तिची दृष्टि तौलनिक असते, वृत्ति कालमनाच्या विश्लेषणाची असते. श्री. शेजवलकर यांनी ' विभावरी वाङ्मयाच्या निमित्ताने ' केलेला टीकाप्रपंच या दृष्टीने पहावा; किंवा बाळशास्त्री जांभेकर, लोकहितवादी, न्या. रानडे, लो. टिळक, डॉ. केतकर यांच्या कार्याचें ऐतिहासिक दृष्टीने केलेलें मूल्यमापन पाहावें. लोकहितवादींसंबंधी श्री. शेजवलकर लिहितात, " त्यांच्या जीवनाची बैठक मानव्याच्या विस्तीर्ण पायावर उभारलेली होती...... लोकहितवादींचा युरोपीय समकालीन कार्ल मार्क्स ज्या हेतूने मानवी समाजाच्या प्रश्नांचा अभ्यास करीत होता, त्याच हेतूने प्रेरित होऊन लोकहितवादींनी लेखणी हातांत धरली होती.... पेशवाईत प्रादुर्भूत झालेला ब्राह्मणांचा एकांगीपणा व दुबळेपणा लोकहितवादींतहि भरपूर उतरलेला होता. त्यामुळे त्यांचीं मतें कार्ल मार्क्सइतकींच पायाशुद्ध असून त्यांना जोराने प्रचलित करतां आलीं नाहीत......लोकहितवादींचें दुबळेंपण हें एका अर्थी महात्मा गांधींच्या दुबळेपणासारखें आहे. " या एका नमुन्यावरून त्यांच्या मूल्यमापनाचा मानदंड केवढा उत्तुंग आहे हें ध्यानीं येईल. यामुळे त्यांनी विष्णुशास्त्र्यांचा पदोपदीं केलेला गर्वपरिहार, मधूनच न. चिं. केळकरांचा केलेला अधिक्षेप, आणि न्या. रानडे आणि डॉ. केतकर यांचा केलेला गौरव अभ्यासकाला पुनर्मूल्यमापन करावयास भाग पाडणारा आहे. त्यांनी काढलेले निष्कर्ष मान्य किंवा अमान्य होतील, पण त्यांची मूल्यमापनाची पद्धति मात्र थोर आहे यांत शंका नाहीं.†

### संतवाङ्मय समालोचन

याच पद्धतीने ' **महाराष्ट्र-धर्माचे प्रणेते** ' या ग्रंथांत संत ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम, रामदास यांच्या कार्याचें मूल्यमापन प्रा. शं. दा. पेंडसे, प्रा. न. र. फाटक, प्रा. वि. भि.

* शेजवलकरांचे लेख, पुस्तक २ रें.

† या निमित्ताने मला एक विचार मांडावासा वाटतो—जुन्या नियतकालिकांतून धूळ खात पडलेले असे महत्त्वपूर्ण लेख पुस्तकरूपाने प्रतिवर्षी प्रसिद्ध होणें अगदी अगत्याचें आहे. तसेंच नियतकालिकांचे ललितवाङ्मयीनदृष्ट्या इतिहास लिहिले गेले पाहिजेत; नभोवाणीवरील महत्त्वाचीं व्याख्यानें ग्रंथरूपाने वाचकांपुढे आलीं पाहिजेत. या वर्षी ' शेजवलकरांचे लेख, भा. २ ', ' श्रोते हो ' आणि ' महाराष्ट्र-धर्माचे प्रणेते ' या ग्रंथांनी फार थोर वाङ्मयीन व सांस्कृतिक कार्य केलें आहे. त्याचप्रमाणे सर्व दिवाळी-अंकांनी मिळून जें दिलें नाही तें 'मनोहर'च्या रौप्यमहोत्सव अंकाने दिलें आहे. हा प्रयत्न निःसंशय अनुकरणीय आहे.

कोलते व तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी केलें आहे. 'मराठी संतांचें सांस्कृतिक कार्य' काय आहे हें निश्चित करतांना प्रा. गं. बा सरदार यांची दृष्टि ऐतिहासिक आणि तौलनिक आहे. हीं व्याख्यानें म्हणजे त्या त्या व्याख्यात्याने ग्रंथरूपाने स्वतः पूर्वी जें निवेदन केलें होतें त्याचें साररूपाने केलेलें ध्वनिक्षेपणच होय; यामुळे याचा अधिक परामर्श घेण्याचें कारण नाही. मात्र ग्रंथाला दिलेल्या नांवांतील 'महाराष्ट्रधर्म' या विशेषावर लक्ष केन्द्रित करून सर्व व्याख्यान-माला त्या सूत्रांत गुंफली गेली नाही हें सारखें खटकतें. तसें झालें असतें तर समग्र ग्रंथाचा एकविध संस्कार वाचकांच्या मनावर पक्का ठसला असता.

'ज्ञानेश्वरींतील शिकवण' हा प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांचा ग्रंथ केवळ ज्ञानेश्वरींतील ओव्यांच्या आधारें ज्ञानेश्वरांची शिकवण काय होती हें सरळपणाने निवेदन करणारा ग्रंथ आहे. प्रा. कुलकर्णी आपली भूमिका पुढीलप्रमाणे मांडतात—"तत्त्वज्ञानाच्या गंगेचें दर्शन अत्यंत स्पष्टपणें डॉ. शं. दा. पेंडसे यांनी वीस वर्षांपूर्वीच महाराष्ट्राला घडविलें आहे. काव्याच्या यमुनेचा रस अलीकडेच डॉ. रा. शं. वाळिंबे यांनी रसिकांना चाखविला आहे. नीतीच्या शिकवणीची सरस्वती प्रस्तुत निबंधांत प्रकट करण्याची मनीषा मी बाळगिली आहे." पण ज्ञानेश्वरी लिहितांना ज्ञानेश्वरांची भूमिका रसिक प्रतिभाशाली कवीचीच असून ती तार्किकाची अगर तत्त्वज्ञाची भूमिका नव्हती हें डॉ. वाळिंबे यांचें मत प्रा. कुलकर्णी यांना सर्वस्वी अमान्य आहे. तसेंच मुसलमानी आक्रमणाला तोंड देण्यासाठी ज्ञानेश्वरी लिहिली गेली ह्याहि प्रा. न. र. फाटकांच्या मताचें त्यांनी खंडन केलें आहे. ज्ञानेश्वरी ही स्वतःच्या मनःशांती-साठी किंवा महानुभावांच्या शिकवणीचा परिहार करण्यासाठी लिहिली गेली ही भूमिकाहि त्यांना चुकीची वाटते. ज्ञानेश्वर बंडखोर होते हेंहि प्रा. कुलकर्णी यांनी मान्य केलेलें नाही. ज्ञानेश्वर हे थोर संतांच्याप्रमाणे स्वतः तरून इतरांना तारणारे, व्यापक सामाजिक दृष्टिकोणाचे श्रेष्ठ पुरुष होते. लोकोद्धाराच्या हेतूनेच त्यांनी ज्ञानेश्वरी लिहिली हें स्वमत प्रा. कुलकर्णी यांनी शेवटीं मांडलें आहे. या भूमिकेंतून पाहतां प्रा. कुलकर्णी म्हणतात, "ज्ञानेश्वर हे कर्मयोगी आहेत आणि गीतेचा अर्थ त्यांनी कर्मयोगपरच लावला आहे. 'यज्ञ' म्हणजे 'स्वधर्माचरण' आणि हें स्वधर्माचरण जर निष्कामपणें केलें तर मोक्षप्राप्तीसाठी गृहस्थाश्रम सोडण्याची वा व्रतादिक करण्याची आवश्यता नाही........ ज्ञानेश्वरांना गीता-प्रणीत चातुर्वर्ण्य मान्य असलें तरी त्याकडे पाहण्याची त्यांची दृष्टि उदार होती. चातुर्वर्ण्यांतील गुणकर्मांवर आधारलेले भेदच ते नैसर्गिक मानीत...... ज्ञानेश्वरांचा भर ज्ञानमूलक, अनन्यनिष्ठापूर्वक व निष्काम उपासनेवर आहे, म्हणून अज्ञानमूलक व काम्य अशी अनेक देवतांची उपासना त्यांना मान्य नाही.......दैवी व आसुरी संपत्तीचें वर्णन समाजहित डोळ्यापुढे ठेवूनच ज्ञानेश्वरांनी केलें आहे ...... त्यांचा आदर्श पुरुष नीतीने चालणारा, सत्य बोलणारा, शास्त्रपूत पाहणारा, वेदैकनिष्ठ, स्वधर्माचरण करणारा, सारासारविवेकी व ईश्वरनिष्ठ आहे. 'पसायदानांतून' ज्ञानेश्वरांचा लोककल्याणाचा हेतु स्पष्ट झाला आहे......" वास्तविक येथेच म्हणजे प्रकरण नऊअखेर या ग्रंथाचें प्रयोजन संपलें आहे. प्रकरण दहामध्ये आलेल्या विषयांना प्राधान्याने ज्ञानेश्वरांची शिकवण असें म्हणतां येणार नाही; आणि अकरावें प्रकरण समालोचनाच्या नांवाखाली कंटाळवाणी पुनरुक्ति करणारें आहे. प्रा. कुलकर्णी यांनी काढलेल्या निष्कर्षांसंबंधी शंका उपस्थित करण्याऐवजी 'ज्ञानेश्वरींतील शिकवण' ही पूर्णांशाने 'ज्ञानेश्वरांची शिकवण' आहे का हाच प्रश्न उपस्थित करावासा वाटतो; आणि मग अर्थनिर्णयाच्या दृष्टीने

उपक्रमोपसंहारौ अभ्यासोऽपूर्वता फलम् ।
अर्थवादोपपत्ती च लिंगं तात्पर्यनिर्णये ।।

या श्लोकांतील सात साधनीभूत कसोट्यांवर ज्ञानेश्वरांचे ग्रंथ घासून तात्पर्यनिर्णय घेतला गेला असतां तर अधिक भक्कम काम झालें असतें. प्रा. श्री. मा. कुलकर्णी यांनी आपलें लेखन अनाकर्षकतेचा दोष जाणीवपूर्वक स्वीकारून सुबोध केलें आहे, याचें कारण ज्ञानेश्वरांनी गीताटीका मराठींत कां लिहिली तेंच असावें ( ! )

**नाट्यवाङ्मय : टीका व परीक्षण**

" श्री. कृ. कोल्हटकर यांच्या लेखणीची प्रवृत्ति नाट्यापेक्षा नाट्याभासाकडे होती हें उघड आहे. संयमापेक्षा विस्ताराकडे, अल्पाक्षरत्वापेक्षा पुनरुक्तीकडे, सौम्यतेपेक्षा भडक-पणाकडे, सूक्ष्मतेपेक्षा ढोबळपणाकडे व कलेपेक्षा कारागिरीकडे–व तीहि मारवाडी कारागिरी–त्यांच्या निर्मितीचा स्वाभाविक कल आहे. कलेचें तारतम्य, तिची स्वयंभू पण घाटदार बांधणी इत्यादि गोष्टींची त्यांना फारशी फिकीरच वाटत नाही " असा आपला अभिप्राय प्रा. वा. ल. कुलकर्णी यांनी कोल्हटकरांच्या नाटकांवर दिला आहे.* श्रीपाद कृष्णांच्या नाटकांतील गुणांचें, नव्हे दोषांचें क्रमवार यथासांग रीतीने त्यांनी विवेचन केलें आहे, व अखेर कोल्हटकरांच्या प्रत्येक नाटकाचें टिपणहि सादर केलें आहे.

" काणेकरांचीं नाटकें रूपांतरित आहेत म्हणून नाकें मुरडणारे कांही टीकाकार आहेत. ' स्वतःला नाटककार म्हणवून घेणें मला बरोबर वाटत नाही ' असें स्वतः काणे-करांनीहि म्हटलें आहे. काणेकरांचीं नाटकें पाश्चात्त्य नाट्यकृतींचीं रूपांतरें आहेत हें खरें; पण तेवढयामुळे त्यांचें मूल्य कमी होत नाही की ' नाटककार ' ह्या पदवीवर त्यांचा हक्क पोंचत नाही, असेंहि नाही....सृष्टिकर्त्या ब्रह्मयाचें नाही तरी प्रतिसृष्टि निर्माण करणाऱ्या विश्वा-मित्राचें सामर्थ्य रूपांतरकाराच्या अंगीं अवश्य असावें लागतें " असें आपलें मत मांडून हें सामर्थ्य काणेकरांच्या ठिकाणीं कसें पुरेपूर आहे हें † प्रा. स. गं. मालशे यांनी डोळसपणें दाखवून दिलें आहे. ‡ §

* श्रीपाद कृष्ण : वाङ्मयदर्शन, पृ. ७१.

† ' काणेकरांचीं नाटकें '—आवड–निवड, पृ. ११४. प्रा. स. गं. मालशे यांनी दिलखुलासपणें वाङ्मय-परीक्षणें केलीं आहेत. त्यांनी पहिल्या मराठी नवकथाकाराचा मान श्री. य. गो. जोशी यांना दिला आहे तो चिन्त्य आहे. सावरकरांच्या वक्तृत्वाला त्यांनी आपल्या लेखणीने सगुण, साकार केलें आहे. ' पाणकळा ' ही कादंबरी, कादंबरीच्या विकासाच्या दृष्टीने फडके-युगाच्या मर्यादा लक्षांत घेऊन, पुढे केलेली प्रगति न ठरतां सुरुवातीच्या अद्भुत-रम्यतेच्या युगांत नेणारी परागतीच वाटते असा योग्य निर्वाळा प्रा. मालशे यांनी 'पाणकळे'–संबंधीं दिला आहे. पण मुक्तेश्वराच्या प्रतिभेचें कौतुक करणाऱ्या भरांत त्याचा कालविपर्या-साचा दोष **अनवधानाने** घडून येतो असें त्यांना वाटलें आहे, या दोषाचें समर्थनहि करण्यास ते थोडेफार कां उद्युक्त झाले आहेत तें कळत नाही. प्रा. मालशे यांची रसिकता निर्मळ, मन-मोकळी आहे; त्यांची टीकादृष्टि स्वतंत्र आणि खेळकर आहे.

‡ ' कीचकवध ' नाटकाचा महाविद्यालयीन विद्यार्थ्यांस उपयुक्त असा अभ्यास डॉ. चारुशीला गुप्ते यांच्या ' कीचकवधाचें रूपरंग ' या पुस्तकांत दिसून येतो. ' नवाकाळ '-दिवाळी अंक, १९५९ मध्ये श्री. वि. स. खांडेकर यांनी ' कीचकवध –एक रसग्रहण ' या आपल्या लेखांत कीचकवधाच्या परिणामकारकतेची ऐतिहासिक दृष्टीने केलेली चिकित्सा मोठी वेधक आहे.

§ श्री. र. कृ. फडके यांनी ' लोकसत्ते'तून ' एकच प्याल्या'वर जी टीकेची झोड उठविली तिचा परामर्श स्वतंत्रपणेंच घ्यावा लागेल.

'संगीताने गाजलेली रंगभूमि' हा श्री. बाबूराव जोशी यांचा ग्रंथ खरोखरी स्वागताई आहे. मराठी नाट्यसंगीताचा उद्‌गम आणि विकास, त्याला मिळालेलीं वळणें, रंगभूमिवर त्यानें केलेले इष्टानिष्ट परिणाम, रंगभूमीचे त्यावर झालेले संस्कार या सर्वांचें ऐतिहासिक दृष्टीने पण रसिकतेने या ग्रंथांत विवेचन करण्यांत आलें आहे. 'नाट्यसंगीतासंबंधीची' चर्चा 'संगीताने रंगभूमि मारली आहे का ?' या प्रश्नापासून सुरू होते ...कै. गोविंदराव टेंबे, केशवराव भोळे, व. शां. देसाई, प्रा. मंगरूळकर, वि. स. खांडेकर, ह. रा. महाजनी या सर्वांची भूमिका नीट अभ्यासून श्री. बाबूराव जोशी यांनी नाट्यसंगीतासंबंधी आपला अभिप्राय पुढीलप्रमाणे व्यक्त केला आहे — "संगीताव्यतिरिक्त वास्तवाच्या कल्पनेस धक्का देणाऱ्या कितीतरी गोष्टी नाटकांमध्ये मूलतःच असतात. मग संगीतावरच एवढा आक्षेप का ?... जेथें एखादी भावना व्यक्त करायला शब्द अपुरे पडतात तेथे तीच गोष्ट अनुकूल स्वरमेळाच्या साहाय्याने परिणामकारकरीत्या सिद्ध करतां येते. ... कथावस्तूशीं पदें अशीं निगडित असावींत की प्रसंगीं पदें गाळायचीं म्हटलें तरी नाटकांत वैगुण्य उत्पन्न होतां कामा नये.... खरा विवाद्य प्रश्न आहे तो काय जातीचें संगीत वापरण्यांत यावें व तें किती वेळ गावें हा होय ... गाणें परिणामकारक व्हावयास जास्त वेळेची आवश्यकता नाही, गानकौशल्याची मात्र जरूरी आहे.... 'गंधर्व संगीत पद्धति हीच नाट्यसंगीतास अनुकूल आहे...." सरतेशेवटीं महाराष्ट्रीय जनतेचा खरा ओढा संगीतप्रधान नाटकांकडेच जास्त आहे हें ध्यानीं घेऊन आणि पद्यरचनेमागे रसोत्कर्ष साधणें, प्रसंगास अनुकूल वातावरण निर्माण करणें, नीरसता अगर रूक्षता घालविणें, तीव्र भावनेचा ताण कमी करणें असे अनेकविध हेतु असतात. याचा फेरविचार करून आदर्श संगीत नाटकें भावी नाटककारांनी व दिग्दर्शकांनी निर्माण करावींत अशी त्यांनी त्यांना विनंती केली आहे. कळकळीने आणि निर्मळ मनाने केलेल्या या विनंतीचा रंगभूमीशीं संबंध असणाऱ्या नट, नाटककार, दिग्दर्शक व प्रेक्षक यांनी पुन्हा विचार करावयास हवा आहे.

याच रसिकांनी अभ्यास करण्यासारखें आणखी एक पुस्तक प्रकाशांत आलें आहे. श्री. नंदू खोटे यांचें **'नाट्यदर्शन अर्थात् नाटक कसें बसवावें ?'** नाटक हें वाचण्यासाठी असतें यांत शंका नाही, पण या वाचनाची सांगता प्रयोगरूपाने होत असते हें मनांत नीट बाळगलें तर या पुस्तकाचा उपयोग होतकरू नटांप्रमाणे, होतकरू दिग्दर्शकाला व जिज्ञासु नाटककारालाहि खूप होण्यासारखा आहे; फार काय प्रेक्षकाची दृष्टीहि अधिक चोखंदळ होईल. प्रयोगविषयक जें तंत्र या पुस्तकांत उदाहरणें देऊन, आकृति मांडून दाखविलेलें आहे त्याचा विस्तृत परामर्श एखाद्या जाणत्या, अनुभवी दिग्दर्शकाने अवश्य घ्यावा.

**'मराठीची लोककला – तमाशा'** हें श्री. नामदेव व्हटकर यांचें तमाशाच्या प्रत्येक अंगाविषयी तात्त्विक आणि व्यावहारिक माहिती देणारें पुस्तक आज अभ्यासकाची फार मोठी गरज भागविणारें ठरेल यांत संदेह नाही. तमाशा कसा जन्मला, वाढला, फोफावला, देशोधडीला लागला आणि आता पुन्हा सरकारच्या आश्रयाने बळ धरून उभा राहिला याचा सुंदर पट श्री. व्हटकर यांनी वाचकांपुढे उलगडला आहे. श्री. व्हटकर स्वतः पट्टीचे तमासगीर असल्यानें त्यांनी मोठ्या आपुलकीने तमाशाचें बळ कशांत आहे तें दाखवून दिलें आहे. 'तमाशाच्या गाडीचें एक चाक शृंगाराचें, तर दुसरें ब्रह्मज्ञानाचें होतें.' सोंगाड्या हें, तमाशाचें मोठें गुणी बाळ आहे असें कौतुकाने म्हणून त्याने निर्माण केलेल्या विनोदाचें रसपूर्ण विवेचन

श्री. व्हटकर यांनी केलें आहे.* तमाशांतील अश्लीलतेची कारणमीमांसा केल्यानंतर श्री. व्हटकर म्हणतात की, 'तमाशातील अश्लीलतेचा कलंक हा मराठीच्या अंगरख्या-वर पडलेल्या डागासारखा आहे. कपड्याला पडलेला डाग धुवायचा असतो, त्यासाठी सारा कपडाच फेकून देणें हें शहाणपणाचें नव्हे.' तमाशा आणि तमाशांतील कलावंत यांच्याकडे निंदकाच्या दृष्टीने पाहणें बरें नाही. तमाशाची ही कुळकथा अभ्यसनीय आहे. तमाशाची जन्मकहाणी किंवा त्यांतील अश्लीलाचें समर्थन यासारखे कांही मुद्दे विवाद्य आहेत, पण तमाशासंबंधी सामाजिकांच्या मनांत अकारण माजलेले गैरसमज या पुस्तकाने दूर होतील व लोक-नाट्याकडे ते प्रेमाने पाहतील असें वाटतें. त्यासाठी कांही गाज-लेले 'वग' संग्रहरूपाने प्रसिद्ध होणें अतिशय आवश्यक आहे.† ‡

## ( ३ ) ललितवाङ्मय आणि ललितकला : तात्त्विक विचार

### प्रा. वा. ल. कुलकर्णी यांची 'वाङ्मयीन दृष्टि आणि दृष्टिकोण'

प्रा. वा. ल. कुलकर्णी हे एक अभ्यासू, रसिक आणि चोखंदळ टीकाकार आहेत. मोठ्या आस्थेवाईकपणें आणि जिज्ञासु बुद्धीने ते ललितवाङ्मयाचा आस्वाद घेतांना दिसतात व आस्वाद घेतां घेतां जीं कांही वाङ्मयीन मूल्यें त्यांच्या हातीं लागतात त्यांची सात्त्विक चर्चा शास्त्रीय पद्धतीने ते करूं लागतात; स्वतःच्या शंकांच्या समाधानासाठीच हा सर्व व्यापार असतो,§ यामुळे त्यांच्या टीकालेखांना एका अनौपचारिक चर्चेचें, 'टीपा आणि टिप्पणी'चें स्वरूप येतें. आधुनिक आणि अत्याधुनिक कालखंड हे प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचे आवडीचे कालखंड असावेत असें त्यांच्या प्रकाशित साहित्यावरून दिसून येतें; त्यामुळे या कालखंडाशीं संबद्ध आणि तदुद्भूत वाङ्मयीन प्रश्नांवरच त्यांचें सारें चिंतन आणि लेखन झालेलें आहे. कलादृष्ट्याच साहित्याचें सौंदर्य ते शोधतात व त्याची उकल करतात यामुळे 'आशयाच्या' मूल्यमापनाच्या महत्तर कार्यांत ते निमग्न होत नाहीत, ( कदाचित् ते त्यांना अप्रस्तुत, अनावश्यकहि वाटत असेल ! ) 'वाङ्मयीन दृष्टि आणि दृष्टिकोण' या त्यांच्या लेखसंग्रहांत वरील सर्व गुणांचा पडताळा अभ्यासकाला घेतां येईल. आजची व कालची लघुकथा,

* मराठी नाटकांत अवतरलेला विदूषक आणि तमाशांत आपलें राज्य गाजविणारा सोंगाड्या यांचा सुसंस्कृत पूर्वज कसा होता हें पाहावयाचें असेल तर डॉ. गो. के. भट यांचा 'विदूषक' हा ग्रंथ वाचावा.

† प्राचीन काळीं भारतांत कला व कलावंत यांच्याकडे समाज तिरस्कृत नजरेने पाहत असे. समाजांत कलावंताचें काय स्थान होतें तें जाणून घेण्यासाठी डॉ. रा. शं. वाळिंबे यांच्या 'प्राचीन भारतीय कला—इतिहास आणि रूपदर्शन' भा० १ मधील पृ. ६८ ते ८२ हा भाग अवश्य वाचावा.

‡ 'मराठींतील नाट्यकला आणि नाट्यवाङ्मय' हा प्रा. श्री. ना. बनहट्टी यांचा ग्रंथ मिळूं शकला नाही.

§ 'श्रीपाद कृष्ण — वाङ्मयदर्शन' या त्यांच्या टीकालेखनांत याचा पूर्ण प्रत्यय येतो. कोल्हटकरांच्या टीकेचीं एकेक लक्षणें आणि अवलक्षणें जणू हळूहळू प्रा. वा. ल. कुलकर्णी यांना दिसत चालल्याचा भास होऊं लागतो. विशेषतः 'सुदाम्याचे पोहे' यावरील टीकेंत प्रा. कुलकर्णी यांनी 'सुदाम्याचें गांव' कसें रूप घेऊं लागलें आहे याचें प्रत्ययकारी वर्णन केलें आहे. कोल्हटकरांच्या आत्मचरित्राच्या प्रकाशांत कोल्हटकरांच्या समग्र वाङ्मयाचें दर्शन घेतांना कितीतरी वाङ्मयीन कोडीं झटकन् उलगडतांना दिसून येतात.

आजची व कालची कादंबरी, सुखात्मिका व शोकात्मिका यासंबंधींच्या त्यांच्या मतांवर पूर्वी टीका होऊन गेली आहे. पण आपले सारेच अनुभव कलाविषय कां होत नाहीत—( उदा० लैंगिक क्षुधा किंवा साधी अन्नाची क्षुधा— ) यावर त्यांनी टाकलेला प्रकाश बराच नवीन आहे. ( ' कलाभिव्यक्तींतील एक समस्या '— हा लेख पहा. ) ' तसेंच कालमानाने जेव्हा वाङ्मयाचा थोडयाफार अपरिहार्यपणें कायाकल्प व मनःकल्प होत असतो तेव्हा वाङ्मयाचीं जीं शाश्वत स्वरूपाचीं पुरातन मूल्यें असतात त्यांना नवा अर्थ प्राप्त होत असतो,... दरम्यानच्या काळांत त्यांच्यावर चढलेलीं अर्थशून्य सांकेतिक कल्पनांचीं व विचारांचीं जळमटें झटकलीं जातात, जणू नाहींशीं होतात व हीं मूल्यें नव्या तेजाने तळपूं लागतात—' हा जो विचार त्यांनी ' नवें साहित्य आणि मूल्यविचार ' या लेखांत मांडला आहे तोहि मोठा मननीय आहे. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांच्या या टीकालेखांनी मराठी—टीकेंतील तात्त्विक विचार सूक्ष्म आणि विशुद्ध बनविण्यास खूपच साहाय्य केलें आहे.

साहित्य आणि ललितकला यांचें स्वरूप, हेतु, परिणामादींविषयीं विवेचन करणाऱ्या ' **कलाविमर्श** ' ह्या पुस्तकांत प्रा. बालकृष्ण दाभाडे यांच्या १९३७ ते १९५८ या वीस वर्षांच्या कालखंडांत प्रसिद्ध झालेल्या कलाविषयक लेखांचा संग्रह केलेला आहे. साहजिकच या लेखांत आजच्या ताज्या टवटवीत विचारांचा आढळ फारसा होत नाही. प्रा. दाभाडे यांना कलेचें स्वातंत्र्य मान्य आहे ( पृ. ४४ ); पण व्यक्तिगत आनंदाचा सुंदर आविष्कार जोंपर्यंत समष्टीला आपल्या आनंदांत भागीदार करूं शकत नाहीं, तोंपर्यंत तो आविष्कार कला पदवीस प्राप्तच होत नाही असें प्रा. दाभाडे प्रतिपादितात ( पृ. ११९ ). त्याचबरोबर ते हेंहि मानतात की ' चित्रकार रंगाने रंगवीत नाही. तो रंगाचा उपयोग करतो पण आपल्या प्रतिभेने रंगवीत असतो' ( पृ. ७६ ). तसेंच ' कलाकृतीचा मोठेपणा अनुभूतीच्या अपूर्वत्वावर व मोठेपणावर अवलंबून असतो ' ( पृ. ७५ ) हें सांगून ' कला म्हणजे स्वयंप्रकाशज्ञान—साक्षात्कार ' अशी व्याख्या ते पुढे करतात. कलानंदाची स्थिति आत्मानंदासारखी आहे हें सांगतांना 'सविकल्प समाधी ' ला ते मान्यता देतांना दिसतात ( पृ. १० ). एकंदरीने आज कलेसंबंधीच्या तात्त्विक लेखनांत जी सूक्ष्मता, जो साक्षेप आणि कांटेकोरपणें सुसंगति राखलेली आढळते ती या लेखनांत अभावानेंच जाणवते. असें असलें तरी प्रा. दाभाडे यांच्या दृष्टिकोणांत कांही ठिकाणीं अगदी जो वेगळेपणा आढळतो तो वाङ्मय-तत्त्व-चिंतकाला विचार करण्यास प्रवृत्त करतो. ' कला आणि योग ', ' कला — एक मोक्षमार्ग ' या दृष्टीने चिंतनीय लेख आहेत. विशेषतः सर्व ललितकलांत चित्रकलेचा दर्जा पहिला मानण्यास प्रा. दाभाडे यांना मुळीच प्रत्यवाय वाटत नाही* ( पृ. ११४ ). प्रा. दाभाडे यांच्या एकंदर विवेचनाचा भर साहित्यापेक्षा चित्रकलेवरच जास्त आहे हेंहि सहज ध्यानांत येण्यासारखें आहे.

* ' साहित्य हें सर्व ललितकलांत श्रेष्ठ आहे ' हें प्रा. भगवंत देशमुख यांनी तुळजापूर येथे भरलेल्या उस्मानाबाद जिल्हा साहित्य संमेलनप्रसंगीं केलेल्या अध्यक्षीय भाषणांत मोठ्या अभिनिवेशाने मांडलें आहे.

' **हास्य — रस की विरस ?** ' ( केसरी—२८ जून १९५९ ) हा प्रा. चिं. वि. जोशी यांचा लेख हास्यरसाच्या निर्मितीविषयी व आस्वादप्रक्रियेविषयी अगदी नवा विचार मांडणारा लेख आहे; रसचर्चेच्या वेळीं त्याचा अवश्य विचार करण्यासारखा आहे.

कलकत्ता येथे झालेल्या ' श्रद्धा आणि साहित्य ' याविषयीच्या परिसंवादांत प्रा. गंगाधर गाडगीळ यांनी वाचलेला निबंध ' ललित साहित्याचें मूल्यमापन आणि नैतिक राजकीय दृष्टिकोण '— ('सत्यकथा', जुलै १९५९) कलेच्या संपूर्ण स्वातंत्र्याच्या उद्घोषाच्या दृष्टीने अभ्यासण्यासारखा आहे.

## ( ४ ) कांहीं उदयोन्मुख आणि असन्मानित वाङ्मयप्रकारांची कैफियत

### नभोवाणी–साहित्य

* " नभोवाणी हें एवढें प्रभावी व समर्थ माध्यम आहे की देशांतील लेखक-कलावंतांनी मनावर घेतल्यास त्यांना तिच्या द्वारा मनःक्रांति ( रेनेसाँ ) घडवून आणतां येईल... आपला मंत्र त्यांना या यंत्रावर स्वार करतां आला तर त्यांचें सामर्थ्य अनंत पटींनी वाढणार आहे...वार्तापट, अनुबोधपट, व्यवसायपट, परिसंवाद, चर्चा, प्रश्नोत्तरविलास, श्रुतिका, नभोनाट्यें, संगीतिका, द्वंद्वगीतें, भावगीतें, समूहगीतें असे विविध साहित्याचे, संगीताचे आणि साहित्य-संगीत संमिश्रणाचे कितीतरी वाङ्मयप्रकार नभोवाणीमुळे जन्मास आले आहेत..... तमाशा, वग, नाटक, कथा, कादंबरी, काव्य, कीर्तन, प्रवचन या आणि असल्या जुन्या प्रकारांना नवजीवन मिळत आहे... स्वभाषेंतील विविध शैलींच्या आणि बोलींच्या परिचयाबरोबरच शेजार-भाषांचा आणि त्यांतील साहित्याचा परिचयहि नभोवाणीमुळे सुलभ होत आहे.... नभोवाणीचा वक्ता आपल्या शब्दांत आणि शैलींत बोलतो, एवढेंच नव्हे,तर आपल्या आवाजांत बोलतो आणि त्याचमुळे शब्दांतून सांगतां न येणाऱ्या भावांच्या सूक्ष्मातिसूक्ष्म छटा आणि व्यञ्जना त्यास स्वराच्या रंगढंगांतून आणि चढउतारांतून सांगतां येतात... छापील साहित्य आणि नभोवाणीवरील बोलकें साहित्य यांतला फरक दिवसेंदिवस स्पष्ट होतच आहे आणि श्रोत्यांचा कान अधिकाधिक तरबेज होत जाईल तसतशी या उभय साहित्याचीं व्यवच्छेदक लक्षणें जास्त जास्त स्पष्ट होणार आहेत. नभोवाणीला अनुरूप अशा या बोलक्या साहित्याचीं व्यवच्छेदक लक्षणें ज्यांच्या प्रतिभेला चटकन् उमगतील आणि सरावाने पेलतां येतील अशा लेखकांचा एक स्वतंत्र वर्ग यापुढे निर्माण होणें अपरिहार्य आहे. " नभोवाणी-साहित्य, त्याचें स्वरूप व सामर्थ्य यांविषयी श्री. बा. भ. बोरकर यांनी व्यक्त केलेले हे विचार मोठे यथार्थ, मार्मिक आणि भविष्यसूचक आहेत. नभोवाणीने ध्वनिक्षेपित केलेलें कितीतरी साहित्य उच्च प्रतीचें व रक्षणीय ठरलें आहे. ' नभोवाणीच्या सौजन्याने ' आतापर्यंत कितीतरी व्याख्यानें, व्याख्यानमाला, श्रुतिका, संगीतिका व नभोनाट्यें नियतकालिकांतून किंवा पुस्तकरूपाने प्रसिद्ध झालीं आहेत. †आणखी कितीतरी प्रकाशित व्हावयास हवीं आहेत; हें मोलाचें धन प्रकाशांत येणें व विद्याव्यवहारांत खेळत राहणें अत्यंत आवश्यक आहे. वानगीदाखल एकच उदाहरण देतों-- कै. पु. मं. लाड यांच्या स्मरणार्थ गुंफलेली द्वितीय व्याख्यानमाला– डॉ. ग. त्र्यं. देशपांडे यांची ' संस्कृत साहित्यशास्त्रांतील सौंदर्यकल्पना '– प्रकाशित व्हावयासच हवी आहे. असो.

हें सारें मान्य करूनहि नभोवाणीकडे कलावंत प्रायः ' यशसे ' 'अर्थकृते 'च पाय वळवितो. ' तेवढेंच ज्ञानप्रकाशांत ' आणि ' थोडें फार खिशांत ' ही मनोवृत्ति उच्च साहित्य-

* ' लोकरंजनाची नवी आघाडी '– ' मनोहर ' रौप्य-महोत्सव विशेषांक, ऑक्टोबर १९५९—बा. भ. बोरकर.

† ( १ ) ' महाराष्ट्र-धर्माचे प्रणेते ' – कै. पु. मं. लाड यांच्या स्मरणार्थ मुंबई-आकाशवाणी केंद्राने १९५८ मध्ये योजिलेल्या व्याख्यानांचा संग्रह.

( २ ) ' कहाणीची कहाणी ' ही नभोवाणीवरील भाषणमाला. प्रकाशन–सत्यकथा, जुलै–ऑगस्ट १९५९ इ०.

निर्मितीला सुतरां बाधक आहे. शिवाय ' वाऱ्यावरून आलें आणि वाऱ्यावर विरून गेलें ' हें ज्या साहित्याचें क्षणभंगुरत्व त्याच्या माध्यमानेंच निश्चित केलें आहे तें साहित्य निर्माण करतांना सामान्यतः लेखकाची दृष्टि चिरकाल प्रकाशित रूपांत राहणाऱ्या साहित्य-निर्मितीच्या काळीं जितकी जबाबदारीची असेल तितकी असण्याचा संभवहि कमीच. ' नभोवाणी ' हें मनोरंजनाचें सोयिस्कर व स्वस्त माध्यम आहे, त्यामुळे तें रविकिरणाइतकें दूरगामी व सर्वगामी झालें आहे. त्यांत पुन्हा सकाळ-दुपार-संध्याकाळ म्हणजे तिन्ही त्रिकाळ, दररोज, अखंडपणें नवनवीन साहित्याचा तिला भिन्नरुचीच्या जनताजनार्दनाला सुग्रास पोहोचवावा लागतो. ही तिची साहित्य-पुरवठा करण्याबाबतची निकड पाहिली, की ह्या उदंड मागणीला ' सिंहिणीची वीण ' असणारे जातिवंत कलावंत किती पुरेसे पडणार ? आणि मग नाटकाचें नभोनाट्य कर, कादंबरीची पंचखंडात्मक श्रुतिका-माला बांध, गद्य आख्यानाची संगीतिका रच, असे कांहीं नवरचनात्मक प्रयोग करण्यांत प्रतिभा राबविली जाते. नभोवाणीची प्रचंड भूक भागविण्यासाठी तिच्या सहस्रमुखांत जातिवंत कलावंत प्रत्यहीं सांजसकाळ असें कांहीं रूपांतरित, अनुवादित, आधारित ओतीत राहतात. हें सुलभ-सोपारें साधन एका अर्थानें अस्सल सर्जनशक्तीची खची तर करीत नाहीं ना अशी सारखी शंका येते. शिवाय जें नाटक समोर बसून तासन् तास अनिमिष नेत्रांनी प्राशन करावयाचें आणि कानांनीं देहांत आणि अंतर्मनांत पार मुरवून टाकायचें तें कसेंबसें तासांत उरकून घ्यावयाचें — यांत रसिक मनाला फार क्लेश होतात. रसनिर्मितीला प्रारंभ होतो न होतो तोंच पुढला संवाद कानीं ' पाडलाच ' जातो. मला वाटतें यांत आपण श्रोत्यांची कलेसंबंधी अभिरुचि व अपेक्षा उथळ तर करण्याचें नकळत पातक करीत नाही ना ? कृतक साहित्यावर ( Pseudo Literature ) त्यांना झुलवीत तर ठेवीत नाही ना ? नभोवाणीची कालमर्यादा आणि प्रकृतिमर्यादा ध्यानीं घेतां आपण तिच्याकडून कधी कधी तिच्या आवांक्याबाहेरचें तर काम करवून घेत नाही ना अशी शंका येते. कदाचित् सारें बरें-वाईट आज डोळ्यांपुढे व कानांमध्ये असल्यानें हा अभिप्राय व्यक्त झाला असेल. अस्सल साहित्य शंभरांत एखादेंच असतें—तसें तें नभोवाणीवरहि आहे. पण नभोवाणीचा प्रचार आणि प्रभाव इतका झपाट्याचा आणि हमखास आहे की, तेथे अस्सल आणि नक्कल यांचें प्रमाण इतकें व्यस्त असूं नये असें वाटतें. मराठी भाषा व मराठी शब्दांचे उच्चार अधिक शुद्ध असावयास हवेत. आज 'नभोवाणी'वर श्रेष्ठ कलावंत आपलें मंत्रबळ चालवीत आहेत; त्यामुळे नभोवाणीला ' आकाशवाणी ' चा अधिकार निश्चयेंकरून प्राप्त होईल यांत शंका नाही.

## चित्रपट–साहित्य

* " प्रेक्षकांसाठी आणि नाटकमंडळ्यांसाठी लिहिणाऱ्या नाटककाराला ' साहित्यिक ' म्हणून मुकुट चढवितांना मराठी टीका लाजली नाही, पण चित्रपटांचे लेखक मात्र साहित्यनगरीपासून नेहमी दूर ठेवण्यांत आले आहेत. †**नाटकाप्रमाणेच चित्रकथेचा मूळ पाया साहित्याचा आहे.** चित्रकथाकाराला प्रथम सुचते ती कथाच, चित्रपट नव्हे. चित्रपट हा त्या कथेचा संस्कारित अवतार आहे. चित्रपटसृष्टींतून साहित्याच्या मांडवांत पाचारला गेलेला पहिला लेखक म्हणून मी साहित्यिक बंधूंना विनंती करतों की, चित्रपटकथांची गणनाहि

* म. वा. परिषद्, बडोदें १९५९, अध्यक्षीय भाषण.

† जाड टाईप माझा.

साहित्यांत करतांना त्यांनी आढेवेढे घेऊं नयेत." श्री. ग. दि. माडगूळकर यांच्या या विनंतीचा मराठी रसिक प्रेक्षक, वाचक व टीकाकार यांना गंभीरपणें विचार करावा लागेल असें वाटतें. आचार्य अत्रे यांनी आपल्या 'चित्रकथां'चा एक संग्रह पुस्तकरूपाने दोन वर्षांपूर्वी प्रसिद्ध केलाच आहे हेंहि या वेळीं ध्यानीं घ्यावें.

## ( ५ ) मराठी भाषेचा जयजयकार*

मराठी भाषकांना आता स्वतंत्र महाराष्ट्र मिळाला आहे. मराठी-विद्यापीठ मिळून एक तप होत आलें आहे. पण केवळ यामुळें मराठीची प्रतिष्ठा वाढली आहे असें नाही. "महाराष्ट्र हा सर्वोदय आणि सर्वोच्च व्हायचा असेल तर विद्यापीठांतून **मराठी माध्यमाची** योजना केली पाहिजे; या प्रांताचा सर्व कारभार **मराठींतच** चालला पाहिजे; येथील जनतेची ज्ञानाची, विज्ञानाची, रंजनाची मनमुराद सोय मराठी भाषेंतून करून दिली पाहिजे. कारण **लोकभाषेशिवाय खरें लोकशिक्षण नाही आणि लोकशिक्षणाशिवाय खरी लोकशाही नाही**. घरादारांवर, दुकानांवर, कचेऱ्यांवर सर्वत्र पाट्या मराठींतून लिहिल्या गेल्या पाहिजेत; प्रत्येक कागदपत्रावर मराठींतून सही झाली पाहिजे; खाजगी पत्रव्यवहार, विवाहादि मंगल-

* 'श्रोते हो'—म. म. द. वा. पोतदार यांच्या भाषणांचा संग्रह.

कार्याच्या पत्रिका मराठींत छापल्या पाहिजेत. चारीकसारीक प्रसंगांनाहि मराठीचा बाणा आग्रहपूर्वक चालविला पाहिजे; मराठींत पांडित्य नाही, तें आणण्याचा कडोविकडीचा प्रयत्न झाला पाहिजे; असें केलें तर आपल्या राष्ट्राची काया पालटेल, मराठीचे दुर्दिन संपतील. ती आपल्याला हसवील, रिझवील, नाचवील. मराठीचा 'धेंडा' सर्वत्र मिरवेल. हे 'ईरेचें' काम आहे.'' असें म. म. दत्तो वामन पोतदार यांनी आपल्या अस्सल मराठी बोलींत मोठया वक्तृत्वपूर्ण शैलींत 'मराठी'चा जयघोष केला आहे.

मातृभाषांच्या द्वारे सर्व जीवांना ज्ञानाचें अत्युच्च शिखर गाठण्याची सोय करून देणें हें पहिलें कर्तव्य. मातृभाषेच्या साहाय्यानें ज्ञानाची चढण जेथवर चढतां येईल तेथवर चढणें आणि तदनंतर पुढे जाणाऱ्या दुसऱ्या परक्या भाषेची सोबत पाहून वाट चालणें हा खऱ्या जिज्ञासूचा दुहेरी धर्म होय. आज राष्ट्र-भाषा शिकणेंहि आद्यकर्तव्य आहे.

परिभाषेचा प्रश्न भेडसावणारा नाही. 'पावसासारखी सिद्ध परिभाषा आकाशांतून खाली कधी पडत नाही.' जात्यावर बसलें म्हणजे ओवी सुचते. मराठीच आम्ही शिकत नाही, त्यामुळे मराठी शब्द आम्हांस सुचत नाहीत. संस्कृत-निषेधपूर्वक मराठीचा अभिमान आम्ही जागविला असला तरी 'देशी हें चलनी नाणें आणि संस्कृत हें आमचें शिलकी भांडार आहे.' परिभाषेचा प्रश्न यामुळे आम्हांस कठीण नाही.

भाषिक राज्य म्हणजे फुटीर प्रवृत्ति नव्हे; कारण भारत हा राज्यसंघ नाही, संघराज्य आहे. मायबोलीपासून मुलाला तोडणें म्हणजे त्याचें मीठ तोडण्यासारखें आहे. म. म. पोतदार यांनी मराठी भाषेचा नुसता जयजयकार करण्याचें धोरण अंगीकारलेलें नाही. मराठीचें अधिराज्य स्थापन व्हावें म्हणून ज्या असीम आणि विशुद्ध निष्ठेची नितान्त आवश्यकता त्यांना भासली आणि ज्या महान् यत्नयोगाचें अनुष्ठान केलें पाहिजे असें त्यांच्या दृष्टीला दिसलें, त्याचें मनमोकळें आणि प्रांजळ प्रतिपादन त्यांनी या व्याख्यानांतून केलें आहे. त्यांची दृष्टि ऐतिहासिक असली, अखिल भारतीय असली तरी बाणा 'मराठी' आहे. ते क्रियावान् पण्डित असल्यानें काम अडूं देत नाहीत, गाडा चालू ठेवतात. म्हणूनच 'भारतीय भाषिक नीति' प्रतिपादून त्यांनी 'मराठीचा कर्मयोग' सांगितला आहे. म. म. पोतदार हें आमचें 'बुन्यादीचें नाणें' आहे. त्यांची मराठी भाषा म्हणजे अस्सल मराठीचें आदर्श रूप आहे. ह्या भाषेचें जगांतील कोणत्याहि भाषेंत भाषांतर करतां येणार नाही. ह्या ग्रंथाची सरकारदरबारीं, सभा-संमेलनीं, यात्रा-प्रसंगीं, घरीं-दारीं, सर्वत्र आज महाराष्ट्रांत पारायणें व्हायला हवीं आहेत.* ● ● ●

* या संदर्भांत मिरज साहित्य सम्मेलनांतील अध्यक्षीय भाषणांत प्रा. श्री. के. क्षीरसागर यांनी व्यक्त केलेले मार्मिक विचार पडताळून पाहण्यासारखे आहेत.—प्रांतिक भाषा जगणार की मरणार ?; हिंदी ही राष्ट्रभाषा ? नव्हे, कारभाराची भाषा !, मुंबईराज्य हें द्विभाषिक की हिंदीभाषिक ?, भाषिक स्वायत्तता आणि भारतीय एकता, 'केवळ हिंदी की बंगाली' ?, शब्दांच्या टांकसाळी : वाङ्मयाचें वर्कशॉप् !, मराठींतील शास्त्रीय परिभाषा, अर्वाचीन राजाश्रयाचे परिणाम, या गोष्टींसंबंधी अगदी मूलगामी आणि दूरगामी विचार त्यांत व्यक्त झाले आहेत. मराठीचा जळजळीत पण रास्त अभिमान पदोपदीं जाणवतो.

मुद्रकः—म. ना. चापेकर, आर्यसंस्कृति मुद्रणालय, १५७५।२ सदाशिव पेठ, पुणें २.
प्रकाशकः—य. दि. पेंढरकर, चिटणीस, महाराष्ट्र–साहित्य–परिषद्, टिळक रस्ता, पुणें २.

## मराठी साहित्य संमेलन, ४२ वें अधिवेशन, ठाणें

# ठराव

१ :

गेल्या मिरज साहित्य संमेलनानंतर दिवंगत झालेल्या पुढील साहित्यिक व साहित्यप्रेमी व्यक्तींबद्दल हें संमेलन दुखवटा व्यक्त करीत आहे.

डॉ. ना. गो. नांदापूरकर, श्री. श्री. रा. शिंदे, श्री. वि. रा. ओक, प्रा. मा. दा. अळतेकर, श्री. अ. स. फडके, श्री. दत्तु बांदेकर, श्री. पार्श्वनाथ अळतेकर, श्री. चिंतामणराव कोल्हटकर, डॉ. अ. स. अळतेकर, रियासतकार श्री. गो. स. सरदेसाई, श्री. त्र्यं. गो. ढवळे, श्री. खं. सा. दौंडकर, श्री. अ. ह. जोशी, श्री. वि. वा. हडप, श्री. भि. ल. कवढी, श्री. श्रीधरशास्त्री पाठक, श्री. वि. गं. लेले, श्री. द. रा. धारपुरे, श्री. ल. ब भोपटकर, प्रा. एन्. पी. शिंदे, प्रा. रा. शं. नायक, प्रा. गो. कृ. गुंडे, श्री. केशवराव जेधे, श्री. बाळूकाका कानिटकर.

—अध्यक्षांकडून

२ :

सलग मराठी प्रदेशाच्या महाराष्ट्र-राज्यनिर्मितीने मराठी साहित्यिकांची दीर्घकालची एक मनीषा बव्हंशीं पूर्ण झाली आहे याबद्दल या संमेलनास अत्यानंद होत आहे. या निर्मिती-साठी ज्यांनी ज्यांनी अव्याहत प्रयत्न केले, त्या सर्वांबद्दल हें संमेलन कृतज्ञतापूर्वक अभिनंदन करीत आहे. तसेंच ज्यांनी संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीसाठी बलिदान केलें त्यांना हें संमेलन श्रद्धांजली वहात आहे. मुंबईच्या द्वैभाषिकाचें विभाजन घडवून आणण्यांत भारत सरकारने जो पुढाकार घेतला त्याबद्दल हें संमेलन हार्दिक आभार व्यक्त करीत आहे.

तथापि हें समाधान व्यक्त करीत असतांना महाराष्ट्राचें हें राज्य संपूर्ण मराठी प्रदेशाचें नाही याबद्दल या संमेलनाला तीव्र दुःख होत आहे. १९३७ सालापासून मराठी साहित्य संमेलनाने सलगता आणि खेडें हे घटक धरून राज्याराज्यांतील सीमांचा प्रश्न सोडवावा अशी मागणी केलेली आहे. सरकारने या तत्त्वाचा अवलंब न केल्यामुळे बेळगाव, कारवार, बिदर, डांग, धरमपूर, बांसदा, संसर, त्रैसदेही, बऱ्हाणपूर इत्यादि सीमाविषयक प्रश्न अद्याप अनिर्णीत राहिले असून, त्यामुळे या भागांत अन्यायमूलक असंतोषाला जागा राहिली आहे. हा अन्याय आणि असंतोष दूर करण्याची आणि विशेषतः म्हैसूर राज्यांतील मराठी सीमेचा अतिशय निकडीचा प्रश्न सोडविण्याची जबाबदारी मुख्यतः महाराष्ट्र-राज्य-सरकारवर पडते; म्हणून या बाबतींत त्या सरकारने निकराचे प्रयत्न करावेत अशी या संमेल-नाची आग्रहाची मागणी असून, त्या प्रयत्नांना साहित्यिकांचें संपूर्ण सहकार्य राहील, असें हें संमेलन आश्वासन देत आहे.

सूचक : श्री. शं. नवरे          अनुमोदक : बा, रं. सुंठणकर

३ :

नवीन महाराष्ट्र-राज्याच्या कारभाराची भाषा मराठी राहील असें मुख्य मंत्र्यांनी पहिल्याच दिवशीं घोषित केलें याबद्दल हें सम्मेलन त्यांचें अभिनंदन करीत आहे. राज्यकारभाराची आणि विद्यापीठांतील माध्यमाची भाषा लोकशाही प्रथेस अनुसरून मराठी करण्यासाठी येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठी सर्व मराठी साहित्यसंस्था सरकारला आवश्यक तें सर्व साहाय्य करण्यास तयार आहेत, असें हें सम्मेलन महाराष्ट्र-राज्यसरकारला आश्वासन देत आहे.

—अध्यक्षांकडून

४ :

लोकप्रियतेच्या मोहाने उत्तानता, अश्लीलता इ. मार्गांनी वाङ्मयाला वैकारिक वळण देण्याचा अलीकडे चाललेला वाढता प्रयत्न मराठी वाङ्मयाच्या निकोप वाढीला विघातक होईल अशी या संमेलनाला भीति वाटते. म्हणून महाराष्ट्र-राज्यस्थापनेने मराठी भाषा सिंहासनाधिष्ठ होत असतांना आणि अशिक्षित समाजांत शिक्षणाचा झपाट्याने प्रसार होत असतांना वाचकांची सदभिरुचि वाढविण्याची साहित्यिकांवर विशेषच जाबाबदारी पडते असें या संमेलनाचें मत आहे.

—अध्यक्षांकडून

५ :

उत्तमोत्तम पुस्तकांना पारितोषकें देण्याचें धोरण राज्यसरकारने अवलंबिलें आहे, त्याचें हें संमेलन स्वागत करीत आहे. परंतु मराठी भाषेच्या आणि मराठी माणसाच्या सांस्कृतिक अभिवृद्धीसाठी धडपडणाऱ्या लोकांची आबाळ चालूच आहे. या लोकांना अनेक प्रकारचें साहाय्य व सवलती यांची आवश्यकता आहे. राज्यांतील साहित्यिकांची काळजी घेणें हें राज्यसरकारचें कर्तव्य आहे. सरकारी साहाय्यावर साहित्यिकांचा हक्क आहे. म्हणून हें संमेलन सरकारकडे अशी मागणी करीत आहे की, निरनिराळ्या जिल्ह्यांतील मान्यवर साहित्यसंस्थांमार्फत कार्य करणाऱ्या साहित्यिकांना प्रवासाच्या, ग्रंथालयांच्या, ऐतिहासिक स्थळांना भेटी देण्याच्या, सरकारी योजनांची माहिती करून देण्याच्या व लेखनकार्यास आवश्यक अशा अन्य सोई-सवलती सरकारने उपलब्ध करून द्याव्यात. तसेंच या साहित्यिकांना शक्य तें आर्थिक साहाय्य व ग्रंथप्रकाशनासाठी साहाय्य करावें. मात्र या साहाय्यामुळे साहित्यिकांच्या विचार व लेखन यांच्या स्वातंत्र्यावर नकळत मर्यादा पडण्याचा संभव आहे.

निःस्पृहता हा मराठी लेखनाचा बाणा ध्यानीं बाळगून लेखकांनी या धोक्यापासून सावध राहावें असाहि इशारा हें संमेलन देत आहे. सरकारनेहि लेखकांची राजकीय व सामाजिक मतें लक्षांत न घेतां त्यांना सर्वतोपरी साहाय्य करावें.

सूचक : वसंत वैद्य अनुमोदक : द. य. केळकर

६

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या परीक्षांना सरकारी मान्यता मिळावी; व त्या परीक्षा दिलेल्यांना सरकारी, निमसरकारी अगर खाजगी नोकरींत त्या त्या पदवीनुरूप वेतनश्रेणी देण्यांत यावी. असा ठराव यापूर्वी अनेकदा करण्यांत आला आहे,

मध्यवर्ती सरकारने हिंदीच्या परीक्षांना या प्रकारें पदवी-परीक्षांचा दर्जा देऊन भाषा-विषयक विशेष ज्ञानाला मान्यता देण्याची प्रथा पाडली आहे. महाराष्ट्र-राज्याने ही गोष्ट त्वरित करण्यांत यापुढे विलंब लावूं नये असें या सभेचें मत आहे.

सूचक : चंद्रकुमार डांगे अनुमोदक : ग. प्र. प्रधान

७ :

महाराष्ट्र साहित्य परिषदेने शुद्धलेखनाचे जे नियम स्वीकृत केले आहेत ते मुंबई सरकारच्या शिक्षणखात्याने अधिकृत म्हणून मान्य केले आहेत. याबद्दल हें संमेलन खात्याचें अभिनंदन करीत आहे. सरकारने आपल्या राज्यकारभाराच्या मराठी भाषेंतहि याच शुद्धलेखन-नियमांचा अवलंब करावा, अशी या संमेलनाची आग्रहाची मागणी आहे

मुंबई विश्वविद्यालयाने या नियमांना अद्यापि मान्यता दिली नाही, ती तावडतोब द्यावी असा या संमेलनाचा आग्रह आहे.

सूचक : ज. के. रानडे अनुमोदक : नी. गो. पंडीतराव

८ :

मुंबई (महाराष्ट्र) राज्यसरकारने प्रतिवर्षी मराठींतील उत्कृष्ट ग्रंथांना पारितोषिकें देण्याचा जो उपक्रम सुरू केला आहे त्याबद्दल हें संमेलन सरकारला धन्यवाद देत आहे. तथापि पारितोषिकें देणारी सरकारनियुक्त समिति अधिक प्रातिनिधिक व कार्यक्षम होण्याच्या दृष्टीने सरकारने महाराष्ट्र साहित्य परिषदेसारख्या संस्थांचें सहकार्य घ्यावें अशी या संमेलनाची आग्रहाची मागणी आहे.

सूचक : दु. का. सन्त अनुमोदक : न. का. घारपुरे

९

लेखनविषयक पुढील उपेक्षित गोष्टींकडे हें संमेलन सर्वांचें लक्ष वेधूं इच्छितें:—

(१) ॲ ऑ या स्वरांना मान्यता देण्यांत येऊन स्वरमालेंत त्यांना निश्चित स्थान द्यावें.

(२) अ हें अक्षर व त्यानंतर क ते ज्ञ हीं मराठी अक्षरें मिळून ३७ अक्षरांचें सूत्र प्रमाण अक्षरसूत्र म्हणून मानण्यांत यावें.

(३) काना नसलेल्या व्यंजनांत य मिळवितांना य या चिन्हाचा उपयोग करावा.

सूचक : मधुकर ना. गोगटे अनुमोदक : वी. शि. आपटे

१० :

विदर्भ साहित्य संघ, मराठवाडा साहित्य परिषद् यांच्या परीक्षांना सरकारी, निमसरकारी अथवा खाजगी नोकरींत त्या त्या पदवीनुसार वेतनश्रेणी देण्यांत यावी, या दृष्टीने त्या त्या संस्थांनी यापूर्वी अनेकवार मागणी केलेलीच आहे. त्या मागणीला हें संमेलन पाठिंबा देत असून, या बाबतींत महाराष्ट्र-राज्यसरकारने या संस्थांच्या परीक्षांना त्वरित मान्यता द्यावी, अशी या संमेलनाची आग्रहाची विनंती आहे.

—अध्यक्षांकडून

११

## कोकणी आणि मराठी

कोकणी ही मराठी भाषेचीच एक सुंदर व मधुर बोली आहे. त्या बोलीचें हें सौंदर्य आणि माधुर्य जोपासलें जावें हें योग्य असलें तरी कोकणी ही स्वतंत्र भाषा म्हणून शिरगणतीच्या हिशेबांत मराठीपासून तोडून दाखविण्याने मराठी भाषिकांत फूट पाडल्यासारखें होईल, असें हें संमेलन सरकारच्या नजरेस आणून देत आहे. पुढील वर्षी होणाऱ्या शिरगणतींत मातृभाषेची नोंद करतांना महाराष्ट्र-राज्यसरकारने वेळींच याविषयीं दक्षता बाळगावी अशी या संमेलनाची विनंती आहे. तशीच या संमेलनाची कोकणी भाषिकांनाहि अशी विनंती आहे की, शिरगणतीचे वेळीं आपल्या मातृभाषेची नोंद 'मराठी' अशी व्हावी म्हणून त्यांनी अत्यंत जागरूक राहावें.

सूचक : द. वा. पोतदार | अनुमोदक : श्री. के. क्षीरसागर

१२ :

मराठी भाषा व संस्कृति यांची आस्थापूर्वक सदैव जोपासना करणारा गोमंतक हा मराठी भाषिकांचा प्रदेश आज अनेक शतकें पोर्तुगीज अमलाखालीं आहे. त्या पोर्तुगीज सरकारच्या अमलांत मराठी भाषा आणि संस्कृति यांचा विकास होऊं नये या हेतूने गळचेपीचें धोरण आजतागायत बुद्धिपुरस्सर सतत चालविण्यांत येत आहे. म्हणून गोमंतक आणि पोर्तुगीज अमलाखालील अन्य मराठीभाषी भागांतील मराठी भाषिकांचा भाषिक आणि सांस्कृतिक विकास घडवून आणणें दुरापास्त होत आहे; आणि संयुक्त महाराष्ट्रांत राहिलेली अपूर्णता दूर होत नाहीं; ही गोष्ट भारत सरकारच्या नजरेस हें संमेलन पुनः एकदा आणीत आहे.

पोर्तुगिजांच्या अमलाखालील बहुसंख्य मराठी भाषिकांचा दादरा आणि नगरहवेली हा भाग स्वयंप्रेरणेने मुक्त झालेला आहे. या संबंधांत पोर्तुगीज सरकारने केलेला दावाहि हेग येथील आंतरराष्ट्रीय न्यायालयाने अमान्य केला आहे. आता हा मुक्त प्रदेश महाराष्ट्राचा भाग असल्याने तेथील मराठी भाषिकांचा भाषिक आणि सांस्कृतिक विकास घडवून आणण्याच्या दृष्टीने सर्व प्रकारची आवश्यक ती खटपट महाराष्ट्र राज्यसरकारने करावी अशी या सम्मेलनाची विनंती आहे.

सूचक : प्र. के. अत्रे | अनुमोदक : जनाप्पा कामत

१३ :

महाराष्ट्र-राज्याची राज्यभाषा ज्याअर्थी आता मराठी असावी असें ठरलें आहे, त्याअर्थी महाराष्ट्र-राज्यांतील उच्च न्यायालयांसुद्धा सर्व न्यायालयांतील कामकाज मराठींतूनच चालावें व न्यायाधिशांनीहि आपले निकाल, हुकूम व हुकूमनामे सर्व मराठींतूनच लिहावेत व यासाठी महाराष्ट्र-राज्याने स्वतः तर कायदा करावाच परंतु संसदेलाहि तसा कायदा करण्यास विनंती करावी, अशी या संमेलनाची महाराष्ट्र राज्यसरकारला विनंती आहे.

सूचक : न. का. घारपुरे | अनुमोदक : श्री. वि. गाडगीळ

# ग्रंथसूचि ( १९५९ )

( तयार करणार– म. श्री. दीक्षित )

[ ग्रंथकार, ग्रंथनाम, प्रकाशक, पृष्ठसंख्या व मूल्य )

## लघुकथा

१. अग्निहोत्री अंबादास–अंजला, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; ११८, ३=००.
२. अग्निहोत्री अं. शं.–वृंदा आणि इतर कथा, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; १२८, ३=००.
३. अत्रे प्र. के.–हास्यकथा–( भाग २ रा ), देशमुख आणि कं. ७३९ बुधवार, पुणें २; १३२, ३=५०.
४. करपे काशिनाथ व्ही.–अरळी, (संपादन), आसरा प्रकाशन, पंढरपूर; ७२, १=५०.
५. कानिटकर माधव–अस्मत, ( शिकारकथा ), व्होरा आणि कं. ७४, १=२५.
६. कानिटकर वि. ग.–मनांतलें चांदणें, मनोहर ग्रंथमाला, १६०९ सदाशिव, पुणें २; १३६; २=५०
७. कार्लेकर शि. शं.–सर्कशीच्या रिंगणांत, मॅजेस्टिक बुक स्टॉल, गिरगांव नाका; मुंबई ४; ११२, २=५०.
८. कुलकर्णी जी. ए –निळा सावळा, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १४३;४=५०.
९. कुलकर्णी द. भि.–रेक्वीयम, सौ. छाया कोलारकर, ४४ शंकरनगर, नागपूर; ११८, २=२५.
१०. कोल्हटकर शि. न.–छत्री दिली म्हणून आणि इतर गोष्टी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १५९, ३=००
११ खरात शंकरराव रा.–तारा बलुतेदार, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; १३९, ३=००.
१२. गाडगीळ गंगाधर–स्वप्नभूमी, सौ. लक्ष्मीबाई टेकाडे, ग्रँटरोड, मुंबई ७; १५२, ३=५०.
१३. गुप्ते चारुशीला–चांदण्याची वेल, बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २; १०६, २=५०.
१४. गोखले श्यामकान्त–सोनचाफा, इनामदार बंधु, ९९१ सदाशिव, पुणें२; १३३, ३=००.
१५. गोरे ना. ग.–गुलबशी, व्हीनस प्रकाशन, शनिवार, पुणें २; १००, १=५०.
१६. चिकटे सुशीला–प्रवाहिनी, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; १०४, २=००.
१७. जोगळेकर योगिनी–प्राची, मनोहर ग्रंथमाला, १६०९ सदाशिव, पुणें २; १३६, ३=००.

१८. जोशी चिं. वि.–**आरसा**, चंद्रकान्त शेट्ये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर ३; १६० ३=५०.
१९. जोशी वि. वा.–**पंचमहाल** ( लोककथा ), नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर १; ४०, ००=९०.
२०. जोशी श्री. ज.–**सुलभा**, मौज प्रकाशन, खटाववाडी, मुंबई ४; १६०, ५=००.
२१. ठोकळ ग. ल.–**ठोकळ गोष्टी** ( भाग १ ), ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणे २; २४४, ४=००.
२२. ठोमरे उमाकान्त–**कानफाटया**, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १३५, ३=००.
२३. डावरे पद्माकर–**आश्विनाचं ऊन**, कॉंटिनेंटल प्रकाशन, टिळक रस्ता, पुणे २; १४४, ३=००.
२४. डावरे पद्माकर–**ग्यानबाची मेख**, मॅजिस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; १३२, ३=७५.
२५. दसनूरकर स्नेहलता–**स्वर्ग तुच्छ भासतो**, इनामदार बंधु, ९९१ सदाशिव, पुणे २; १४७, ३=००.
२६. देशपांडे मा. का.–**पहिला पगार**, कॉंटिनेंटल बुक सर्व्हीस, अप्पाबळवंत चौक, पुणे २; १३१, ३=००.
२७. नवरे शं. ना.–**तिळा उघड**, मॅजिस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४;१३४, ३=७५.
२८. पाटील दिनकर द.–**सूर्याचं चांदण**, मायबोली प्रकाशन, ८२४ शुक्रवार, पुणे २; १५२, ३=००.
२९. पै शिरीष–**मयूरपंख**, परचुरे प्रकाशन मंदिर, गिरगांव, मुंबई ४; १००, १=००.
३०. पै शिरीष–**हापुसचे आंबे**, चंद्रकान्त शेट्ये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर३; ८५,२=००.
३१. फडके ना. सी.–**बहार**, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ११२, १=००.
३२. बर्वे अच्युत–**चांदण्यांचा सुगंध**, नवलेखन इ. ५ मॉडेल हाऊस, प्रॉक्टर रोड, मुंबई ४; १३८, ३=००
३३. बोकील वि. वि.–**अवघाचि संसार**, शेठ भगवानदास हिरजी, कांदेवाडी, मुंबई४; १६४, ३=५०.
३४. बोकील वि. वि.–**आमची आयुधें आमचें राज्य**, कुलकर्णी ग्रंथागार, शनिवार, पुणे २; १३६, ३=००
३५. बोकील वि. वि.–**रुसवे आणि फुगव**, भगवानदास हिरजी, कांदेवाडी, मुंबई ४; १४६, ३=५०
३६. भागवत दुर्गा–**तामीळनाडच्या लोककथा**, दा. त्र्यं. जोशी, चित्रशाळा, पुणे २; ३९, ००=६२.
३७. महेश–**सुरस संतकथा**, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; १४८, १=२५.
३८. माटे श्री. म.–**भावनांची मांडवी**, व्हीनस प्रकाशन, शनिवार, पुणे २; १७२, ३=५०.
३९. माडगुळकर व्यंकटेश–**घरदार**,वोरा अँड कं,काळबादेवी, मुंबई२; ११८, २=००.
४०. मिरासदार द. मा.–**ताजवा**, मनोरंजन प्रकाशन, ग्रँटरोड,मुंबई७; १५६,३=५०.
४१. रेगे सदानंद–**चांदणें**, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; १२३, ४=००.
४२. रेड्डी तारा–**जीवन**, जगताप-कारले प्रकाशन, पुणे २; १५२, २=५०

४३. लाड शंकरराव-वांधापार, घरतीराजा जीवन साहित्य प्रकाशन, माधव नगर ( द. सातारा ); ७८, १=२५.
४४. शहा नलिनी-म्हांडुग, सुरस ग्रंथमाला, सोलापूर; ११३, ३=००
४५. शांताराम-जमिनीवरची माणसं, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; १६१, ३=५०.
४६. शिखरे दा. न.-पुराणकथा ( भाग १ ला ), दि टीचर्स आयडियल पब्लि. हाऊस लि, शनिवार, पुणें २; २२२, ३=००.
४७. शुक्ल स. म.-असत्याचे प्रयोग, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ९६, १=००.
४८. सप्रे लता-मधुवंती, कुलकर्णी ग्रंथागार, शनिवार, पुणें २; १३५, ३=००.
४९. सावरकर वि. दा.- समाजाचित्रें, रा. के. नगरकर, २४७ चर्नी रोड, मुंबई ४; १६५, ४=००.

## कादंबरी

१. अग्निहोत्री अं. शं.-आवडाबाई, संजय प्रकाशन, ऑपेरा हाऊस, मुंबई ४; १७१, ४=२५.
२. अग्निहोत्री अं. शं.-खुपणारं सुख, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; १२०, ३=००.
३. अग्निहोत्री अंबादास-तात्या देवकुटे, कैलास प्रकाशन, मुंबई; ८४, २=५०.
४. उजळंबकर कृ. मु.-मायेचे कढ, नवें लेखन प्रकाशन, नागपूर; १०२, २=५०.
५. कवठेकर द. र.-रुपेरी कडा, देशमुख आणि कं. ७३९ बुधवार, पुणें २; ५११, १२=००
६. काकोडकर चंद्रकान्त-अमला, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; १२७, ३=००.
७. कानिटकर माधव-वैशाख, कुलकर्णी ग्रंथागार, १८६, शनिवार, पुणें २; १५२, ३=५०
८. कुलकर्णी कृ. शं.-काळ वदलतो आहे, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; १३१, ३=००.
९. खांडेकर वि. स.-ययाति, देशमुख आणि कं., पुणें २; ४७०, १०=००.
१०. थोरात सु. मि.-तरीहि तू मला आवडतेस, वत्सला थोरात, कॅंटो. जनरल हॉस्पिटल, पुणें १; १८४, ३=००.
११. दांडेकर गो. नी.-आम्ही भगीरथाचे पुत्र, महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती; पुणें २; ४३१, १०=००.
१२. देशपांडे पु. य.-आहुति, नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर १; १५७, ४=००.
१३. देसाई रणजित-वारी, देशमुख आणि कं. पुणें २; २२३, ५=००.
१४. देसाई स. शं-आहुति, स. शं. देसाई, माने मॅन्शन, पुणें ४; १६४, ३=५०.
१५. पेंडसे श्री. ना.-कलंदर, मौज प्रकाशनगृह, मुंबई ४; ४३५, १०=००.
१६. फडके ना. सी.-जहर, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; २१२, ५=००.
१७. फडके ना. सी.-भरारी, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; २३९, ५=००.
१८. बोकील वि. वि.-प्रीति बहीण भक्तीची, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ९५, १=००.

१९. मनमोहन–९९ नंतर, वसंत काणे, टिळकरस्ता, पुणें २; १२८, ३=५०.
२०. माडखोलकर ग. त्र्यं.–रुक्मिणी, देशमुख आणि कं., पुणें २, २९८, ७=००.
२१. रझ्झाक–सुलताना, इनामदार बन्धू, ९९१, सदाशिव, पुणें २; १४६, ३=००.
२२. लोहोकरे पां. गो.–तें जग वेगळेंच आहे, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; १३४, ३=००.
२३. लोहोकरे पां. गो.–शुभमंगल सावधान, सदाभिरुचि प्रकाशन, ७७३ सदाशिव, पुणें २; १८१, ३=००.
२४. शिरधनकर भानू–कारवारचा काळूराम, जेरभाई वाडिया रोड, अभिनव प्रकाशन, परळ-मुंबई १२; ९६, २=५०.
२५. शेळके उद्धव ज.–नांदतं घर, शाम प्रकाशन, अमरावती; ११५, २=५०.
२६. साठे अण्णाभाऊ–फकिरा, अभिनव प्रकाशन, परळ-मुंबई १२; १९६, ४=००.
२७. साठे अण्णाभाऊ–वैजयंता, मॅजिस्टिक बुक स्टॉल, गिरगाव नाका, मुंबई ४; १५४, ३=७५.

## कविता

१. करंदीकर विंदा–धृपद, पॉप्युलर बुक डेपो, लॅमिंग्टन रोड, मुंबई ७; १२२, ५=००.
२. के. अंबादास–मन्दिर, कुलकर्णी ग्रंथागार, १८६ शनिवार, पुणें २; ८८, २=००.
३. जोशी ना. ग.–प्राचीन गीत भांडार, ( संपादन ), मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; २६१, १०=००.
४. ढेरे रा. चिं.–हरिवरदा खंड ५ वा ( संपादन ), द. र. कोपर्डेकर, ५२९ सदाशिव, पुणें २; २९०, ८=००.
५. तांबोळी लक्ष्मीकान्त–हुंकार, मराठी साहित्य परिषद्, इसामिया बाजार, हैद्राबाद; ३६, ००=७५.
६. दीक्षित मीना–मीना, सौ. शशिकला दीक्षित, ६९० बुधवार, पुणें २; १०२. विना मूल्य.
७. देशपांडे ज. शा.–नवें नवनीत, ( संपादन ), लोकसाहित्य, ८७ शिवाजी पार्क. मुंबई २८; ६८०, १०=००.
८. देशपांडे आणि प्रभु–आरती, ( संपादन ), सहकार प्रकाशन, पंढरपूर; ३२, १=००.
९. देशपांडे म. श्री.–श्रीगुरुदेव चरितामृत, म. श्री. देशपांडे, निंबाळ ( विजापूर ); ४०, ००=५०.
१०. पै शिरीष–कस्तुरी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६८, २=५०.
११. प्रफुल्लदत्त–लाटा आणि लहरी, इनामदार बंधू, ९९१ सदाशिव, पुणें २; ९४, २=००.
१२. प्रभु आरती–जोगवा, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ११२, ३=५०.
१३. बावर सरोजिनी–रुखवत, ( स्त्रीगीतें ), समाजशिक्षण प्रकाशन, १४८६ सदाशिव पुणें २; १२८, २=५०.
१४. बेंद्रे वा. सी.–योगसंग्राम, ( शेख महंमदबाबा श्रीगोंदेकरकृत ). पी. पी. एन्ड बुकस्टॉल, मुंबई ४; २४२, ६=००.

१५. बोरगावकर रविन्द्र–रूजवा, मराठी सा. परिषद्, इसामिया बाजार, हैद्राबाद; ३६, ००=७५.
१६. भारती प्र. अ.–गंधवती, ( संकलन ), सुप्रभा प्रकाशन, बडनेरा; ३२, ००=७५.
१७. मराठे संजीवनी–परिमला, संजीवनी मराठे, एरंडवन, पुणे ४; ३२, १=००.
१८. महाजन दे. ल.–श्री देवी महात्म्यसार, ( प्राकृत दुर्गा सप्तशती ), महाजन साहित्य प्रकाशन, होळी, नांदड, १९३, ७=००.
१९. मांडवकर–भोयर साखरकर–सेलूकर–नव्हाळी ( संपादन ), सेवा प्रकाशन, रहाटे कॉलनी, जेल रोड, नागपूर १; १०४, २=५०.
२०. यशवन्त–पर्वकाल ये नवा, सौ. नीराबाई वेंढरकर, १९६ ३४ सदाशिव, पुणे २; ७०, २=००.
२१. रसगंगाधर–जाग, गं. वि कुलकर्णी, गोखले कॉलेज, कोल्हापूर; ११२, ३=००.
२२. रानडे भा. ल.–कल्पफुलें, ( संपादन ), सहकार प्रकाशन, सांगली; ९८, २=००.
२३. रामाणी शंकर–कातरवेळ, सागर साहित्य प्रकाशन, त्रिभुवन रोड, मुंबई ४; ५४, १=५०.
२४. रेगे पु. शि.–पुष्कळा, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ६७, ३=००.
२५. सोनारे श्याम–गन मन भवरी, अभय प्रकाशन, देशमुखपुरा, वरुड ( विदर्भ ); ६४, २=००.

## नाटक–एकांकिका

१. अणसूरकर ना. र.–कोरडे नवरे, श्री. र. अणसूरकर, ४ पितांबरवाडी, मुंबई १६; ८७, १=५०.
२. आचरेकर आबासाहेब–बुद्धं सरणं गच्छामि, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ६६, १=५०.
३. आचरेकर आबासाहेब–भांगेतील तुळस, परचुरे प्रकाशनमंदिर मुंबई ४; ७७, २=००.
४. आपटे गो. ना –संगीत उत्तराविवाह, मानवता प्रकाशन, रामानंदनगर ( द. सातारा ); ३२, ००=७५.
५. आयरे ला. कृ.–जया अंगीं मोठेपण, परचुरे प्रकाशनमंदिर, मुंबई ४; ८२, २=००.
६. आग्रीकर मधुकर–तीन इसम तेरा आणे, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; ७०, १=७५.
७. ओक शा. नि.–गड्या आपुला गाव बरा, परचुरे प्रकाशनमंदिर, मुंबई ४; ६७, २=००.
८. कारंडे गुरुजी मा. आ.–संगीत जयबुद्ध, सुभाष प्रकाशन. मुंबई २१; ६४, १=५०.
९. कुलकर्णी माधव–प्रेमाविना भिकारी, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४, ६४, २=००.
१०. केळकर राम–दोघांचा संसार, सिद्धार्थ साहित्य, बनाम हॉल लेन, मुंबई ४; ७५, २=००.

११. कोल्हटकर प्र. श्री.–सेवा, मॉडर्न बुक डेपो, बाजीराव रस्ता, पुणें २; ११२, १=५०.
१२. गोखले श्यामकान्त–शेवटचा अंक (एकांकिका), व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; १७, ००=५०.
१३. चव्हाण शं. ब.–भाड्याचें घर, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ८०, १=५०.
१४. जाधव वसन्त–प्राणाचं दान, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; ६४, १=७५.
१५. जोग नाना–हॅम्लेट, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १०५, ३=५०.
१६. जोशी वि. शं.–आकाशवाणी, के. गो. निंबकर, ठाणें; ७२, १=५०.
१७. जोशी वि. शं.–शिलंगण, य. के. कदम, मुंबई; ७०, १=५०.
१८. ताम्हनकर ना. धों.–एकसष्टी, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ७२, १=७५.
१९. ताम्हनकर ना. धों.–जगावेगळी, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ६६, १=५०.
२०. दातार ग. के.–खेड्यांत चला, बापट आणि कं., मुंबई २; ६०, १=५०.
२१. दुदवडकर व. स.–भलेबहाद्दर, त्रिं. वि. परचुरे, मुंबई ४; ११०, २=०.
२२. धनवटे सुमातिदेवी–धुळींचे कण, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७२, २=००.
२३. धारप वि. ग.–बुवाचा कावा, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६८, २=००.
२४. परकर दि. श्री.–धनदौलत, सुनाद प्रकाशन, मुंबई २८; ७२, २=००.
२५. प्रभू ववन–झोपीं गेलेला जागा झाला, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ११२, २=००
२६. पाटील के. डी.–कर्तव्याची कसोटी, कोठावळे प्रकाशन, मुंबई ४; ४८, १=५०.
२७. पारखी गो. गं.–अक्षांशरेखांश, इनामदार बंधू, ९९१ सदाशिव, पुणें २; ८५, २=००.
२८. भट गो. के.–ऊरुभंग आणि इतर नाटकें, मॉडर्न बुक डेपो, पुणें २; ९०, १=५०
२९. भोसले चिं. तु.–सप्त जन्मीचं नातं आपुलं, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६४, २=००.
३०. भोसले म. भा.–लाडकी लेक, ग्रामीण प्रकाशन, धनगाव, भिलवडी, (द. सातारा); ८१, २=००.
३१. महाजनी ह. रा.–संगीत शकुंतला, व्ही. जी. कुलकर्णी, शिवाजीपार्क, मुंबई २८; ८७, २=००.
३२. मुंगर्शाकर गो. कृ.–मराठ्यांचें सिंहासन, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ८६, २=००.
३३. मुंढे वा. ब.–यंदा कर्तव्य आहे, चंद्रकान्त शेट्ये प्रकाशन मंदिर कोल्हापूर ३; ११६, २=००.

३४. रांगणेकर कुमुदिनी.– वच्चू लछमन, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७२, २=००.
३५. रांगणेकर कुमुदिनी–स्पर्धेचा निकाल (नाटिका), ना. द. ठाकूर, पुणें २; ३४, ००=७५.
३६. रेगे सदानंद– जयकेतु (भाषांतर), पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १३२, ५=००,
३७. लाटे दिनानाथ – ओवाळणी, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ९६, २=००.
३८. लिमये गो. गं.– कबुलीजबाब (अनुवाद), कल्पना प्रकाशन, सदाशिव, पुणें २; ११५, १=००.
३९ शिवलकर मु. गो.–एकरूप होऊं सगळे, रा. सा. सारंग, बी. आय. टी-चाळ ४, परळ; ७२, १=५०.
४० शुक्ल स.अ.–आम्ही एकशेपांच, त्रिं. वि. परचुरे, मुंबई ४; १०५, १=७५.
४१ सगदेव रा. पु.–नाट्यछटा, कॉंटिनेंटल् प्रकाशन, पुणें २; ५१, १=५०.
४२ साकीकर श्रीकृष्ण–लग्नाला चला, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ७९, १=७५.
४३ साठे मो. स.–पुरुषोत्तम, त्रि. स. साठे, ७५४ शुक्रवार, पुणें २; १०१, २=००.
४४ साठे शं. गो–स्वप्नींचें हें धन, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; ७८, २=००.
४५ सूर्यवंशी कृ. गो.–तुम्हीं तिथं आम्ही, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७४, २=००.

## चरित्र आत्मचरित्र

१. काळे बाबुराव–यशवन्तराव चव्हाण, ना. द. रेगे, मुंबई १६; ४४४, ७=००.
२. कुलकर्णी पु. वा.–ना. नानाशंकर शेट यांचें चरित्र (काळ व कामगिरी), नाना शंकरशेट चरित्र प्रकाशन समिति, १३ बरोज क्रॉस लेन, मुंबई २; ६०५, १२=००.
३. केळकर गिरिजाबाई–द्रौपदीची थाळी, मनोहर ग्रंथमाला, टिळकरस्ता, पुणें २; १३६, २=५०.
४. केळकर न. चिं–माझा जन्मभरचा एक उद्योग, अ. त्रि. गृह प्रकाशन, पुणें २; १८४; २=००.
५. केळुसकर वि.वि.–श्री समर्थ नारायणमहाराज महाडेश्वर यांचे संक्षिप्त चरित्र, वि. वि. केळुसकर, शिरोडा (रत्नागिरी); ४४, ००=७५
६. कोल्हटकर चिं. ग.–राम गणेश गडकरी, ह. वि. मोटे, ३ वेस्ट व्ह्यू, मुंबई १४; १५४, ६=००.
७. कोठारी वा. रा –शिवचरित्र, सी.एन. गांधी, ३५८ नारायण, पुणें २; ९१, १=५०.
८. गाडगीळ न. वि.–माझे समकालीन, व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; १६४, ४=००.
९. गोखले द. न.–डॉ. केतकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३१०, १२=५०.
१०. जोग प्र. वा.–मी हा असा आहे, सौ. प्रमिला जोग, १५६९ सदाशिव, पुणें २; २९६, ५=००.
११. जोशी चिं. वि. व घारपुरे न. का.–चित्रकार पिंपळखरे, पिंपळखरे स्मा. समिति, ७६६ सदाशिव, पुणें २; ३१, ००=५०
१२ ढेरे रा. चिं.–श्री गुरु गोरखनाथ, (चरित्र आणि परंपरा), वोरा अँड कं. पब्लिशर्स, मुंबई २; २४४, ५=५०.

११. कोल्हटकर प्र. श्री.–सेवा, मॉडर्न बुक डेपो, बाजीराव रस्ता, पुणें २; ११२, १=५०.
१२ गोखले श्यामकान्त–शेवटचा अंक (एकांकिका), व्हीनस बुक स्टॉल, पुणें २; १७, ००=५०.
१३. चव्हाण शं. ब.–भाड्याचें घर, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ८०, १=५०.
१४. जाधव वसन्त–प्राणाचं दान, रामकृष्ण बुकडेपो, मुंबई ४; ६४, १=७५.
१५. जोग नाना–हॅम्लेट, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १०५, ३=५०.
१६. जोशी वि. शं.–आकाशवाणी, के. गो. निंबकर, ठाणें; ७२, १=५०.
१७. जोशी वि. शं.–शिलंगण, य. के. कदम, मुंबई; ७०, १=५०.
१८. ताम्हनकर ना. धों.–एकसष्टी, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ७२, १=७५.
१९. ताम्हनकर ना. धों.–जगावेगळी, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; ६६, १=५०.
२०. दातार ग. के.–खेड्यांत चला, बापट आणि कं., मुंबई २; ६०, १=५०.
२१. दुदवडकर व. स.–भलेबहाद्दर, त्रिं. वि. परचुरे, मुंबई ४; ११०, २=०.
२२. घनवटे सुमतिदेवी–धुळीचे कण, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७२, २=००.
२३. धारप वि. ग.–बुवाचा कावा, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६८, २=००.
२४. परकर दि. श्री.–धनदौलत, सुनाद प्रकाशन, मुंबई २८; ७२, २=००.
२५. प्रभू बवन–झोपीं गेलेला जागा झाला, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ११२, २=००
२६. पाटील के. डी.–कर्तव्याची कसोटी, कोठावळे प्रकाशन, मुंबई ४; ४८, १=५०.
२७. पारखी गो. गं.–अक्षांशरेखांश, इनामदार बंधू, ९९१ सदाशिव, पुणें २; ८५, २=००.
२८. भट गो. के.–ऊरुभंग आणि इतर नाटकें, मॉडर्न बुक डेपो, पुणें २; ९०, १=५०
२९. भोसले चिं. तु.–सात जन्मीचं नातं आपुलं, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ६४, २=००.
३०. भोसले म. भा.–लाडकी लेक, ग्रामीण प्रकाशन, धनगाव, भिलवडी, (द. सातारा); ८१, २=००.
३१. महाजनी ह. रा.–संगीत शकुंतला, व्ही. जी. कुलकर्णी, शिवाजीपार्क, मुंबई २८; ‍, २=००.
३२. मुगशीकर गो. कृ.–मराठ्यांचें सिंहासन, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ८६, २=००.
३३. मुंढे वा. ब.–यंदा कर्तव्य आहे, चंद्रकान्त शेट्ये प्रकाशन मंदिर कोल्हापूर ३; ११६, २=००.

३४. रांगणेकर कुमुदिनी.– वच्चू लछमन, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७२, २=००.
३५. रांगणेकर कुमुदिनी–स्पर्धेचा निकाल (नाटिका), ना. द. ठाकूर, पुणे २; ३४, ००=७५.
३६. रेगे सदानंद– जयकेतु (भाषांतर), पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १३२, ५=००,
३७. लाटे दिनानाथ – ओवाळणी, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ९६, २=००.
३८. लिमये गो. गं.– कबुलीजबाब (अनुवाद), कल्पना प्रकाशन, सदाशिव, पुणे २; ११५, १=००.
३९ शिवलकर मु. गो.–एकरूप होऊं सगळे, रा. श्रा. सारंग, बी. आय. टी-चाळ ४, परळ; ७२, १=५०.
४० शुक्ल स.अ.–आम्ही एकशेपांच, त्रि. वि. परचुरे, मुंबई ४; १०५, १=७५.
४१ सगदेव रा. पु.–नाट्यछटा, कॉंटिनेंटल् प्रकाशन, पुणे २; ५१, १=५०.
४२ साक्रीकर श्रीकृष्ण–लग्नाला चला, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; ७९, १=७५.
४३ साठे मो. स.–पुरुषोत्तम, वि. स. साठे, ७५४ शुक्रवार, पुणे २; १०१, २=००.
४४ साठे शं. गो–स्वप्नींचें हें धन, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; ७८, २=००.
४५ सूर्यवंशी कृ. गो.–तुम्ही तिथं आम्ही, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७४, २=००.

## चरित्र आत्मचरित्र

१. काळे बाबुराव–यशवन्तराव चव्हाण, ना. द. रेगे, मुंबई १६; ४४४, ७=००.
२. कुलकर्णी पु. बा.–ना. नानाशंकर शेट यांचें चरित्र (काळ व कामगिरी), नाना शंकरशेट चरित्र प्रकाशन समिति, १३ बरोज क्रॉस लेन, मुंबई ४; ६०५, १२=००.
३. केळकर गिरीजाबाई–द्रौपदीची थाळी, मनोहर ग्रंथमाला, टिळकरस्ता, पुणे २; १३६, २=५०.
४. केळकर न. चिं–माझा जन्मभरचा एक उद्योग, अ. वि. गृह प्रकाशन, पुणे २; १८४; २=००.
५. केळुसकर वि.वि.–श्री समर्थ नारायणमहाराज महाडेश्वर यांचे संक्षिप्त चरित्र, वि. वि. केळुसकर, शिरोडा (रत्नागिरी); ४४, ००=७५
६. कोल्हटकर चिं. ग.–राम गणेश गडकरी, ह. वि. मोटे, ३ वेस्ट व्ह्यू, मुंबई १४; १५४, ६=००.
७. कोठारी वा. रा –शिवचरित्र, सी.एन. गांधी, ३५८ नारायण, पुणे २; ९१, १=५०.
८. गाडगीळ न. वि.–माझे समकालीन, व्हीनस बुक स्टॉल, पुणे २; १६४, ४=००.
९. गोखले द. न.–डॉ. केतकर, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३१०, १२=५०.
१०. जोग प्र. वा.–मी हा असा आहे, सौ. प्रमिला जोग, १५६९ सदाशिव, पुणे २; २९६, ५=००.
११. जोशी चिं. वि. व घारपुरे न. का.–चित्रकार पिंपळखरे, पिंपळखरे स्मा. समिति, ७६६ सदाशिव, पुणे २; ३१, ००=५०
१२. ढेरे रा. चिं.–श्री गुरु गोरखनाथ, (चरित्र आणि परंपरा), वोरा अँड कं. पब्लिशर्स, मुंबई २; २४४, ५=५०.

१३. तळवलकर गोविंद–लोकमान्य टिळक दर्शन, कॉंटिनेंटल प्रकाशन पुणें २; १२०, २=००.

१४. थत्ते यदुनाथ–आधुनिक भारत महर्षि, श्रीराम प्रकाशन, ठाकुरद्वार, मुंबई २; ९४, १=२५.

१५. दांडेकर गो. नी.–श्रीकृष्णायन, मॅजिस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; ३२४, ५=००.

१६. दीक्षित म. श्री.–तात्या टोपे, चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; ६२, १=००.

१७. देशपांडे ह. वा.–१८५७च्या वीर महिला, ठाकुर आणि कं. लि. अमरावती; १८५, ४=००.

१८. देसाई व. शां.–बालगंधर्व व्यक्ति आणि कला, व्हीनस प्रकाशन, शनिवार पुणें २; २४०, ६=००.

१९ नाईक म रा.–श्री स्वामी शिवानंद. ( चरित्र व तत्त्वज्ञान ) महाराष्ट्र ग्रंथभांडार, कोल्हापूर; ११६, २=००.

२०. पुरंदरे ब मो.–राजा शिवछत्रपति, (भाग ६ते१०), राजहंस प्रकाशन, १५०० सदाशिव पुणें २; ११८, १९०, १२६, १६८, १२२; ३=०० ( प्रत्येकी ).

२१. मराठे अ. वा.–संतश्रेष्ठ तुकाराम, ( संपादन ), तुकाराम बुक डेपो, माधवबाग, मुंबई ४; ७६, १=००.

२२. वरेरकर भा. वि.–माझा नाटकी संसार (१९१४–१९२०), वसंतकुमार सराफ, मॉडेल हाऊस. प्रॉक्टर रोड, मुंबई ४; २१८, ६=००.

२३. श्रीखंडे रा. चिं.–वाङ्मयत्रिवेणी, य. रा. श्रीखंडे, बेलबाग, कोल्हापूर; १२४, ३=००.

२४. सहस्रबुद्धे मा. के.–रामभाऊ मंडलीक यांचे जीवनचरित्र, शं. न. आगाशे, १४४५ सदाशिव, पुणें २; १५५, ३=००.

२५. क्षीरसागर श्री. के.–सागरमंथन, व्हीनस प्रकाशन, शनिवार, पुणें २; १६१, ३=५०

## टीकात्मक

१. कुलकर्णी वा. ल.–श्रीपाद कृष्णःवाङ्मयदर्शन, पाप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ११२, ४=००.

२. कुलकर्णी श्री. मा.–ज्ञानेश्वरीतील शिकवण, उन्मेष प्रकाशन, नागपूर २; ३९५; ९=००.

३. खोटे नंदू–नाट्यदर्शन–अर्थात नाटक कसें बसवावें?, रामकृष्ण बुक डेपो, मुंबई ४; १६०, ३=००.

४. गुप्ते चारुशीला–कीचकवधाचे रुपरंग, बा. ल. पाठक प्रकाशन, मुंबई २; ६०, १=००.

५. जोशी बाबूराव–संगीताने गाजलेली रंगभूमि, स्कूल अँड कॉलेज बुक स्टॉल, कोल्हापूर; २५२, ४=००.

६. दाभाडे बालकृष्ण–कलाविमर्श, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; १४३, ३=००.

७. पेंडसे – फाटक-कोलते–लक्ष्मणशास्त्री–कमलाबाई देशपांडे–सरदार–महाराष्ट्र धर्माचे प्रणेते (नभोवाणी व्याख्यानें),पब्लिकेशन डिव्हिजन दिल्ली८;१४४, १=५०.
८. पोतदार द. वा.–श्रोते हो, व्हीनस बुक स्टॉल, पुणें२; २०४, ४=००.
९. भट गो. के.–विदूषक, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; ४७२, ९=५०.
१०. मालशे स. गं.–आवडनिवड, मॅजिस्टिक बुक स्टॉल, मुंबई४; १७९, ५=००.
११. वाळिंबे रा. शं.–प्राचीन भारतीय कला (इतिहास आणि रूपदर्शन, भाग १ ला), मेसर्स जोशी-लोखंडे प्रकाशन, टिळक रस्ता, पुणे २; १२८, ६=००.
१२. शेजवलकर त्र्यं. शं.–शेजवलकरांचे लेख (पुस्तक २रें), ह.वि. मोटे प्रकाशन, ३ वेस्ट व्ह्यू, मुंबई१४; १८४, ६=००.
१३ सहस्रबुद्धे पु. ग.–राजविद्या, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें२; १८३; ३=५०.

## प्रवास–स्थळवर्णनें

१. काणेकर अनंत–रक्ताची फुलें, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; ७४, १=००.
२. गाडगीळ गंगाधर–साता समुद्रापलीकडे, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १४५, ४=५०.
३. गोखले अरविंद–अमेरिकेस पहावें जाऊन, मनोहर ग्रंथमाला, सदाशिव, पुणें २; १३३, ३=००.
४. घाणेकर भा. गो.–काशीवाराणशीदर्शन, भा. गो. घाणेकर, शेवडे बोळ, पुणें२; १७९, ३=००.
५. देशमुख ज. पां.–मला दिसलेला रशिया, व्हीनस प्रकाशन, शनिवार, पुणें २; १०२, २=००.
६. नाडकर्णी ज्ञानेश्वर–विलायती वारी, (सचित्र), मनीषा प्रकाशन, मुंबई ७; १३०, ७=५०.
७. पाठक गौतमबुवा-श्री सोमनाथ तीर्थ, त्र्यं. र. पाठक, यशवन्त महाराज मंदिर; नाशिक; १७२, ५=००.
८. पाध्ये प्रभाकर–उडता गालिचा, पॉप्युलर बुकडेपो, मुंबई ७; १२३, ३=५०.

## ललित गद्य

१. आपटे गो. ना.–*ग्रामीण चित्रें,मानवता प्रकाशन,किर्लोस्करवाडी; १४०,२=५०.
२. काणेकर अनंत–बोलका ढलपा, परचुरे प्रकाशन मंदिर, मुंबई ४; २५५,७=५०.
३. खांडेकर वि. स.–मंझधार, देशमुख आणि कं, पुणें २; ३५४; १२=००.
४. खैर ग. श्री.–सदाचार चिंतनी, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; ८०, १=५०,
५. घाटे वि. द.–*पांढरे केस-हिरवीं मनें, मौज प्रकाशन, मुंबई ४; १३६,४=००.
६. चव्हाण शं. ब.–मनाचा पारवा, चंद्रकान्त शेट्ये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर. ३; १०३, २=५०.
७. ढेरे रामचंद्र–*अमृतकन्या, सरस्वति प्रकाशन, ४१४ सदाशिव, पुणें २; ९६ २=००.

८. दिवाण कुंदर–पू. विनोबांच्या जंगम विद्यापीठांत ( प्रवचनें ), चित्रशाळा प्रकाशन, पुणें २; १७७, ३=५०.
९. पटवर्धन वसुंधरा–मी भटकते आहें, कुलकर्णी ग्रंथागार, पुणें; १४४, ३ = ५०.
१० वागूल देवीदास–शैशवदूत, सरस्वति प्रकाशन, ४१४ सदाशिव, पुणें २; ७५, २=००.
११ वांदेकर दत्तु–चिरीमिरी, शेठ भगवानदास हिरजी, कांदेवाडी मुंबई ४; १७२, ३=५०.
१२ वांदेकर दत्तु प्रेमाचा गुलकंद, शेठ भगवानदास हिरजी, मुंबई ४; १६४,३=५०.
१३ बुवा वि. आ.–अडाण्याचा गाडा, मॅजिस्टिक बुक स्टॉल, मुंबई; १२७, ३=५५.
१४ बुवा वि. आ.–असून अडचण नसून खोळंबा, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई ४; १४४, ३=००.
१५ बुवा वि. आ.–फापटपसारा, शेठ भगवानदास हिरजी, मुंबई ४; १६४,३=५०.
१६ भट गो. के.–*वेडगांवचे शहाणे, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर; १५६,३=००.
१७ भोसले शं. द.–समुद्रमंथन, शं. द. भोसले, २२९० डी वॉर्ड, शुक्रवार, कोल्हापूर; ७६, २=००.
१८ वाळंबे मो. रा.–मराठी साहित्य दर्शन, पुष्प १ लें–ना. सी. फडके (संपादन), अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; ११९, २=००.
१९. शेळके शांता ज.–शब्दांच्या दुनियेंत, कुलकर्णी ग्रंथागार, पुणें२; १३६, ३=५०
२० सबनीस वसंत–पानदान, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; १०६, २=५०.
२१ सामंत रघुवीर–दिलजमाई, अमरज्योति वाङ्मय, व्हिन्सेंट रोड, मुंबई १४; १३४; ३=५०.

## संकीर्ण ( शास्त्र, कला, विज्ञान, धर्म, इतिहास इत्यादि )

१. आठवले व्ही. वी.–कौरवपांडव युद्ध, अण्णासाहेब आठवले, किर्लोस्करवाडी; ६०, १=२५.
२. कर्वे चिं. ग.–महाराष्ट्र लोकसाहित्य माला, पुष्प ३ रें, ( संपादन ), महाराष्ट्र लोकसाहित्य समिति, २०४ सदाशिव, पुणें २; २१२, ३=००.
३. कर्वे चिं. श्री.–नवविज्ञानाच्या परिसरांत, कॉंटिनेंटल बुक सर्व्हीस, पुणें २; ९२, २=००.
४. किंकर नी. वा.–वैद्य ग. म.–नवीन इंग्रजी मराठी शब्दकोश, अ. वि. गृह प्रकाशन, पुणें २; ६३४, ५=००.
५. कुलकर्णी दिगंबर–सुलभ शेती–ठोकळ प्रकाशन, लक्ष्मीरोड, पुणें २; १७१,२=५०.
६. कुलकर्णी भीमराव–सभेंत कसें बोलावें, मॅजिस्टिक बुकस्टॉल, मुंबई ४; ११४, २=००.
७. कुलकर्णी भीमराव–संभाषणकला, मॅजिस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; १२०,२=००.
८. केळकर ना. वा.–तुम्हीच ज्योतिषी व्हा, भाग २ रा, मनोहर ग्रंथमाला, सदाशिव पुणें २; १६४, ४=००.

*व्यक्तिचित्रांचे संग्रह. ( बाकीची ललित, चिंतनात्मक व विनोदी )

९. खोबरेकर वि. गो.–इंग्रजी सत्तेविरुद्ध महाराष्ट्रांतील सशस्त्र उठाव, १८१८–६०, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; ८४, ५=००.
१०. गाडगीळ न. वि.–राज्योपनिषद्, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १८४, ५=००.
११. गाडगीळ न. वि.–श्री. जपजीसाहेब, ( अनुवाद ), अनसूया गाडगीळ, चंदीगड; ११६, २=५०.
१२. गोंधळेकर शं. भा.–शैक्षणिक संक्षिप्त कोश, ( संग्रह ), व्हीनस प्रकाशन, पुणे २; ५५०, १०=००.
१३. चिपळूणकर वा. ल.–समर्थांचा वगीचा, भाग ३ रा, मराठी थि.ऑ. फेडरेशन, गणेशवाडी, पुणे ४; १६८, २=००.
१४. जोशी ग. म.–भारतीय अर्थ-शास्त्र, गो. म. जोशी सत्कार समिति, विजयानगर कॉलनी, पुणे २; २७३, ५=००.
१५. जोशी महादेवशास्त्री–गाजतीं दैवतें, ज्ञानराज प्रकाशन, शनिवार, पुणे २; १२२, २=५०.
१६. जोशी वि. कृ.–परमार्थपर चार प्रवचनें, अध्यात्म परिषद्, सांगली; ९१,१=००.
१७. जोशी श्रीपाद–मित्र कसे मिळवावे, मॅजिस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; ९८,२=००.
१८. तुळपुळे ग. वि.–भगवद्गीता साक्षात्कारदर्शन, ( अनुवाद ), ग. वि. तुळपुळे, सांगली; २८६, ६=२५.
१९. दिवाण कुं. ब.–धम्मपदं, चित्रशाळा प्रेस, पुणे २; १३९, २=२५.
२०. नंद प्र. ल.–सुबोध शिवणकला, सुधा नंद, ३८ सोमवार पुणे २; २११,५=००.
२१. नेऊरगावकर स. के.–कर्वे ल. वि.–गीतेच्या श्लोकांवरील प्रवचनें, भाग १ ला (संपादन), दांडेकर धार्मिक वाङ्मय प्रकाशन मंडळ, ९७४ सदाशिव, पुणे २; १३०, १=५०.
२२. पातकर म. ग.–कला, कलातंत्र आणि आस्वाद, अ. वि. गृह प्रकाशन, पुणे २; ७२, ८=००.
२३. पेंडसे ग. सी.–कामपुरुषार्थ, कुळकर्णी ग्रंथागार, शनिवार, पुणे २; ३४०, १०=००.
२४. विवलकर राम–नवनिर्माण, ज्ञानराज प्रकाशन, शनिवार, पुणे २; १०७,२=००.
२५. बेहेरे पु. रा.–मंगलमूर्ति श्रीगणेश, श्रीविजय प्रकाशन, जोगेश्वरीपूर्व (मुंबई ४२); १०८, २=१०.
२६. भागवत रा. स.–मनुष्याला आत्मा असतो काय ?, मराठी थि. ऑ. फेडरेशन, पुणे ४; ११६, १=५०.
२७. मराठे रा. म.–शैक्षणिक मानसशास्त्र, पुणे विद्यापीठ, पुणे ७; १८८, १=५०.
२८. रानडे रा. के.–बाळ महाराज, ( भाग पहिला ), व्हीनस प्रकाशन, पुणे २; १५५, २=७५.
२९. वकील व्यंकटेश– श्री तुलसी रामायण, भाग १ ते ८, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; ३८४, ८=००.
३०. व्हटकर नामदेव–मराठीची लोककला-तमाशा, चंद्रकान्त शेटये प्रकाशन मंदिर, कोल्हापूर १; १६०, ४=५०.

३१ शहा शांतीलाल सी.–सुखाचे रहस्य, शांतीलाल शहा, १२४ रविवार, पुणें २; ७२, १=२५.

३२ शेजवलकर त्र्यं. शं.–निजाम-पेशवे संबंध (१८वें शतक), पुणें विद्यापीठ, पुणें ७; १६२, २=००.

३३. सामंत रघुवीर–आपलें व्यक्तित्व, अमरज्योति वाङ्मय, हरजीवनदास इस्टेट, मुंबई १४; १८४, ५=००.

३४. सामंत रघुवीर–व्यवहारचतुर कसें व्हावें?, मॅजेस्टिक बुक स्टॉल, मुंबई ४; ९४, २=००.

३५. हिंगवे कृ. शं –सुलभ तालिकीकरण, महाराष्ट्र ग्रंथालय संघ, ५६८ नारायण, पुणें २; ११६; २=५०.

टीपः— प्रस्तुत सूचींत केवळ नवीन व स्वतंत्र स्वरूपाच्या पुस्तकांचा समावेश आहे. बालवाङ्मय वगळण्यांत आलें आहे.

---

# पुरवणी

## कथा

१. उदापुरे दे. गो.–असिधारा, नागविदर्भ प्रकाशन, अमरावती; ११९, ३=००.

२. गोखले अरविंद–अनामिका, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १५२, ५=००.

३. वावर सरोजिनी–डोंगरची मैना, समाजशिक्षण प्रकाशन, १४८६ सदाशिव, पुणें २; १२६, २=५०.

## कादंबरी

१. शेणोलीकर ह. श्री –मायणीची मंजुळा, स्कूल अँड कॉलेज बुकस्टॉल, कोल्हापूर; २३६, ४=००.

## प्रवास

१. थोरात मा. भी.–पदयात्रा, ( केरळ ते काश्मीर ), ठोकळ प्रकाशन, पुणें २; १०२, १=५०.

## टीका

१ कुलकर्णी वा. ल.–वाङ्मयीन दृष्टि आणि दृष्टिकोण, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई ७; १७६, ५=००.

## संकीर्ण

१ व्हटकर नामदेव – अभिनयः शास्त्र आणि तंत्र, मकरंद साहित्य, १३८ वडाळा, मुंबई ३१; ७२, २=५०.

# ग्रंथसूचि ( १९५९ )

## पुरवणी क्र. २

### कादंबरी

१. शेरतुकडे कृष्णाकुमारी– निष्पाप, महाराष्ट्र ग्रंथभांडार, मुंबई ४; ९८, ३ रु.

### कविता

१. केचे मधुकर– दिंडी गेली पुढे, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणें २; ४८, १ रु.
२. नन्नोरे गोविंद– तळमळ, शशी प्रकाशन, धामणगाव (विदर्भ); ६४, १–२५
३. प्रियोळकर अ. का– मुक्तेश्वर महाभारत आदिपर्व– खंड ४ था शेवटचा (संपादन) मराठी संशोधन मंडळ, मुं. म. ग्रंथसंग्रहालय, मुंबई२; २४६, ५ रु.

### चरित्र

१. घोरपडे ए. के.– कोल्हापुरचे शाहू छत्रपति, ठोकळ प्रकाशन, ६२ बुधवार, पुणें २; १२३, २ रु.

### नाटक

१. दिवेकर र. दा.– २६ जानेवारी, सौ. जानकीबाई दिवेकर, १९६।१५ टिळक रस्ता, पुणें २; ९२, २ रु.

### टीकात्मक

१. जोग रा. श्री.– मराठी वाङ्मयाभिरुचीचें विहङ्गमावलोकन, पुणें विद्यापीठ, पुणें ७; २३०, २–५०
२. वनहट्टी श्री. ना.– मराठी नाट्यकला आणि नाट्यवाङ्मय, पुणें विद्यापीठ, पुणें ७; २२५, २–५०.

### प्रवास

१. कर्णिक द्वा. भ.– पश्चिमेचें क्षणदर्शन, बहुरुपी प्रकाशन, जिमखाना रोड, माटुंगा-मुंबई १९; ९५, २–५०.

### ललित गद्य

१. सामंत बाळ–मस्करी, नवभारत प्रकाशन संस्था, केळेवाडी, मुंबई४; १२३, ३रु.

### संकीर्ण

१. टोपे त्र्यं. कृ.–भारताची राज्यघटना, पॉप्युलर बुक डेपो, मुंबई७; ११६, २-५०
२. गांधी विचार दर्शन ( खंड १ ते ३ )– गांधीवाङ्मय प्रकाशन समिति, १२४२ सदाशिव, पुणें २; २२४+१२६+१९९; प्रत्येकी २–५०

---

# महाराष्ट्र साहित्य परिषद्

# १९५९-६० चें इतिवृत्त

**सभासदसंख्याः**— वर्षअखेर सभासदसंख्या एकूण १४६१ आहे. त्यांपैकी साधारण ९७५, तहह्यात ४४७, हितचिंतक २३, सहायक ९, आश्रयदाते ५ व उपकर्ते २, अशी वर्गवारी आहे. गतवर्षी साधारण ९७६, तहह्यात ४३०, हितचिंतक २३, सहायक ९, आश्रयदाते ५ व उपकर्ते २ अशी संख्या होती. चालू वर्षी साधारण सभासदांत वाढ झालेली नाही. तथापि तहह्यात सभासदांच्या संख्येत १७ ने वाढ झालेली आहे. साधारण सभासदांपैकी सुमारें २०० सभासदांकडून वर्गणी येणें आहे.

**आर्थिक स्थितिः**—सोबत जमाखर्च व ताळेबंद-पत्रकें आहेत. त्यावरून परिषदेच्या आर्थिक स्थितीची कल्पना येईल.

**स्मृतिदिनः**— ज्ञानकोशकार कै. **श्री. व्यं. केतकर** यांच्या स्मृतिदिनानिमित्त दि. १० एप्रिलला सकाळीं कै. केतकरांच्या समाधीला पुष्पांजलि वाहण्यांत आली व सायंकाळीं 'डॉ. केतकर' या चरित्रग्रंथाचे लेखक डॉ. **द. न. गोखले** ( सातारा ) यांचें ' केतकरांच्या बौद्धिक शक्तींची तऱ्हा ' या विषयावर विचारपरिप्लुत व्याख्यान झालें.

सुप्रसिद्ध विनोदी लेखक व नाटककार कै. **श्री. कृ. कोल्हटकर** यांचा २५ वा स्मृति-दिन १ जूनला येत असल्याने तो वैशिष्ट्यपूर्ण रीतीने पाळला जावा असें महाराष्ट्रांतील साहित्यसंस्थांना परिषदेने आवाहन केलें. या आवाहनास अनुसरून म. सा. सभा, इंदूर; करवीरनगर वाचन मंदिर; महाराष्ट्र समाज, अहमदाबाद; राजाराम वाचनालय, नागपूर; मुंबई म. ग्रंथसंग्रहालय इत्यादि संस्थांनी चर्चा-व्याख्यानें घडवून हा स्मृतिदिन योग्यप्रकारें साजरा केला. खुद्द म. सा. परिषदेने या दिवशीं कै. कोल्हटकरांचे एक शिष्य **श्री. ग. त्र्यं. माडखोलकर** व **प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे** यांचीं व्याख्यानें घडवून आणलीं. परिषदेशीं सहकार्य करण्यांत नेहमीच तत्पर असणारे लोकप्रिय भावगीत–गायक **श्री. बबनराव नावडीकर** यांनी या प्रसंगीं श्रीपाद कृष्णांचें ' महाराष्ट्र-गीत ' गाऊन दाखविलें.

साहित्यसम्राट् कै. **न. चिं. केळकर** यांच्या स्मृतिदिनानिमित्त (दि. १४ ऑक्टोबर) यंदा त्यांच्या कन्यका डॉ. **कमलाबाई देशपांडे** यांना व्याख्यानासाठीं निमंत्रित केलें होतें. त्यांनी या प्रसंगीं आपल्या तीर्थरूपांच्या ' घरगुती जीवनांतील स्मृति ' कथन केल्या.

दि. २३ नोव्हेंबरला आधुनिक मराठी कवितेचे जनक कै. **केशवसुत** यांचा स्मृति-दिन परिषदेने साजरा केला. या प्रसंगाला मुंबईचे प्रा. **श्री. पु. भागवत** हे व्याख्याते लाभले होते. त्यांनी ' केशवसुतांची काव्यदृष्टि ' या विषयावर आपले विचार मांडले.

तत्त्वज्ञ-कादंबरीकार कै. **वा. म. जोशी** यांच्या स्मृतिदिनीं ( २० जुलै ) प्रा. **हेमन्त इनामदार** यांनी वामनरावांच्या कादंबऱ्यांचीं वैशिष्ट्यें विशद करून सांगितलीं.

पंडित-कवि कै. **माधव जूलियन** यांच्या स्मृतिदिनीं ( २९ नोव्हेंबर ) बडोद्याचे सुप्रसिद्ध कवि व छंदःशास्त्रज्ञ डॉ. **ना. ग. जोशी** यांचें ' छंदोरचना व छंदोरचनाकार ' या विषयावर माहितीपूर्ण व्याख्यान झालें.

**सत्कारः**— मिरज संमेलनाच्या अध्यक्षपदीं परिषदेच्या कार्यकारी मंडळाचे एक सभा-सद **प्रा. श्री. के. क्षीरसागर** यांची निवड झाली. परिषदेने १९ एप्रिलला त्यांचा प्रकट सत्कार केला. सभेच्या अध्यक्षस्थानीं कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेण्ढरकर होते. श्री. गोपीनाथ

तळवलकर, प्रा. भ. श्री. पंडित, श्री. वा. रा. ढवळे, डॉ. सरोजिनी बाबर, प्रा. हेमन्त इनामदार, डॉ. दु. का. सन्त, डॉ. न. का. घारपुरे व श्री. शंकर सारडा यांनी प्रा. क्षीरसागर यांच्या सन्मानार्थ गुणगौरवपर भाषणें केलीं. प्रा. क्षीरसागर व श्री. पेंढरकर यांचीं भाषणें झाल्यावर श्री. मो. रा. वाळंबे यांनी आभार मानले.

**भेटी**— चालू वर्षी पुढील सन्माननीय व्यक्तींच्या भेटीचा परिषदेस लाभ झाला. पुणे आकाशवाणीच्या कविसंमेलनासाठी आलेल्या श्री. केदारनाथ सिंह, श्री. गोपाळसिंग नेपाली, श्री. गोपाळदास नीरज, श्री. राजनारायण विसारिया, श्री. देवराज दिनेश, श्री. श्रीनिवास जोशी आदि हिंदी कवि ( दि. २७ जून ).

मुंबई राज्याचे मुख्यमंत्री श्री. **यशवन्तराव चव्हाण** यांनी खास निमंत्रणानुसार १८ जुलैला परिषदेस भेट दिली, व उपस्थित पदाधिकारी व साहित्यिक यांच्यासमवेत कांही वेळ विचारविनिमय करून परिषदेच्या कार्याबद्दल संतोष व्यक्त केला.

गुजराती साहित्यिक श्री. गुलाबदास ब्रोकर ( ४ ऑक्टोबर १९५९ ), कन्नड साहित्यिक डॉ. रं. श्री. मुगळी (२९ नोव्हेंबर १९५९) व हिंदी नाटककार पं. श्री. लक्ष्मीनारायण मित्र ( ४ जानेवारी १९६० ) यांनीहि परिषदेस भेटी दिल्या.

अखिल भारतीय श्रमिक पत्रकार संघाचें अधिवेशन परिषदेच्या सभागृहांत ( दि. २५ ऑक्टोबर १९५९ ) भरलें असतां त्याचे अध्यक्ष श्री. जगदीश चतुर्वेदी यांचा परिषदेतर्फे पुष्पहार घालून सत्कार करण्यांत आला.

**सरकारी देणग्या**—मुंबईसरकार कडून ( शिक्षणखातें ) प्रतिवर्षाप्रमाणे यंदा १००० रु. ची देणगी आली. याव्यतिरिक्त परिषदेतर्फे यंदा इमारत व ग्रंथालय यांसाठी आर्थिक साहाय्याची मागणी करण्यांत आली होती. या मागणीचा विचार करून शिक्षणखात्याने इमारतीसाठी ( अतिथिगृह ) ५३५० रु. व ग्रंथालयासाठी २५०० रु. ( एकूण ७८५० रु.) अशा रकमा मंजूर केल्या आहेत. यांपैकी निम्मी रक्कम ( २६७५+१२५० ) रु. ३९२५ परिषदेच्या हातीं पडली असून बाकीची पुढील वर्षांत मिळावयाची आहे. या साहाय्याबद्दल परिषद् राज्यसरकारची ऋणी आहे.

**शाखासभा :—**

**द. सातारा ( सांगली )** :— परिषदेच्या परीक्षांचे वर्ग चालविले. प्राज्ञ परीक्षेस श्री. भ. स. पाटील हा उमेदवार सर्व केंद्रांत व अर्थातच जिल्ह्यांतून पहिला आल्यामुळे त्याला परिषदेचें २० रु. चें व शाखासभेने खास ठेवलेलें प्रा. गं. गो. कानेटकर पारितोषिक ( १५ रु. ) मिळालें. वसंत व्याख्यानमाला व बहिःशाल व्याख्यानमालांशीं सहकार्य करण्यांत आलें. मिरज संमेलनाध्यक्ष प्रा. क्षीरसागर यांचा सत्कार करण्यांत आला. राजकवि यशवन्त यांच्या षष्ट्यब्दीपूर्तिनिमित्त त्यांचा सत्कार, थैली-समर्पण इत्यादि बाबतींतहि शाखेने पुढाकार घेतला. दि. २८ फेब्रुवारीला ब्रह्मनाळ येथे जिल्ह्यांतील साहित्यिकांचा मेळावा घेण्यांत आला. या प्रसंगीं श्री. यशवन्त, गिरीश, सुधांशु, म. भा. भोसले इत्यादि साहित्यिक उपस्थित होते. अध्यक्ष श्री. वा. गो. शिराळकर व कार्यवाह श्री. वा. के. सावईकर यांच्या कार्यतत्परतेमुळे शाखेचें कार्य अनेक दृष्टींनी समाधानकारक चालू आहे.

**करवीर ( कोल्हापूर )** शाखेतर्फे यंदा पुढील वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रम झाले. कै. श्री. कृ. कोल्हटकरांचा २५ वा स्मृतिदिन साजरा करण्यांत आला. या प्रसंगीं श्री. वि. स. खांडेकर, श्री. सरंजामे, श्री. बाबूराव जोशी इत्यादींचीं भाषणें झालीं. २ ऑगस्टला राजकवि यशवन्त यांचा कवि गिरीश यांच्या अध्यक्षतेखाली सत्कार करण्यांत येऊन त्यांना ५०१

रु. ची थैली देण्यांत आली. प्रा. डॉ उषा पोतदार, डॉ. गो. के. भट, श्री. खांडेकर यांनी भाषणें करून यशवन्तांचा यथोचित गौरव केला. कै. पार्श्वनाथ आळतेकर व कै. चिंतामणराव कोल्हटकर यांच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यांत आला. ज्ञानेवारीच्या शेवटच्या आठवड्यांत श्री. मामा वरेरकर यांचा इतर संस्थांच्या सहकार्याने सत्कार करण्यांत आला. शाखेचे अध्यक्ष श्री. वि. स. खांडेकर असून कार्याध्यक्ष डॉ. रा. चिं. श्रीखंडे आहेत.

**सोलापूर शाखेने** प्रतिवर्षाप्रमाणे ग्रामीण भागांत जिल्हा संमेलन भरविण्याचा यशस्वी उपक्रम केला. २०-२१ फेब्रुवारी रोजीं तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्या अध्यक्षत्वाखाली करमाळा येथे जिल्हा अधिवेशन उत्साहाने पार पडलें. या समेलनप्रसंगीं डॉ. नरेश कवडी-संपादित 'भरली चंद्रभागा' (जिल्ह्यांतील ग्रामीण गीतांचा संग्रह) या पुस्तकाचें प्रकाशन करण्यांत आलें. प्रस्तुत पुस्तकाच्या उपक्रमाला भारत सरकारकडून शाखेला ५०० रु. ची देणगी मिळाली होती. शाखेचे उत्साही कार्यकर्ते अध्यक्ष श्री. शं. गो. पटवर्धन यांना ६० वर्षें पूर्ण झाल्याबद्दल त्यांचा शाखेतर्फे सत्कार करण्यांत आला. सांप्रत कै. गणेशशास्त्री लेले यांनी प्रसिद्ध केलेल्या रघुवंशाची नवीन आवृत्ति प्रसिद्ध करण्याचे शाखेचे प्रयत्न चालू आहेत.

**उत्तर सातारा** शाखासभेने प्रतिवर्षाप्रमाणे परीक्षांचे वर्ग चालविले होते. रियासतकार कै. सरदेसाई, कै. डॉ. अ. स. अळतेकर, कै. पार्श्वनाथ अळतेकर व कै. चिंतामणराव कोल्हटकर यांच्या निधनाबद्दल श्रद्धांजलि वाहण्यांत आली. प्रा. ग.प्र.प्रधान–लो. टिळक या इंग्रजी चरित्रग्रंथाचे एक लेखक-यांचा त्या ग्रंथास पारितोषिक मिळाल्याबद्दल सत्कार करण्यांत आला. या प्रसंगीं प्रा. प्रधान यांनी 'चरित्रलेखन' या विषयासंबंधी आपले विचार व्यक्त केले.

**वाङ्मयसमालोचनें :—** गेल्या मिरज संमेलनप्रसंगीं परिषदेने म. सा. पत्रिकेचा वाङ्मयसमालोचन (१९५८) हा विशेषांक प्रसिद्ध केला. या नवीन उपक्रमाचें सर्वांकडून स्वागत करण्यांत आलें. आता ठाणें संमेलनप्रसंगींहि १९५९ सालचें वाङ्मयसमालोचन असणारा 'पत्रिके' चा विशेषांक प्रसिद्ध होत आहे. मराठीच्या या वार्षिक वाङ्मयसमालोचनाबरोबरच १९५८ मधील गुजराती व हिंदी वाङ्मयाचीं धावतीं समालोचनें परिषदेने यंदा प्रा. मधुसूदन एन्. पारेख (अहमदाबाद), व प्रा.ग. न. साठे (मुंबई) यांच्याकडून लिहवून घेतलीं व स्वतंत्र पुस्तिकांच्या रूपाने प्रसिद्ध केलीं आहेत. मराठी वाचक या नव्या उपक्रमाचेंहि स्वागत करतील अशी आशा आहे.

वाङ्मयसमालोचनांचें हें सर्व कार्य दिल्लीच्या 'महाराष्ट्रीय समाज बिल्डिंग ट्रस्ट' च्या व राज्यपाल श्री. न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ यांच्या उदार देणग्यांमुळे शक्य झालें, हें कळविण्यास अतिशय संतोष वाटतो. परिषद् या उभयतांची ऋणी आहे.

**शुद्धलेखन-नियमांना मान्यता :—** प्रचलित मराठी शुद्धलेखनाचा विचार करण्यासाठी म. सा. परिषदेने महामंडळाची नियुक्ति करून विविध संस्था व तज्ज्ञ मंडळींच्या बैठकी भरविल्या. महामंडळाने १९५८सालीं परिषदेच्या पूर्वीच्या म्हणजे १९३० सालापासून मान्य असलेल्या नियमांत कांही फरक करण्याचें कारण नाही असा निर्णय दिला. हा निर्णय १६ ऑगस्ट १९५९च्या वार्षिक साधारण सभेने मान्य केला. या वेळीं परिषदेच्या पूर्वीच्या नियमांपैकी ३६ व्या नियमांत फक्त बदल झाला. बाकी सर्व नियम जसेच्या तसेच राहिले आहेत.

परिषदेच्या या शुद्धलेखन-नियमांना आता डायरेक्टर ऑफ एज्युकेशन व एस्. एस्. सी. एक्झॅमिनेशन बोर्ड यांच्याकडून मान्यता देण्यांत आली आहे. मराठवाडा विद्यापीठ व एस्. एन्. डी. टी. विमेन्स युनिव्हर्सिटी यांनीहि रीतसर मान्यता दिली आहे. पुणें विद्यापीठाने परिषदेच्या नियमांना मान्यता दिल्याचें कळतें. रीतसर पत्र त्यांच्याकडून यावयाचें आहे.

**संशोधनकार्य** (डॉ. वा. दा. गोखले यांच्याकडून आलेला वृत्तान्त):— शिवकल्याण-प्रतीनुसार अनुभवामृताची शब्दसूचि पूर्ण झाली असून त्या सूचींतील शब्दांचा भाषाशास्त्र-दृष्टया अभ्यास पुरा होत आला आहे. ज्ञानेश्वरी व अनुभवामृत यांतील समानशब्द, त्यांचे भिन्नार्थ, समासांचें वैशिष्टय, अलंकार, अभ्यस्तशब्द इत्यादि प्रकार अभ्यसनीय आहेत.

सांप्रत भारत इतिहास संशोधक मंडळांतील हस्तलिखितांवरून पाठभेदलेखन चालू आहे. आतापर्यंतच्या अल्पकार्यावरून दोन अनुमानें काढतां येतील असें वाटतें. पूरक पुरावा मिळविण्याचा प्रयत्न चालू आहे. अनुमानें (१) जास्तींत जास्त हस्तलिखितांत "अनुभवामृत" हेंच ग्रंथनाम आहे. (२) हा ग्रंथ सलग असून त्यांतील प्रकरणें मागाहून घातलीं गेलीं आहेत.

या ग्रंथावर " राष्ट्रभाष्य " नांवाची संस्कृत–मराठी टीका अर्धवट उपलब्ध आहे. ही टीका संपूर्ण स्वरूपांत कोणा सद्गृहस्थांच्या संग्रहीं असल्यास कृपया कळवावें अशी विनंती आहे.

**संमेलनः**— मराठी साहित्य संमेलनाचें ४१ वें अधिवेशन स्नेहसंवर्धक संघ या संस्थेतर्फे मिरज येथे दि. १६ ते १९ मे १९५९ या अवधींत प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने यशस्वीरीत्या पार पडलें. प्रतिनिधिनिवास, भोजन इत्यादींची सोय मिरज हायस्कूलमध्ये करण्यांत आली होती व संमेलनाचे महत्त्वाचे सर्व कार्यक्रम हायस्कूलसमोर उभारण्यांत आलेल्या 'इतिहासाचार्य वासुदेवशास्त्री खरे सभामंडपां'त झाले. दि. १६ ला सकाळीं पूर्वाध्यक्ष श्री. आ. रा. देशपांडे, नियोजित अध्यक्ष प्रा. श्री. के. क्षीरसागर व उद्घाटक राज्यपाल श्री. न. वि. तथा काकासाहेब गाडगीळ यांचें मिरज स्थानकावर स्वागतमंडळातर्फे स्वागत करण्यांत आलें. सकाळीं १० वाजतां म. म. प्रा. द. वा. पोतदार यांच्या हस्तें टाउन हॉलमधील प्रदर्शनाचें उद्घाटन करण्यांत आलें. दुपारीं ५ वाजतां संमेलनास रीतसर प्रारंभ झाला. स्वागतगीत, संदेशवाचन, उद्घाटन, स्वागताध्यक्ष व अध्यक्ष यांचीं भाषणें इत्यादि कार्यक्रम, वादळी वातावरण असूनहि, सुरळीतपणें पार पडले. रात्रीं 'एक होता म्हातारा' या नाटकाचा प्रयोग मिरजेच्या कलाविकास मंडळाने सादर केला. दि. १७ ला सकाळीं विषय–नियामक समितीची बैठक झाल्यानंतर मंडपांत 'विज्ञान आणि साहित्य' या विषयावर श्री. वा. रं. सुंठणकर यांच्या अध्यक्षतेने परिसंवाद झाला. परिसंवादांत प्रा. रामभाऊ जोशी, प्रा. अनंत काणेकर, प्रा. दि. के. बेडेकर व डॉ. गो. के. भट यांनी भाग घेतला होता. दुपारीं ५ वाजतां खुलें अधिवेशन भरून दुखवटा–ठराव व अध्यक्षांच्या हस्तें ग्रंथप्रकाशन हे कार्यक्रम झाले. रात्रीं पुण्याच्या प्रो. ड्रॅ. असोसिएशनने 'वेड्याचें घर उन्हांत' हा लोकप्रिय नाट्यप्रयोग सादर केला. दि. १८ ला सकाळीं विषय-नियामक समितीची बैठक पुन्हा भरली होती. १० वाजतां पद्मभूषण श्री. मामासाहेब वरेरकर व नटवर्य चिंतामणराव कोल्हटकर यांचा सत्कार करण्यांत आला. या प्रसंगीं श्री. व. ब. आगाशे, श्री. द. रा. गोमकाळे व प्रा. माधव मनोहर यांनी प्रसंगोचित भाषणें केलीं. याच ओघांत श्री. वरेरकर यांचें "तरुण लेखकांशीं हितगुज" ह्या स्वरूपाचें व्याख्यान झालें. दुपारीं खुल्या अधिवेशनांत संयुक्त महाराष्ट्र, गोमंतक, मोडी लिपी इत्यादि ठराव संमत झाले. श्री. श्री. शं. नवरे, श्री. वा. रं. सुंठणकर, श्री. विश्वनाथ लवंदे, कॉ. विनायक भावे, श्री. वि. द. घाटे, श्री. कृ. सा. बाबर, प्रा. उर्ध्वरेषे इत्यादि वक्त्यांनी ठरावांवर वैशिष्ट्यपूर्ण भाषणें केलीं. त्यानंतर काव्यगायनाचा कार्यक्रम झाला. कार्यक्रमाचें स्वरूप श्री. वि. स. खांडेकर यांनी विशद केल्यानंतर कवि यशवन्त, अनिल, काणेकर, काळेले व विन्दा करंदीकर यांनी आपल्या निवडक पांच पांच कविता गाऊन दाखविल्या. रात्रीं स्थानिक कलावंतांचे नाट्यप्रवेश व श्री. सुधीर फडके यांचें गीतरामायण हे मनोरंजक

कार्यक्रम झाले. दि. १९ ला सकाळीं ९ वाजतां ' मराठी निबंध : काल, आज व उद्या ' या विषयावर डॉ. वि. भि. कोलते यांच्या अध्यक्षतेने परिसंवाद झाला. या प्रसंगीं प्रा. ह. श्री. शेणोलीकर, प्रा. मनोहर आळतेकर, प्रा. भगवन्त देशमुख, डॉ. दु. का. संत यांचीं भाषणें झालीं. यानंतर नवोदित कवींच्या काव्यगायनाचा खास कार्यक्रम झाला. सायंकाळीं ५ वाजतां म. म. प्रा. पोतदार यांचें ' इतिहासांतील महाराष्ट्रीय ' या विषयावर तासभर उद्बोधक व्याख्यान झालें. नंतर ६ वाजतां अध्यक्षांचें समारोपाचें भाषण झालें. याच वेळीं प्रतिनिधींतर्फे व म. सा. प. च्या वतीने श्री. श्री. शं. नवरे व सौ. कमलाबाई किबे यांचीं व स्वागतमंडळातर्फे स्वागताध्यक्ष श्री. वि. स. खांडेकर आणि कार्यवाह श्री. व. व. आगाशे यांचीं भावसघन अशीं आभारप्रदर्शक भाषणें झालीं. ' वंदे मातरम् ' गीतानंतर चार दिवस चाललेला हा भरगच्च साहित्यसोहळा समाप्त झाला.

संमेलनासाठी बाहेरगावांहून सुमारें ५०० प्रतिनिधि आले होते. त्यांची निवासभोजनाची सोय स्वागतमंडळाने चांगल्या प्रकारें ठेवली होती. संमेलन यशस्वी करण्यांत अनेकांचें साहाय्य झालेलें आहे. तथापि स्वागताध्यक्ष श्री. भाऊसाहेब खांडेकर, कार्याध्यक्ष श्री. पुंडलिकजी कातगडे, कार्यवाह श्री. म. द. करमरकर, श्री. व. ब. आगाशे, श्री. क. श्री. काळे, श्री. वि. गो. साठ्ये, श्री. कुसुमावती पंडितराव यांनी अहोरात्र केलेल्या परिश्रमांचा आवर्जून उल्लेख केला पाहिजे. संमेलनाच्या कार्यकर्त्यांशीं सल्लामसलत व मार्गदर्शन करण्यासाठी म.सा.प.चे कार्याध्यक्ष श्री.य.दि. पेंढरकर हे आधीपासून मिरजेस जाऊन राहिले होते.

**सभा:—** परिषदेच्या नियामक व वार्षिक साधारण सभांच्या बैठकी रविवार दि. १४ जूनला प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने मा. प सभागृहांत भरल्या होत्या. दुखवटा-ठराव, ५७-५८ चें इतिवृत्त, जमाखर्च व ५९-६० चा अर्थसंकल्प संमत करण्यांत आला. इतिवृत्ताचीं मुद्रितें काळजीपूर्वक तपासलीं जावींत ही सूचना मान्य करण्यांत आली. ' पत्रिके ' चें स्वरूप व तिचें विलंबाने होणारें प्रकाशन या मुद्द्यांची नोंद करण्यांत आली. हिशेबाची पद्धति सर्वसामान्य सभासदांच्या दृष्टीने सोईची व सुगम कशी करतां येईल याचा विचार करण्यासाठी एक समिति नेमण्यांत आली. अतिथिगृहाची आवश्यकता व त्यासाठी लागणारा खर्च या दोन बाबींवर विशेष चर्चा झाली. श्री. ग. गं. जांभेकर, प्रा. अ. गं. मंगरूळकर, श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. म. गो. मोडक, श्री. पां. र. अंबिके, प्रा. दे. द. वाडेकर, डॉ. न. का. घारपुरे, श्री. वा. रा. ढवळे, डॉ. वा. दा. गोखले, कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर इत्यादींनी निरनिराळ्या बाबींवरील चर्चेत भाग घेतला. शेवटीं प्रा. वाडेकर यांनी मांडलेला अतिथिगृहाचा ठराव बहुमताने संमत झाला. यानंतर सभा तहकूब झाली व कार्यक्रमपत्रिकेवरील उर्वरित विषय पुढच्या सभेंत चर्चेला घेण्याचें ठरलें.

**कार्यकारी मंडळाची सभा:—**परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा रविवार दि. १६ ऑगस्टला भरली होती. डॉ. ना. गो नांदापूरकर, श्री. वि. रा. शिंदे व श्री. वि. रा. ओक यांच्या निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यांत आला. मिरज संमेलनप्रसंगीं संमत झालेल्या साहित्यसंस्था-संघीकरण खडर्यास कांहीं किरकोळ दुरुस्त्यांसह संमति देण्यांत आली. संमेलनाच्या अध्यक्षीय निवडणूकपद्धतींत सुधारणा सुचविण्यासाठीं श्री. श्री. शं. नवरे, श्री. चिं. ग. कर्वे, श्री. य. दि. पेंढरकर व डॉ. न. का. घारपुरे (निमंत्रक) यांची एक समिति नेमण्यांत आली. या समितीने परिषदेच्या घटनेंतहि जरूर त्या दुरुस्त्या सुचवावयाच्या आहेत. परिषदेच्या तिघां विश्वस्तांपैकीं प्रि. ज. रा. घारपुरे व डॉ. नि. भा. भोटवडेकर यांनी राजिनामे दिले, ते कृतज्ञतापूर्वक स्वीकारण्यांत आले व त्यांच्याऐवजी

श्री. वि. द. घाटे यांची विश्वस्तपदीं निवड करण्यांत आली. आता डॉ. धनंजयराव गाडगीळ व श्री. वि. द. घाटे हे दोघेच परिषदेचे विश्वस्त आहेत.

**साधारण सभा:—** १४ जून रोजीं वेळेच्या अभावीं तहकूब झालेली वार्षिक साधारण सभा १६ ऑगस्ट १९५९ रोजीं प्रा. श्री. के. क्षीरसागर यांच्या अध्यक्षतेने भरली होती. मिरज साहित्यसंमेलनप्रसंगीं संमत झालेल्या ( म. सा. पत्रिका अंक १२९ ) साहित्यसंस्था-संघीकरण खडर्याची प्रथम चर्चा सुरू झाली. सभेने संघीकरणाचें तत्त्व मान्य करून प्रातिनिधिक मध्यवर्ती साहित्यसंस्था असावी या गोष्टीला संमति दिली. तथापि संघीकरण-खडर्याचा साधकबाधक विचार करून सहा महिन्यांच्या आंत एक व्यवस्थित योजना सादर करण्यासाठी पुढील जणांची समिति नियुक्त करण्यांत आली. म. म. प्रा. द. वा. पोतदार, श्री. श्री. शं. नवरे, प्रा. अ. गं. मंगरूळकर, प्रा. दे. द. वाडेकर, श्री. वि. त्र्यं. शेटे, श्री. ल. म. चक्रदेव, श्री. म. दा. साठे, श्री. ग. गं. जांभेकर, श्री. य. दि. पेंढरकर, व डॉ. न. का घारपुरे ( निमंत्रक ). यानंतर शुद्धलेखन महामंडळाच्या सभेंतील निष्कर्षांना ( म. सा. पत्रिका अंक १२७ ) ठरावरूपाने मान्यता देण्यांत आली व नियमांची अंमलबजावणी आणि प्रसार करण्यासंबंधी कार्यकारी मंडळास आदेश देण्यांत आला. 'पत्रिके'च्या १२९ व्या अंकांत मिरज-संमेलन व अध्यक्षीय भाषण यासंबंधी संपादकीय मजकुरांत जें मतप्रदर्शन झालें होतें त्याविषयी सभेंत बरीच चर्चा झाली. ही चर्चा लक्षांत घेऊन कार्यकारी मंडळाने संपादकीय धोरणासंबंधी योग्य ती व्यवथा करावी असा ठराव संमत करण्यांत आला. अध्यक्षांचे आभार मानल्यावर सभेचें काम समाप्त झालें.

**कार्यकारी मंडळाची सभा–** दि. १ जानेवारी १९६० ला परिषदेच्या कार्यकारी मंडळाची सभा भरली होती. या सभेंत पुढील महत्त्वाचीं कामें झालीं. १ प्रा. मा. दा. अळतेकर ( २०–८–५९ ), श्री. अ. स. फडके, चंद्रोदयकर्ते ( २७–८–५९ ), श्री. दत्तु बांदेकर ( ४-१०–५९ ), श्री. पार्श्वनाथ अळतेकर ( २२–११–५९ ),श्री. चिंतामणराव कोल्हटकर ( २३–११–५९), डॉ. अ. स. अळतेकर ( २५–११–५९ ) व रियासतकार श्री. गो. स. सरदेसाई ( २९–११–५९ ) यांच्या शोचनीय निधनानिमित्त दुखवटा व्यक्त करण्यांत आला. २. म. सा. संमेलनाच्या अध्यक्षांच्या निवडणूक-पद्धतींत सुधारणा सुचविणाऱ्या समितीची पुढील शिफारस मान्य करण्यांत आली. 'संमेलनाध्यक्षांची निवडणूक फक्त म. सा. परिषदेच्या सभासदांकडून व्हावी.' ३. परिषदेच्या घटनेंत दुरुस्त्या करण्यासंबंधी विचार झाला. संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वांत येईपर्यंत व साहित्य संस्थांचें संघीकरण होईपर्यंत दुरुस्त्या करूं नयेत असा निर्णय घेण्यांत आला. ४. कै. गोविंदराव टेंबे यांच्या स्मरणार्थ प्रतिवर्षी व्याख्यानमाला गुंफण्यांत यावी अशा आशयाचा अर्ज श्री. ग. गो. व मा. गो. टेंबे यांच्याकडून आला होता.त्याचा विचार होऊन श्री. टेंबे यांच्याकडून मिळणाऱ्या अनुदानांतून 'व्याख्यानें करविण्याची व्यवस्था' परिषदेने करावी असें ठरलें. ५. 'पत्रिके'-च्या १२९ व्या अंकांतील अध्यक्षीय भाषणावरील स्फुटासंबंधी गेल्या वा. साधारण सभेने दिलेल्या आदेशाचा विचार करण्यांत आला. 'संपादकीयांत व्यक्त होणाऱ्या मतांची जबाबदारी व्यक्तिशः संपादकाची समजावी' असें वाक्य दर अंकांत टीप म्हणून देण्याचें ठरलें. ६ डॉ. मा. गो. देशमुख (प्राचार्य, गव्हर्नमेंट आर्ट्स् अँड सायन्स कॉलेज, औरंगाबाद ), प्रा. वा. ल. कुळकर्णी ( मराठी विभाग प्रमुख, मराठवाडा विद्यापीठ ), प्रा. भ. श्री. पंडित ( रीडर, नागपूर विद्यापीठ ) व प्रा. भगवन्त देशमुख ( अध्यक्ष, उस्मानाबाद जि. सा. संमेलन, तुळजापूर ) यांचे, कंसांत दर्शविलेल्या मान-नियुक्तीबद्दल अभिनन्दन करण्यांत

आलें. ७ संयुक्त महाराष्ट्राची स्थापना होत आहे याबद्दल का. का. मंडळाने समाधान व्यक्त केलें; तथापि सीमेवरील बहुसंख्य मराठी भाषकांचा सलग प्रदेश अन्य राज्यांत घातला जाऊं नये व नव्या मराठी राज्याचें नांव 'महाराष्ट्र' हेंच असावें याबद्दल आग्रहाची मागणी केली.

देणगीः—परिषदेचे माजी चिटणीस डॉ. वा. दा. गोखले यांनी आपले वडील बंधु श्री. शं. दा. गोखले यांच्या नांवें परिषदेच्या संशोधन-विभागासाठी ग्रंथसंग्रहासुद्धा एक नवें कपाट देणगी म्हणून दिलें. या देणगीचा साभार स्वीकार करण्यांत आला.

**संलग्न संस्थाः**—लोकहितवादी मंडळ, धुळें, व महाराष्ट्र मंडळ, कलकत्ता २६, या दोन संस्था संलग्न करण्यांत आल्या.

**कांही विशेष कामें:**—(चिटणीस,प्रा.डॉ.न.का. घारपुरे यांच्याकडून) १.यंदाच्या वर्षी अतिथिगृह व तळघरदुरुस्ती (पाणी बाहेर काढून देण्यासाठीं पंप बसविणें) हीं दोन महत्त्वाचीं कामें वा. सा. सभेने कार्यकारी मंडळाकडे सोपविलीं होतीं. संतोषाची गोष्ट म्हणजे हीं दोन्ही कामें जवळजवळ पूर्ण झालीं आहेत. अर्थात् या दोन्ही कामांच्या पूर्ततेसाठी अंदाजापेक्षा अधिक खर्च झाला आहे, पण तो करणें अपरिहार्य व आवश्यक होतें. का.का. मंडळाची व साधारण सभेची या जादा खर्चाना ( जो अद्याप व्यावयाचा आहे ) रीतसर संमति घेण्यांत येईल.

२. अतिथिगृहाच्या बांधणीसाठी व ग्रंथालयासाठी मुंबई सरकारच्या शिक्षणखात्याकडे आर्थिक साहाय्याचा अर्ज करण्यांत आला होता. परिषदेची गरज ध्यानीं घेऊन सरकारने अपेक्षेप्रमाणे द्रव्यसाहाय्य करण्याचा निर्णय घेतला हा आर्थिक दृष्ट्या परिषदेवर मोठाच अनुग्रह झाला.

३. परिषदेच्या विश्वस्तांकडे सरकारी प्रो. नोटा व रोखे आहेत. त्यांच्या व्याजावर इतकीं वर्षे इन्कमटॅक्स आकारण्यांत येत होता. यंदा संबंधित अधिकाऱ्यांकडे पत्रव्यवहार करून व गाठीभेटी घेऊन अशा प्रकारचा इन्कमटॅक्स घेतला जाऊं नये अशी खटपट करण्यांत आली. त्या खटपटीला यश येऊन आता इन्कमटॅक्समाफीचीं पत्रें परिषदेच्या दप्तरीं दाखल झालीं आहेत. यापूर्वी आकारलेला रु. २१४·५९ टॅक्सहि परत मिळाला आहे. आता यापुढे २५० रु. पर्यंत परिषदेला कोणी देणगी दिली तर तीवर टॅक्स आकारला जाणार नाही अशी व्यवस्था झाली आहे.

४. गतवर्षाच्या अखेरीस बँक ऑफ महाराष्ट्र लि. मध्ये ११००० रु. ची कायम ठेव होती. तिची मुदत यंदा दर तीन महिन्यांनी वाढवत गेल्याने यंदा सुमारें ४५० रु. ची रक्कम व्याजरूपाने मिळाली आहे.

५. परिषदेच्या जुन्या तीन विश्वस्तांपैकी दोघे स्वेच्छेने निवृत्त झाल्यामुळे डॉ. धनंजयराव गाडगीळ व श्री. वि. द. घाटे या दोघांचीच का. का. मंडळाने निवड केली. हा बदल झाल्याने स्टेट बँकेतील सर्व कागदपत्रें आता नव्या विश्वस्तांच्या नांवें करून घेतलीं आहेत.

**प्रचारः— कार्याध्यक्ष :**

तुळजापूर येथे उस्मानाबाद जिल्हा म. सा. संमेलनाचें तिसरें अधिवेशन डिसेंबर १९५९ मध्ये भरलें होतें, त्याला परिषदेचे प्रतिनिधि म्हणून कार्याध्यक्ष श्री. य. दि. पेंढरकर गेले होते. नियोजित उद्घाटक न आल्यामुळे उद्घाटनाची कामगिरी कार्याध्यक्षांनी केली. ( म. सा. प. च्या कामकाजाबद्दल ओघांत बोलतांना म. सा. प. च्या शुद्धलेखनाच्या नियमांना राज्य-सरकारची मान्यता मिळविण्यांत आल्याचेंहि निवेदन करण्यांत आलें. )

सचिवालयांत एकदा शिक्षणखात्याचे चिटणीस श्री. चिन्मुळगुंद यांना भेटून त्यांच्याकडे कांही कामासाठी अनुदान मिळण्याबाबत विनंती करण्यासाठी कार्याध्यक्ष गेले होते. त्या प्रसंगीं पत्रिकेचे संपादक श्री. वा. रा. ढवळेहि कार्याध्यक्षांसमवेत होते.

रवीन्द्रनाथ टागोर जन्मदिन-शताब्दी महोत्सवाप्रीत्यर्थ मुंबई राज्य सरकारने नेमलेल्या समितींत म. सा. प. च्या कार्याध्यक्षांचा समावेश करण्यांत आला असल्यामुळे त्या कामींहि जावें लागलें होतें; पुढेहि जावें लागेल.

अभिनय शिक्षणाचा वर्ग बेसिक ट्रेनिंग कॉलेज, पुणें, येथे भरला होता. मराठी मुलखांतून निवडक प्रा. शिक्षक त्या वर्गासाठीं आले होते. श्री. के. नारायण काळे हे त्याचे प्रमुख चालक होते. त्यांच्या विनंतीवरून त्या वर्गापुढे म. सा. प. च्या कामकाजाची माहिती कार्याध्यक्षांनी दिली.

म. सा. संमेलनाचें ४२ वें अधिवेशन मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या निमंत्रणानुसार ठाणें येथे भरणार आहे. त्या कामीं मार्गदर्शन करण्यासाठी प्राथमिक सभेस श्री. वा. रा. ढवळे व श्री. श्री. शं. नवरे यांची नियुक्ति केली होती. नंतर दोन सभांना कार्याध्यक्ष श्री. पेंढरकर हेही गेले होते

**परीक्षा** :—डिसेंबर १९५९ मध्ये झालेल्या परिषदेच्या परीक्षांना विविध केंद्रांतून एकूण बसलेल्या व त्यांत उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांची संख्या—

| परीक्षा | बसले | उत्तीर्ण |
|---|---|---|
| प्रथमा | ३३१२ | २५०० |
| प्रवेश | १४५४ | ९३८ |
| प्राज्ञ | ७०५ | ३८५ |
| विशारद | १०६ | ४५ |
| आचार्य | ५ | १ |
| | ५५८२ | ३८६९ |

यंदा एकूण १५० केंद्रें होतीं. तीं येणेंप्रमाणे—**मुंबई विभाग**, गिरगाव, दादर, अंधेरी, वरळी, ठाणें, कल्याण, डहाणू, वज्रेश्वरी, वसई. **पुणें** – पुणें ( नू. म. वि. ), पुणें रास्ता पेठ हायस्कूल, खडकी, इंदापूर, खेड, जुन्नर, नसरापूर, नीरा, भवानीनगर, माळेगांव, रेडणी, सणसर, सासवड, हडपसर. **उत्तर सातारा**— सातारा, ओगलेवाडी, कराड, कुसूर, कोरेगाव, खटाव, पाचवड, बावधन, रहिमतपूर, वाई, शिरवळ. **दक्षिण सातारा**— सांगली, अष्टें, इस्लामपूर, कवठेमहांकाळ, काखेगाव, खानापूर, जत, नेर्ले, बांबवडें, बोरगाव, भवानीनगर, भिलवडी, मालगाव, मिरज, शिराळें, सलगरे. **अहमदनगर**— अहमदनगर, अळकुटी, कोळगाव, जामगाव, भिंगार, वांबोरी, शेवगाव, सोनई. **सोलापूर**— सोलापूर, श्रीपूर, अकलूज, अक्कलकोट, करमाळा, कुर्डूवाडी, टेंभुर्णी, नातेपुतें, पंढरपूर, बार्शी, माळीनगर, शिरवळ, सांगोला. **नाशिक**—नाशिक, चांदवड, त्र्यंबकेश्वर, ताहराबाद, नांदगाव, निफाड, निवाणें, भगूर, मनमाड, मालेगाव, मालेगाव कँप, शिंदे. **पूर्व खानदेश**—जळगाव (रा. स.), जळगाव ( ला. ना. ), अमळनेर, उंबरखेडें, कोळपिंप्री, चाळीसगाव, चोपडें, नगरदेवळें, नशिराबाद, पाचोरा, पारोळें, पाळधी, बहादरपूर, भालोद, भुसावळ, रावेर, वाघळी, शेंदुर्णी, साकरी, सामनेर, सावदा, हातेड. **पश्चिम खानदेश**—धुळें, छडवेल, तळोदें, नरडाणें, नंदुरबार, प्रकाशें, बेटावद, रनाळें, शहादें, साक्री. **कुलाबा जिल्हा**— खोपोली, पोयनाड, महाड. **रत्नागिरी जिल्हा**—रत्नागिरी, आचरें, कट्टा, मिठबाव, वेंगुर्लें. **कोल्हापूर जिल्हा**—

कोल्हापूर, इचलकरंजी, गडहिंग्लज, गारगोटी, ढोलगरवाडी, नेसरी, बाहुबली, मलकापूर, हलकर्णी. म्हैसूर राज्य- बेळगाव, अकोळ, निपाणी, कुडची, येलूर. विदर्भ- अकोला, अमरावती, नागपूर. मराठवाडा-औरंगाबाद, आपसिंगा, कंधार, गुंजोटी, नांदेड, परभणी, बीड, माजलगाव, मोमिनाबाद, एकंबा. मध्यप्रदेश- इंदूर.

या वर्षी झालेल्या परीक्षांत सर्व केंद्रांतून पुढील उमेदवार पहिले आले-

**प्रथमा**—देशपांडे, कालिंदी मनोहर, नातेपुते, पारितोषिक रु. १०.

**प्रवेश**—कोल्हटकर, नलिनी रामचंद्र, पुणे } पारितोषिक रु.१५.
वरडिया, प्रेमचंद उत्तम, जळगाव }

**प्राज्ञ**—पाटील, भगवंतराव सखाराम, सांगली, पारितोषिक रु. २०.

**विशारद**—चाफेकर, दत्त भालचंद्र, पुणे, पारितोषिक रु. २५.

**महाराष्ट्र साहित्य पत्रिका**—चालू वर्षी श्री. वा. रा. ढवळे यांच्या संपादकत्वाने चार अंक निघाले. ' पत्रिके'ला परतभेट म्हणून पुढील नियतकालिकें येतात.

**दैनिकें**—सकाळ, तरुण भारत ( पुणे व नागपूर आवृत्ति ), विशाल सह्याद्रि, सोलापूर-समाचार.

**त्रिसाप्ताहिक**—केसरी.

**अर्धसाप्ताहिक**—मराठवाडा.

**साप्ताहिकें**—मौज, नवयुग, साधना, विवेक, आलमगीर, महाराष्ट्र ( नागपूर ), गांवकरी, प्रबोधचंद्रिका, युगांतर, समाचार, पीपल्सराज, सोवियत देश, गोफण, The Times Weekly Review, London, ब्रिटिश इन्फर्मेशन सर्व्हिस ( मराठी प्रकाशन ).

Unesco Chronicle, Quest.

**मासिकें**— किर्लोस्कर, स्त्री, मनोहर, राष्ट्रभारती, सत्यकथा, वसंत, पुरुषार्थ, चित्रमयजगत्, सुदर्शन, रोहिणी, महाराष्ट्र, युगवाणी, प्रतिष्ठान, प्रसाद, नवभारत, धर्मचक्र, भारतमित्र, एकता, अमृत, नवल, पी. ई. एन्., साहित्यसहकार, व्यापारी महाराष्ट्र, संपदा, गोकुळ ( बालसन्मित्र ).

**पाक्षिकें**—भारतवाणी.

**द्वैमासिकें**—छंद.

**त्रैमासिकें**—भारत इ. सं त्रैमासिक, मराठी संशोधन पत्रिका, पंचधारा, Bulletin of the Deccan College Research Institute, Journal of the Tanjore Saraswati Mahal Library.

कौन्सिल हॉलमध्ये मुख्य मंत्र्यांनी बोलाविलेल्या संपादकांच्या सभांना बोलाविल्यावरून श्री. वा. रा. ढवळे उपस्थित होते.

**आभार**—परिषदेच्या कार्यात अनेकांचे अनेक रीतीने साहाय्य होत असतें. त्या सर्वांची परिषद् आभारी आहे.

चंद्रकुमार डांगे
न. का. घारपुरे
मा. गो. देशमुख
चिटणीस

दि. १०-४-१९६०

## म. सा. परिषदेच्या सभासदांना

# विनंती

म. सा. परिषदेच्या त्रैवार्षिक निवडणुका यंदा होणार असल्यामुळे, नवीन याद्या तयार करण्याचें काम चालू झालें आहे. तरी ज्या सभासदांना आपल्या नांवांत व पत्त्यांत कांही बदल करण्याची आवश्यकता वाटत असेल त्यांनी जून १९६० अखेरपावेतो कार्यालयाकडे तसें कळवावें ही विनंती.

संलग्न संस्था व पत्रिकेचे वर्गणीदार यांनी वरील सूचनेकडे कृपया अवधान ठेवावें.

अद्याप कित्येक साधारण सभासदांकडून दोन वर्षांची वर्गणी आलेली नाही. जून अखेरपर्यंत त्यांनी ती पाठवावी अशी आग्रहाची विनंती आहे. या मुदतीपर्यंत वर्गणी न आल्यास नवीन यादींत थकबाकी असणाऱ्यांचा समावेश करतां येणार नाही.

चिटणीस

---

टीप : संपादकीयांत व्यक्त केलेलीं मतें संपादकांचीं वैयक्तिक समजावीं.

अनुक्रमणिका

# AUDITORS REPORT.

**Name of the Trust :**

MAHARASHTRA SAHITYA PARISAD, POONA.

( Regd. No. F 90 )

We, the under-signed Auditors have audited the accounts of the Public Trust: MAHARASHTRA SAHITYA PARISHAD, POONA, for the year ended 31st March 1960, and have to state as under :—

(a) That the accounts are kept regularly and in accordance with the provisions of the Act and the Rules.

(b) Receipts and disbursements are properly and correctly shown in the accounts.

(c) Cash Balance and Vouchers in the custody of the Trustees on the date of audit were in agreement with the accounts.

(d) All books, deeds, accounts, vouchers and other documents and records required by us were produced before us.

(e) An inventory certified by the Trustee of the moveables of the trust has been maintained.

(f) No property or funds of the Trust were applied for any object or purpose other than the object or purpose of the Trust.

(g) The Trustees appeared before us and furnished the necessary information required by us.

(h) There are no outstanding over one year and no amount has been written off as bad debts.

(i) There were no repairs over Rs. 5,000/-. The tenders were not called for in respect of new construction of part of the building.

(j) No money of the Trust has been invested contrary to the provisions of Section 35 of the Trusts Act.

(k) There were no alienations of the immoveable property contrary to the provisions of Sec. 36 of the Trusts Act.

**G. M. Oka & Co.,**

16-4-1960 *Chartered Accountants.*

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र–साहित्य–

### दिनांक १ एप्रिल १९५९ ते दिनांक ३१ मार्च,

| खर्च | रु. | न. पै. | रु. | न. पै. |
|---|---|---|---|---|
| **जिंदगी ( प्रॉपर्टी )–** | | | | |
| म्युनिसिपल कॉर्पोरेशन कर. | ९७ | २० | | |
| वीज. | ११० | ४० | | |
| इमारत दुरुस्ती. | २३६ | ७५ | ४४४ | ३५ |
| **संस्था–** | | | | |
| पगार व प्रॉव्हिडंट फंड. | ४,५३७ | ४५ | | |
| कार्यालय छपाई. | २८९ | ६५ | | |
| कार्यालय टपाल. | २९३ | १६ | | |
| सादील. | ९७ | ०८ | | |
| आतिथ्य. | २३७ | ६२ | | |
| प्रवास-प्रचार. | ४६० | ९२ | ५,९१५ | ८८ |
| **हिशेब–तपासनीस** | | | १०० | ०० |
| **सभा व उपसमिति :** | | | | |
| कार्यकारी-नियामक. | १,०६९ | २२ | | |
| शाखासभा. | १७२ | ०५ | १,२४१ | २७ |
| किरकोळ. | | | १२० | ५७ |
| घसारा. | | | ३०० | ०० |
| परीक्षा शुल्क. | ९,०४५ | ५५ | | |
| " म. सा. पत्रिका ". | ५,४८३ | ९० | १४,५२९ | ४५ |
| चालूंसालीं खर्चापेक्षां अधिक असलेली जमा ( सामान्य निधीकडे ) | | | ३३९ | ५८ |
| एकूण...रु.... | ... | | २२,९९१ | १० |

पुणें, दि. १६-४-१९६०. आज तारखेस दिलेल्या अहवालानुसार.

## परिषद्, पुणें २.

### १९६० अखेर मुदतीचें जमाखर्चाचें पत्रक.

| जमा | रु. | न. पै. | रु. | न. पै. |
|---|---|---|---|---|
| **देणग्या :** | | | | |
| माधवराव पटवर्धन सभागृह | ४५९ | ०० | | |
| सरकारी. | १,००० | ०० | | |
| पुणें म्युनिसिपल कॉर्पोरेशन. | २०० | ०० | १,६५९ | ०० |
| **वर्गणी :** | | | | |
| साधारण सभासद. | १,७७६ | ५० | | |
| संलग्न संस्था. | ८४ | ०० | | |
| "म. सा. पत्रिका". | २४४ | ४८ | २,१०४ | ९८ |
| **व्याज—** | | | | |
| इन्कम-टॅक्स रिफंड व इतर जमा. | ८८७ | ३२ | | |
| ट्रस्टींकडून. | १,५०० | ०० | २,३८७ | ३२ |
| **इतर उत्पन्नें** | | | | |
| परीक्षा शुल्क. | १५,८७३ | ६८ | | |
| पत्रिका ( जाहिरात वगैरे ). | ५९८ | ५० | | |
| किरकोळ. | ६७ | ६२ | | |
| मिरज संमेलन. | ३०० | ०० | १६,८३९ | ८० |
| **प्रकाशनें** | | | | |
| ग्रंथ विक्री | ४,४७९ | ०० | | |
| वर्षअखेरचा साठा. | ६,१०० | ०० | | |
| **वजा—** रु. न.पै. | १०,५७९ | ०० | | |
| वर्षारंभींचा साठा. ६,५०९-४६ | | | | |
| चालू सालचा खर्च १,६३२-२१ | ८,१४१ | ६७ | | |
| | २,४३७ | ३३ | | |
| **वजा—** | | | | |
| प्रकाशन निधीकडे. | २,४३७ | ३३ | | |
| एकूण....रु..... | ... | | २२,९९१ | १० |

ध. रा. गाडगीळ
वि. द. घाटे } विश्वस्त

(सही) जी. एम्. ओक ॲण्ड कं.
चार्टर्ड अकौंटंटस.

अनुक्रमणिका

## महाराष्ट्र–साहित्य–

दिनांक ३१ मार्च १९६०

| निधि व देणीं. | रु. | न. पै. | रु. | न. पै. |
|---|---|---|---|---|
| **सामान्य निधि** | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | २१,७२७ | ९७ | | |
| विश्वस्तांकडील निधि (मागील ताळेबंदाप्रमाणे ) | २०,२७० | १० | | |
| | ४१,९९८ | ०७ | | |
| १९५९–६० सालीं खर्चापेक्षां अधिक असलेली जमा | ३३९ | ५८ | ४२,३३७ | ६५ |
| **इतर निधि** | | | | |
| (१) इमारत निधि : रु. न.पै. | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे २३,९३८–१२ | | | | |
| १९५९-६० सालीं मिळालेली सरकारी देणगी २,६७५–०० | | | | |
| २६,६१३–१२ | | | | |
| चिपळूणकर सभागृह १७,१४०–१२ | ४३,७५३ | २४ | | |
| (२) ग्रंथालय निधि : | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे १५,९११–८७ | | | | |
| १९५९-६० सालीं मिळालेली सरकारी देणगी १,२५०–०० | | | | |
| परीक्षणासाठी आलेल्या पुस्तकांची किंमत. १००–०० | १७,२६१ | ८७ | | |
| (३) डॉ. केतकर स्मारक मागील ताळेबंदाप्रमाणे. | १०१ | ०० | | |
| (४) कै. टँवे स्मारक व्याख्यानमाला | ३०० | ०० | | |
| (५) प्रकाशन(पारितोषिक) मागील ताळेबंदा प्रमाणे | २०४ | ०० | | |
| (६) वाङ्मयेतिहास योजना : | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे ५,६१९–५८ | | | | |
| १९५९-६० मधील जमा ४९९–०० | ६,११८ | ५८ | | |
| | | | ४२,३३७ | ६५ |

अनुक्रमणिका

# परिषद्, पुणें २.

## रोजींचा ताळेबंद

| जिंदगी व येणीं | | रु. | न. पै. | रु. | न. पै. |
|---|---|---|---|---|---|
| **स्थिर जिंदगी** | | | | | |
| **इमारत लीज–होल्ड जागेवर :** | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | | ४५,०८३ | ३४ | | |
| १९५९-६० सालीं झालेला खर्च | | ७,८८७ | ३७ | ५२,९५६ | ७१ |
| **कै. डॉ. केतकर स्मारक ( कुंपण )** | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | | | | ३५३ | ८८ |
| **ठेव ( दर्शनी किंमत )** | | | | | |
| **रोखे–** | रु. न.पै. | | | | |
| ४ टक्के बॉम्बे म्यु. डिबेंचर्स | ५००–०० | | | | |
| ३ टक्के डेव्ह. लोन. | १०,८००–०० | | | | |
| ३ टक्के कन्व्हर्शन लोन | २,७००–०० | | | | |
| ३॥ टक्के १० वर्षे ट्रे. से. डिपॉ. | १३,०००–०० | | | | |
| ४ टक्के १० वर्षे ट्रे. से. डिपॉ. | ४००–०० | २७,४०० | ०० | | |
| **शेअर्स–** | | | | | |
| २५ बॉम्बे स्टेट को-ऑप. बँक लि. चे प्रत्येकीं रु. ५० चे. | १,२५०–०० | | | | |
| २३ सेन्ट्रल प्रॉ. रेल्वेचे प्रत्येकीं रु. १०० चे. | २,३००–०० | ३,५५० | ०० | ३०,९५० | ०० |
| **फर्निचर व डेडस्टॉक** | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४,५८५–१४ | | | | |
| सायकल | २९३–५० | ४,८७८ | ६४ | | |
| १९५९-६० मधील भर-तळघरांतील पंप | १,३९४–२५ | | | | |
| फर्निचर | ५२४–३० | १,९१८ | ५५ | ६,७९७ | १९ |
| **ग्रंथालय ...** | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे. | | १२,८८२ | ०० | | |
| १९५९-६० या वर्षांतील भर-ग्रंथ खरेदी | | ४९३ | ३४ | | |
| परीक्षणासाठी आलेलीं पुस्तकें | | १०० | ०० | १३,४७५ | ३४ |
| | | | | १,०४,५३३ | १२ |

| निधि व देणीं | | रु. | न.पै. | | न.पै. |
|---|---|---|---|---|---|
| मागील पानावरून चालू | | | | ४२,३३७ | ६५ |
| (७) प्रकाशनें | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | १७,६२४–०४ | | | | |
| १९५९-६० सालीं खर्चापेक्षां अधिक झालेली जमा | २,४३७–३३ | २०,०६१ | ३७ | | |
| (८) प्रॉव्हिडंट फंड ( स्टाफ ) : | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | २,३३९–१७ | | | | |
| १९५९-६० सालांतील जमा | २६८–९० | | | | |
| वरील जमेवरील व्याज | ४६–२० | २,६५४ | २७ | | |
| (९) घसारा | | | | | |
| मागील ताळेबंदाप्रमाणे | ४,५००–०० | | | | |
| १९५९-६० सालची जमा | ३००–०० | ४,८०० | ०० | ९५,२५४ | ३३ |
| कर्ज | | | | ०० | ०० |
| देणीं | | | | | |
| द. सातारा साहित्य सभा, सांगली (पारितोषिकासाठी). | | ४०० | ०० | | |
| ट्रस्टींना देणें. | | ५८२ | ७४ | | |
| पंपासाठीं द्यावयाचा खर्च | | ८९४ | २५ | १,८७६ | ९९ |
| चालूं जमाखर्चाचा तपशील | | | | | |
| खर्चापेक्षां अधिक झालेली जमा | | ३३९ | ५८ | | |
| वजा सामान्य निधिकडे | | ३३९ | ५८ | | |
| एकूण...रु.... | | ... | | १,३९,४६८ | ९७ |

पुणें, दि. १६-४-६०. आज तारखेस अलाहिदा दिलेल्या अहवालानुसार.

| जिंदगी व येणीं | रु. | न.पै. | रु. | न.पै. |
|---|---|---|---|---|
| मागील पानावरून चालू | | | १,०४,५३३ | १२ |
| कर्ज | | | ०० | ०० |
| ॲडव्हान्स | | | ०० | ०० |
| येणीं | | | ०० | ०० |
| चालूं ॲसेटस् | | | | |
| शिल्लक पुस्तकांची किंमत चिटणिसांच्या दाखल्याप्रमाणे | ६,१०० | ०० | | |
| पुणें इले. सप्लाय कं. कडे डिपॉझिट | २६० | ०० | ६,३६० | ०० |
| अखेर शिल्लक– | | | | |
| रोख हातीं | १८७ | १८ | | |
| पुणें सेन्ट्रल को–ऑप. बँक लि., पुणें. | ६० | ८४ | | |
| बँक ऑफ महाराष्ट्र लि., पुणें. | १२,५८१ | ४३ | | |
| पुणें सेन्ट्रल को–ऑप. बँक लि.(प्रॉ. फंड.) | २,६५४ | २७ | | |
| स्टेट बँक ऑफ इंडिया, (ट्रस्टी.) | २,०९२ | १३ | | |
| कायम ठेव (बँक ऑफ महाराष्ट्र लि.) | ११,००० | ०० | २८,५७५ | ८५ |
| एकूण....रु.... | .... | | १,३९,४६८ | ९७ |

ध. रा. गाडगीळ }
वि. द. घाटे } विश्वस्त

(सही) जी. एम्. ओक ॲंड कं.
चार्टर्ड अकौंटंट्स्

